# पुरस्कार



या कवितासंग्रहाचे लेखक रा. घाणेकर हे साताराचे एक पुढारी नागरिक व राष्ट्रीय वृत्तीचे गृहस्थ आहेत. लेखकाच्या नात्यानें ते वर्तमानपत्रांतून किंवा मासिकांतून वाचकांच्या दृष्टीपुढें न आल्यानें साताऱ्याबाहेर दूरच्या महाराष्ट्रांतील लोकांशीं त्यांचा परिचय नाहीं. तथापि साताऱ्यांत होणाऱ्या राजकीय चळवळींत ते प्रमुख असतात हें पुण्यांतील अनेक लोकांना विदित आहे.

मात्र त्यांचा हा कवितासंग्रह पाहणाराला त्यांच्या वाङ्मयप्रेमाची ओळख पहिल्यानेंच होईल. किंबहुना हें साहित्यिक माणीक इतके दिवस दडून कसें राहूं शकलें याचें त्यांना आश्चर्यच वाटेल. त्यांचा प्रसिद्धि-विन्मुख स्वभाव हाच त्याला कारण असावा. पण मला स्वतःला ते अपरिचित नव्हते. यामुळें या अभिप्रायाच्या रूपानें मी वाचक वर्गाला त्यांचा परिचय करून देण्याचें काम आनंदानें स्वीकारलें.

माझ्याऐवजीं हा परिचय कोणा जातिवंत कवीनें करून दिला असता तर अधिक बरें झालें असतें. मला काव्य विषयाची आवड असली तरी मी त्यांतहि जुन्या पिढीचाच आहें, पण माझा जुनाटपणा हाच कदाचित या कामीं माझी पात्रता ठरण्याचा संभव आहे. कारण

प्रस्तुत कवीच्या कवितांवरहि जुनाट पद्धतीची छाप व छटा आहे.

नव्या पिढीच्या दृष्टीने या कवितेंत काय काय नाहीं हेंच, मला वाटतें, प्रथम सांगून टाकलेलें बरें. १ आधुनिक ललिताचा प्राण होऊन बसलेला श्रृंगार यांत नाहीं. यामुळें या कविता कोणत्याहि वयाच्या स्त्री–पुरुषाच्या हातांत पडण्यापासून धोका नाहीं. पण ज्यांत असा धोका नाहीं त्यांत अद्‌भुतरम्यता – रोमान्सहि – नाहीं. यामुळें प्रौढ वयाच्या स्त्री-पुरुषांच्या हातीं या कविता अधिक वेळ राहतील तर, तरुण पिढी यांना लवकरच कटाळून त्या ठेवून देतील. २ या कवितांची बांधणी जुने हरिदासी श्लोक आर्या यांजवरच झालेली आहे. त्याना माधवराव पटवर्धनांनीं पुरस्कृत केलेल्या नव्या चाली व जाती यांचें वळण नाहीं व वृत्तवैचित्र्य नाहीं. ३ यांत गूढगुंजन नाहीं. शून्य संशोधन नाहीं. हें बिन बीचें द्राक्ष नाहीं. ही वाऱ्यानें भरलेली मोट नाहीं. यांत निराकाराभोंवतीं पिंगा नाहीं. यांत कृत्रिम मनोविश्लेषण नाहीं. ४ यांत फुलामुलांचा गोंधळ नाहीं. फुलपाखरांचें भ्रमण नाहीं. लावालावीच्या उपमा व रूपकें नाहींत. ५ यात इतर कोणा कवीचें अनुकरण वा विडंबन नाहीं. ६ यांत ओढून ताणून चंद्रबळ नाहीं.

इतकें नकारयुक्त सांगून झाल्यावर त्यांत आहे तरी काय हें सांगणें ओघानेंच येतें. म्हणून तेंहि सांगतों.

१ या कवितांत मानवी सहानुभूति, वात्सल्य, दयाबुद्धि, स्त्रीदाक्षिण्य व स्त्रीजातीविषयीं आदरयुक्त भावना व स्वदेशप्रेम हीं उघड दिसून येतात. २ यांत अदृश्य वास्तवें हुडकीत न जातां जीं वास्तवें सहजासहजीं दृष्टि-गोचर होतात त्यांनाच बहु मानून त्यांचा परामर्ष घेण्यांत आलेला आहे. ३ यांत जगांतील सुखाचें चोज कौतुक करीत न बसतां दुःखाचा हळुवार मनानें विचार केलेला आहे. ४ यांत भाषा योजिली आहे ती अत्यंत साधी, सोपी असून तिला कृत्रिमपणाचा वासहि नाहीं.

रा. घाणेकर यांचा अहर्निश व्यवसाय राजकारणाचें चिंतन, मनन, निदिध्यास असतां त्यांना कविता कशी सुचावी याचें पुष्कळांना आश्चर्य वाटेल. पण राजकारणा-ला वाङ्मय व ललित यांचें वावडें आहे असें मानणाराचा तो दोष आहे. खरें आहे तें हें कीं राजकारण हा गंभीर व रुक्ष विषय वाटला तरी त्याच्या उपासनेंत भावनेला जागा आहे. असें पहा कीं राजकारणाचा अंतरात्मा देशभक्ति हीच नव्हे काय? आणि भक्ति ही भावना नव्हे काय? किंबहुना या भक्तीला तिच्यांतील भावनेमुळें—देश-प्रेमाच्या स्थायी भावामुळें—रसाचें स्वतंत्र स्थान व योग्यता कांहीं साहित्यशास्त्र्यांनीं दिली आहे. अलीकडील काव्यांत देशभक्तीचें काव्य पाहण्यालाहि मिळत नाहीं, असें म्हणणारांना घाणेकरांच्या या कवितासंग्रहांत मधून मधून त्याची वानगी पाहावयास मिळेल. मुळांत भावना पाहिजे,

मग राजकारणी साहित्यिक त्या भावनेचा उपयोग सुंदर निबंध लिहिण्याकडे करील किंवा कविता कादंबऱ्या लिहिण्याकडे करील.

तथापि घाणेकरांची कविता राजकीय मतप्रसारार्थ लिहिलेली नसून अज्ञातवास एकांतवास सुसेव्य व्हावा, त्यांतहि मन रमण्याला कांहीं करमणूक व्हावी याकरितांच लिहिलेली आहे.

'स्फुट कविता' या विभागांत 'माझीं कवनें' या मथळ्याखालीं घाणेकरांनीं स्वतःच या प्रश्नाची चर्चा प्रश्नोत्तर काव्यरूपानें केली आहे, ती अशी—

'वाची न कवन कोणी निरलस तरि लेखणी तुझी चाले
कां काल हा अमोलिक वेचिसि करण्यांत कागदा काळे ?' १
'जगता अज्ञात अशीं रत्नें उदरांत निर्मिते अवनी
पुष्पें प्रसवे वेली सुगंधयुत अमित निर्जनीं रानीं २
आकाशींच्या तरि कां तारा दिसती समस्त तुजलागीं ?
सागरतळीं प्रभायुत मोतीं वसतीं कितीतरि अभागी ३
कवनें मम हीं जन्मा येतीं तेंवीच सृष्टिच्या नियमें
सत्कार न, धिक्कार न, सुसेव्य अज्ञातवास एक गमे !' ४

कवीच्या या अज्ञातवासाचा कांहीं काळ तुरुंगांतहि गेलेला आहे. तो जर काव्यनिर्मितीच्या व्यवसायानें सुसेव्य केला असेल, तर त्या काव्यबुद्धीला धन्यवाद कोणीहि देईल. इतर रीतीनें करमणूक करून घेऊन तुरुंगवास सुसह्य करणारे कितीतरी निरक्षर नीरस लोक तुरुंगांतून असतात. पण घाणेकरांना काव्याची गोडी असल्यामुळें

ही करमणूक त्यांना इतरांपेक्षां अधिक पटली व तिनें समाजाच्या पद्यवाङ्मयांत भरहि घातली.

घाणेकरांनीं कवितांकरितां घेतलेले विषय हे लहान लहानच आहेत. दीर्घकाव्य एकहि नाहीं. आणि खंड-काव्यापेक्षांहि लघुकाव्येंच फार. कांहीं तर चार ओळीं-चींच! त्यांत सभोंवतीं दृष्टीस पडणारीं मानवी सुखदुःखें यांजवरच बहुतेक सारा भर आहे. आणि त्यावरून असें वाटतें कीं दुःख न्याहाळून काढण्याची एक प्रकारची दृष्टीच त्यांना लाभलेली आहे. या दुःखाच्या सरळ हकीकती दिल्या आहेत त्यांत कवित्वापेक्षां वृत्तांत जास्त आहे. माणूस माणसाशीं बोलत आहे असा भास कविता वाचतांना उत्पन्न होतो.

सृष्टिवर्णनें फारच थोडी आहेत. पण ग्रामीण जीवनाचें वर्णन आहे. सुभाषितें भरपूर आहेत. कांहीं विनोदी चुटके चटकदार आहेत. तथापि एकंदर कवितांना त्रोटकपणा प्रासंगिकपणा वाजवीहून थोडा अधिक वाटतो. प्रज्ञा आहे, भावना आहे, मात्र प्रतिभाविलास, कल्पनेचा खेळ कमी आहे. शुद्ध सात्विक भावनेची छटा सर्वत्र आढळत असल्यानें, वाचकाला कंटाळा आला तरी, बाष्कळ, उल्लू, बेछूट कविता वाचून येणारा उद्वेग कोठेंच उत्पन्न होत नाहीं.

पुणें, २१-७-४२ **न. चिं. केळकर**

# निवेदन



लेखन हा माझा करमणुकीचा विषय आहे. अत्यंत आवडीचा, पण आयुष्यातील ध्येयाचे दृष्टीनें दुय्यम दर्जाचा, एवढे मात्र खरें. १९०८ सालीं बंगालचे सुप्रसिद्ध पुढारी बाबू अरविंद घोष याचेवर झालेल्या खटल्यांत बाबू बिपिनचंद्र पाल याना सरकारतर्फेचे साक्षीदार म्हणून बोलाविलें असतां त्यांनीं साक्ष देण्याचें नाकारून तुरुंगवास पत्करिला, ह्या गोष्टीचा माझेवर परिणाम होऊन मी पालबाबूंवर एक काव्य लिहिलें. तें माझें पहिलें लिखाण. तें आज अस्तित्वांत नाहीं. १९०८ पासून आज चौतीस वर्षें मी एकसारखा कांहींतरी लिहीत आलों आहें. काव्यें, नाटकें, कादंबऱ्या, लघुकथा, निबंध अशा साहित्याच्या अनेक शाखात मीं रचना केली आहे. पण लेखन हा माझा केवळ करमणुकीचा विषय असल्यानें तें प्रसिद्ध करण्याची फारशी कधीं उत्कंठा मला लागली नाहीं; इतकेंच काय पण माझ्या एकंदर लिखाणापैकीं केवढा तरी भाग मीं नष्ट करून टाकलेला आहे. १९३८ सालापासून मात्र मीं तें संहाराचें काम बंद केलें आहे.

आज प्रसिद्ध होत असलेला ग्रंथ माझ्या कवितांचा संग्रह असल्यानें माझ्या प्रसिद्ध झालेल्या कवितांविषयीं माहिती सांगतों. माझे मित्र कै श्री. गोपाळ कृष्ण ऊर्फ बाबूराव देशपांडे यानीं १९१० सालीं डेक्कन कॉलेजचे त्रैमासिकांत 'जलाशय' ह्या सहीनें माझी एक कविता प्रसिद्ध केली. त्या-वेळीं आम्ही दोघे डेक्कन कॉलेजमध्यें शिकत होतों. त्याच

माझ्या मित्रानीं १९१२ सालीं माझ्या कांहीं कविता 'अभिनव काव्य माले'च्या तिसऱ्या भागांत प्रसिद्ध करण्याची व्यवस्था केली त्या प्रसिद्ध होण्यापूर्वीच ते दिवंगत झाले. ते चेष्टेनें मला म्हणत, 'तूं कांहीं आपलें लिखाण प्रसिद्ध करणार नाहींस. तूं मेल्यावर तुझें लिखाण माझ्या ताब्यात येईलच ना? तें मी 'प. वा. पं. वा. घाणेकर ह्याचे लेख' ह्या नांवानें प्रसिद्ध करणार आहें. पहा पुस्तकाच्या नांवात अनुप्रास साधतो आहे.'

श्री. बाबूराव याचे धाकटे बंधू श्री. वाग्भट देशपाडे ह्यांनीं, मी आपलें लिखाण फाडून टाकतों, म्हणून माझेवर फार रागवावें. प्रस्तुतच्या संग्रहात प्रसिद्ध होत असलेलीं दोन खंड-काव्यें शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध करण्याचा त्यांचा मानस होता. 'स्मृतिगीतें' व 'मालतीनिधन' हीं तीं दोन काव्यें होत. त्यानींही नेहमीं म्हणावें कीं, 'नाथ, तुमचें लिखाण मी प्रसिद्ध करणार आहें.' पण त्याना दिवंगत होऊनही सहा वर्षें होऊन गेलीं.

मीं रोज काहींतरी लिहावें. तें बाबूराव असेतोंपर्यंत त्यांना दाखवावें. १९१३ सालीं ते वारल्यावर श्री. वाग्भट देशपाडे, श्री. गं नी. ऊर्फ तात्या गोखले, श्री. निळूभाऊ घाणेकर, श्री. कमलाबाई देशपाडे याना सवडीनुसार आपलें लिखाण दाख-वावें; त्यानीं बरें वाईट म्हणावें; त्यावर चर्चा करावी; कीं माझें काम संपत असे. असा प्रकार १९३८ पर्यंत चालला होता.

१९३८ सालीं माझ्या कांहीं मित्रमंडळींनीं माझ्या कांहीं कविता प्रसिद्ध केल्या. या प्रसिद्धिकरणात श्री. शिवराम गोविंद ऊर्फ राजाभाऊ भावे यांनीं पुढाकार घेतला होता. राजाभाऊंची माझ्याशीं १९३४ सालीं ओळख होऊन त्या ओळखीचें

स्नेहांत रूपांतर झालें; व एकमेकाबद्दल आम्हां दोघांना आपले-पणा वाटूं लागला. १९३८ सालापासून माझें लिखाण प्रसिद्ध करण्याची गोष्ट राजाभाऊ वरचेवर काढूं लागले. पण मला कांहीं उत्साह चढेना.

ह्या वर्षी, १९४२ सालीं, प्रकृति थकल्याची जाणीव मला अधिकाधिक होऊं लागली. बरेंचसें लिखाण नष्ट केलें तरी जपून ठेवलेलें कांहीं थोडेंथोडकें नाहीं त्याचें काय करावें असा विचार वरचेवर मनात येऊं लागला. सरतेशेवटीं ८ जून १९४२ रोजीं, कविताचा एक संग्रह तात्काळ प्रसिद्ध करावा असें मी आपल्या मनाशीं निश्चित केलें. ९ जूनला श्री. राजाभाऊ भावे व निळूभाऊ घाणेकर ह्याच्याशीं चर्चा केली. त्याची संमति मिळाली. १० जूनला माझ्या एका श्रीमंत मित्राजवळ खर्चाबद्दल गोष्ट काढताच त्यानीं साडे-चारशें रुपयाची देणगी देण्याचें कबूल केलें. कागद मिळण्याचे बाबतींत जरा त्रास पडला; पण मिळाला. जून १९ ला छपाईचें काम सुरू झालें व आज १ आगस्ट—लोकमान्य टिळकाच्या २२ व्या पुण्यतिथीचे दिवशीं हें पुस्तक प्रसिद्ध होत आहे.

श्री. हडप यानीं छपाईचें काम थोडक्यांत पण सुबकपणें करून दिलें ही गोष्ट नमूद करावीशी वाटते

माझ्या श्रीमान मित्रांची देणगी, श्री. राजाभाऊ भावे यांनीं घेतलेले कष्ट व केलेल्या सूचना, श्री. हळवे, श्री. गणपुले, श्री. चितळे यानीं छपाईसाठीं प्रत करण्याचे कामीं केलेली मदत वगैरे गोष्टींचा नामनिर्देश करण्यापलीकडे मी तरी काय करणार? छपाईच्या खर्चाची रक्कम देणगी म्हणून देण्यांत आली असली तरी पुस्तकाच्या विक्रींतून ती शक्य तितक्या

लौकर परत करावी असाच माझा हेतु आहे. तो पुरा होईल अशी मला आशा वाटते.

शेवटीं आणखी एक महत्त्वाची व नमूद करून ठेवण्या-सारखी गोष्ट म्हटली म्हणजे श्री. तात्यासाहेब केळकर ह्यांनीं ह्या माझ्या कवितासंग्रहाला लिहिलेली मार्मिक पुरस्कारात्मक प्रस्तावना होय. वर ज्या मंडळींना मीं आपलें लिखाण दाखवून समाधान मानीत असें म्हणून लिहिलें आहे त्यांपैकीं निळूभाऊ घाणेकरांखेरीज सर्व मंडळी तात्यासाहेबांचीच आहेत. त्या दृष्टीनें तात्यासाहेब मला पितृतुल्य आहेत. माझ्या कांहींशा भिडस्त स्वभावामुळें मी त्यांच्या फारसा जवळ जाऊं शकलों नाहीं. तरीही त्यांनीं मला माझ्या कार्याला अनेकदा मदत केली आहे; उत्तेजन दिलें आहे. आतांचा पुरस्कार त्यांतीलच एक भाग आहे. त्यातल्या त्यात सांगण्यासारखी गोष्ट ही कीं पुरस्काराची ही गोष्ट माझ्या अपरोक्ष राजाभाऊ भावे यानीं तात्यासाहेबांजवळ काढली; तरीही ती त्यांनीं तात्काळ मान्य करून इतर अनेक कामाच्या गर्दींतही वेळ काढून वेळेवर मजकूर पाठविला. मजवरील त्यांच्या लोभाचा केवढा हा मोठेपणा!

श्री. राजाभाऊ यानीं सुरुवातीपासून शेवटपर्यंत अनेकविध श्रम घेऊन हें पुस्तक तयार केलें. तें त्यांच्याच 'सह्य प्रकाशक मंडळी'तर्फे प्रसिद्ध होत आहे हें योग्यच आहे.

सातारा
१ आगस्ट १९४२

**नाथ घाणेकर**

# अनुक्रमणिका

अज्ञातवासांत सुखांत राहे
तो आज हा मी रसिकांस बाहे
'अर्पी तुम्हांला कविता–सुता ही
घ्या, पारखा, न्या रुचल्यास गेहीं.'
तों बोलली ती, 'न जुनी पुराणी
मी जाणतें शुद्ध, अशुद्ध नाणीं;'
मी कीं वदें, 'तें चुकुनीच बोलें
स्वतंत्र तूं आणि रसज्ञ बाळे;
हा काळ मीं डांबून ठेवियेलें
निःशंक जा आज जगांत खेळें!
तेजें स्वतांच्या ठर उच्च नीच
लागेल लोकीं कस योग्य साच.'

१ आगस्ट
१९४२

नाथ घाणेकर

# महाराष्ट्रा !

महाराष्ट्रा, राष्ट्रा सकल असशी तूं शिकविता
तुझ्या मार्गें मार्गें जन अखिल येतां निरखितां
प्रमोदाचें येतें हृदयिं भरतें, तेंच कवनीं
वरी दृश्यत्वा कीं सममुदित हो बंधु भगिनी १

महाराष्ट्रीं नाहीं वद कवण आपत् प्रबलिनी?
असे दारिद्र्याची खनि न उपमा जीस भुवनीं!
असंख्या व्याधींचें प्रिय सदन हा देश अमुचा
दिला देवें आम्हां वर जणुं दुहीचा सततचा! २

प्रकोपा भूपाचे प्रिय गमुनि ही भू सतत तो
मुदें नांदे येथें, सदन जणुं हें स्वीय करितो!
पयोदेंही भूपा अनुसरुनि कोपासि धरितां
निमाली येथोनी सकल धनधान्यप्रचुरता ३

अम्ही आर्यावर्तीं प्रबलतम राजे मिरविलों!
अतां आपत्तीच्या गुरुतम गुहेमाजिं पडलों!
अम्हां आर्यावर्तें नमुनि करभारें विनविलें!
अतां आम्ही आहों पिच्चत परदास्यांत दुबळे ४

परी आपद्देहीं जनन वरि संपद् नियम हा;
इथें राष्ट्रोद्धर्ता प्रथम उगवे **माधव** पहा!
शिरे सेवाधर्मी, परि न गमवी स्वत्व अपुलें;
तयें आर्यावर्ता नव विविध चैतन्य दिधलें! ५

मराठीचा वाली, समरिं शिवबा, लेखनि तसा
स्वराष्ट्रा शक्तीचा अचुक पटवीला भरवसा
जया 'स्वातंत्र्याचा अरुण' पदवी शोभत खरी;
असा **विष्णू** बाल्यीं बघत हत दैवें यमपुरी! ६

तसा मृत्यू नेई नव उदित त्या **आगरकरा**
सदा ज्याची रूढी–हननि विलसे लेखनि, गिरा,
म्हणे 'त्याज्या रूढी हतकपरसत्ता–भगिनि ही;
इचे ठायीं नांदे भयरहित ती घातुक दुही.' ७

समस्तां विद्यांचा प्रिय सुहृद, पावित्र्य तनुभृत्,
धृतीचा शौर्याचा मुकुटमणि, तत्वज्ञ, नयविद्,
अमोघा यद्वाणी, हृदय हलवी लेखनिबलें,
अशा **बाला** सम्राट् पदवि जनतासंमत मिळे! ८

स्वतां त्यागी, त्यागी तरुणगण निर्मी श्रमभुजी,
करी वाक्सामर्थ्यें स्ववश जन **गोपाल** सहजी,
तया नीतिज्ञाचें प्रबल दरबारीं भय शिरे,
मराठा हा येतां कुटिलमति मंत्री मनिं विरे! ९

करी वैधव्यातें हतबल, सजीवा गतधवा
स्त्रियां विद्या–भूपा चढवि, मन निर्मी जणुं नवा,
पहा **कर्वे** शिष्या मिळवुनि सुविद्या अभिनवा,
कुमारी राष्ट्रार्थ श्रमति, सधवा, तेविं विधवा! १०

कुविद्येनें झालें मलिन मन, ना स्वत्व उरलें,
परस्थाचें जें जें–अधमहि–अम्हां सेव्य गमलें,
म्हणोनी जो विद्या वितरि हितकारी सकलिकां
महाराष्ट्रा भूपा गमत न **विजापूरकर** का? ११

महाराष्ट्रा, तूझें गतविभव जो सत्य, सकल
यथार्थत्वें गातां मिळत तुज सत्कीर्ति अढळ;
अगाध-ज्ञानी जो गुरु गमतसे पंडितवरां,
सदाचारी विद्याव्यसनि **विसुभाऊ** ऋषि खरा १२

धनातें, मानातें भुलुनि परधर्मांत शिरती,
न तेथें सन्मान, द्रविण न, न नष्टा अवनति,
स्वधर्मद्रोहाचें अघ अमित येतें परि शिरीं !
अशा संत्रस्तांचें अवन करि **हिंदू मिशनरी** ! १३

तसा अस्पृश्यांना जवळ करुनी, त्या शिकवुनी,
स्वधर्मीं दे त्यांना धन, सुख, सुकीर्ती मिळवुनी,
स्वधर्मासक्तांचें दल नव उभारी प्रबल तो,
परस्थांच्या **शिंदे** मिशनरि गणांना नमवितो ! १४

नसे पाश्चात्यांचें धन लव, न पाश्चात्य गुरु वा,
स्वराष्ट्रा दावोनी परि पथ धनाकर्षक नवा,
स्वकीया उद्योगव्यसनरत **किर्लोस्कर** करी;
स्थिरावे कीं येथें धन, पर हरी जें अजवरी ! १५

तशा ख्याता लोकीं नरसम महाराष्ट्रमहिला
यशें **आनंदीच्या** वद कवण ना देश भरिला ?
**रमेनें** नाथाचें व्रत न पडतां खंड वरिलें,
धडे कर्तृत्वाचे अधन अबलांना शिकविले ! १६

महाराष्ट्रा, तूझी समरपटुता, नीतिपटुता,
जगीं गाजे; त्यांचें फल न परि येतें मिळवितां;
रुचावें तें केवी विजयि इतिहासास अपुले
शिवाची, दासाची शिकवण, तरी तूं, अनुसरे. १७

भवानी त्या सेव्या, धृति, बल तदाशीर्वचन दे,
तियेच्या आधाराविण न पडती बाहिर पदें,
मरूं धर्मासाठीं, म्हणत शिव धर्मावन करूं,
स्वधर्माची शक्ति प्रकटवुनि हे दुर्दिन हरूं. १८

प्रभूतें, धर्मातें शरण रिघुनी मानव जरी
स्वकर्तव्या धैर्यें करित जय कीं निश्चित करीं,
चरित्रीं दासाचें गुज दिसत हें बिंबित पुरें,
जयश्रीचें त्यांच्या प्रबलतम हें साधन खरें १९

'असो माझे ठायीं तव परम विश्वास तुज कीं
नको भीती; चिंता तव करिन मी होशिल सुखी,
असे गीताग्रंथीं यदुकुलवराश्वासन जगा
महाराष्ट्रा, त्याचा वर न वरिसी; धांवसि उगा २०

'स्वराज्य' 'स्वातंत्र्य' प्रबलतम हे शब्द दिसती
न ते आम्हां स्फूर्ती चिर, अजित देऊंच शकती
परी धर्मापायीं त्यजु हंगत सर्वस्व अपुलें
महाराष्ट्रा, तूंही त्यजुनि असु धर्मा जगविलें २१

शिवें, राजारामें स्वजनिं सृजिली संहति कशी
'मरूं, मारूं मागें, सरु न परि, हा बावनकशी
कसा बाणा आला? सबल दुसरा साह्य नसतां
जगज्जेता शत्रू रणिं नमविला केविं पुरता! २२

स्वधर्मप्रेमानें अतुल करणी, गाढ करणी
तयीं केली; त्यांचे तनुज तरि तन्मार्ग धरुनी
न कां आम्ही झेंडा विजयि मिरवावा फिरुनि तो
महाराष्ट्रा! पाहीं दुरुनि तुजला तो खुणवितो. २३

महाराष्ट्रा ! आतां पथ न पटला पूर्विल तुला
तरीं पंथा अन्या कवणहि वरीं; राहिं न लुला
विपद्ग्रस्ता तूझी बघुनि करणी चित्त रमतें
परी त्वत्कार्यातें यश न दिसतां तेंच खचतें !      २४

पुन्हां ऐक्यें सारे सुगुण अपुले एकवटुनी
बलाचें, बुद्धीचें प्रखरपण दावी प्रगटुनी
तुझें आर्यावर्ती प्रमुखपण बा ! मान्य सकलां
झणीं स्वातंत्र्यानें नटवि, सुखवी 'हिंद-महि'ला  २५

जुलै १९२७]

# श्रीशिववंदन

प्रताप वा शील रघूत्तमाचें
कृष्णानुगामीं नृपकाज ज्याचें
विदेह जो वैभविं वा विरागी
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं १

सामर्थ्य जो निर्मुनि आर्यधर्मीं
लावोनि तें थोर उदात्त कर्मीं
स्थापी स्वधर्मा जगदुत्तमांगीं
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं २

ने मानवा जें पशुतेस पूर्ण
त्या पारतंत्र्या करुनी विदीर्ण
पाही महाराष्ट्र स्वराज्य भोगी
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं ३

भार्या रिपूची तरुणी शुभांगी
असाह्य हातीं जणुं ये कुरंगी
सत्कारि मातेसम तीजलागीं
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं ४

दिल्लीपतीचे दृढ बंदिवासीं
प्रवेश वा तेथुनि मोक्ष ज्यासी
लीला गमे जेंवि नटास रंगीं
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं ५

कौटिल्य–नीतिज्ञ अगाध शक्ति
रिपूसि जो योजुनि योग्य युक्ति
दे अंतकाहातिं प्रतापदुर्गी
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं ६

पराक्रमें बुद्धिबलें नवीन
जें प्राप्त तें वैभव देइ दान
गुरूसि जो मोक्षसुखानुरागी
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं ७

वाटे शठासी शठ जो ऋजूसी
ऋजू; शिवें स्वार्थ न अल्प ज्यासी
परार्थ जो केवळ कष्ट भोगी
तो श्री शिवाजी नमिं अष्ट अंगीं ८

१९२५]

# जननी—दशक

संसारीं शिरली, निरंतर सखी लक्ष्मी गमे लाधली!
ती नित्य—भ्रमण—प्रिया परि, कशी राहील एके स्थलीं?
गेली ती; नच राहि ओळख; परी संतुष्ट जी अंतरीं
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं १

गेहीं जें ऋण पाहुणा म्हणुनि ये स्वामीच तें जाहलें
तन्नाशा सजतो सुविद्य सुत जों काळें तया ग्रासिलें
झाली शोकविमूढ, ना लवभरी कर्तव्य—हानी परी
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं २

गेहीं बालवया स्नुषा गतधवा नांदे, प्रमोदें असे
दु:खीं सौख्य गमे, तशांताचि यमें पुत्री प्रसूतीमिषें
नेतांही, इतरां मुलांस्तव धरी उत्साह जी अंतरीं
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ३

या ऐशा समयीं समस्त ऋणदां विश्वास ना राहुनी
जातेशी कुलकीर्ति शुभ्र बघुनी, आली पुढें जी झणी;
स्वांगींचें विकुनी ललाम ऋण दे तात्काळ कांहींतरी
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ४

जी आजन्म मितव्ययी, सुगृहिणी, गोत्राभिमानी, श्रमी
घे सूत्रें स्वकरीं समस्त गृहिंचीं; हो मार्गदर्शी तमीं;
नष्टप्राय यशा जणूं गवसली संजीवनी सत्वरीं!
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ५

कीर्ती पूर्विल नांदतां बघुनि हो आनंद साचा मनीं !
कीं गेला सुत षोडशाब्द वय ज्या–झाली पुनः दुःखिनी !
धैर्यें पुत्रविवाह साधुनि परी संसार चालू करी
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ६

झाली पुत्रवती स्नुषा नव, सुता ही पुत्रवंती तशी
गेहीं नाथ सुतादि नांदति सुखें, होती ऋणें नाहिंशीं !
दुष्कीर्ती नुरली, पुरातन–यश–प्राप्ती जिनें साधिली
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ७

झालें मुक्त ऋणांतुनी गृह परी निर्द्रव्य झालें पुरें !
वृत्तिच्छेद तशांत ' देश–हित हो ' या कारणें सत्वरें–
केला स्वीकृत दो सुतीं; न विटली, आनंदली जी परी
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ८

दैवातें बघवे न हेंहि, विधवा केलें तयें पुत्रिला !
ते दुःखाश्रु न वाळलेहि सुत तों हो पक्षघातें लुला !
निर्द्रव्यत्व, सरोग पुत्र, विधवा कन्या, न भ्याली परी
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं ९

लाहे सासुर चांगलें म्हणुनि जी बाल्यांत आनंदली;
तारुण्यीं श्रमली दिनानुदिन कीं श्री पारखी जाहली;
वार्धक्यीं सखि होय संकटतती ' स्वत्वा ' न सांडी परी
त्या माझ्या जननीप्रति प्रणति मी साष्टांग भावें करीं १०

स्मृतिगीतें
मालती-निधन
कायदेभंग
निरलसाश्रम
पुनर्मीलन
संन्यासिनी
धर्मश्रद्धा
विधिघटना
क्षेत्रपालिका
प्रबल अबला
पोरकें पोर
दुःखांतून सुखाकडे
श्रीधर गोपाळ देशपांडे, दर्यासारंग

# स्मृति-गीतें

## प्रथमावेग

### ( १ )

‘ गेला मित्र तुझा ’ अशी श्रुतिवरी वार्ता यदा आदळे
होई स्तंभित मी, पडें धरिणिला, जाणीव कीं मावळे
कांहीं काळ समाधि-मग्न जणु मी राहूनि भानावरी
आलों तों नयनांतुनी प्रसवली दुःखाश्रुंची निर्झरी  १

वेगें वाहति आंसवें न धरवे आवेग वक्षस्थला,
बोला वाव न सांपडे लव, मति-व्यापार झाला लुला
चालेना तिळही विचार-बळ त्या काळीं विकारावरी,
निद्रेनें परि शेवटीं निजविलें मातें स्वमातेपरी  २

### ( २ )

येवोनी तव पत्रिका कुशलिनी सप्ताह ना जाहला,
वार्ता दुर्धर येइ तोंच दुखणें कीं घोर आलें तुला,
माता आणि पिता, तसे जन दुजे मुंबापुरीं धांवले,
हें ऐकोनि स्वतांस मीं कितितरी मित्रा ! तदा दूषिलें  ३

तूं माझा प्रिय मित्र प्राण असशी तूं चालता बोलता
संकोची, तुसडा स्वभाव मजला झाला परी शासिता !
जाई गेहिं न मी तुझ्या म्हणुनि ती वार्ता न आधीं कळे
भेटीला तव अंतकालिन सख्या ! मी अंतरें त्यामुळें  ४

शुश्रूषा करण्या तुझी त्वरित मी याया निघें त्या स्थलीं
तों वज्रासम वृत्त निष्ठुर कळे, आशा पुरी लोपली !
शोकावेग न सोसवे प्रबल, तो अंतीं मला नीजवी !
तों मित्रा ! तव हस्त प्रेमळ मला स्वप्नीं हळू हालवी ! ५

निद्रा सारुनि दूर तत्क्षणिंच मी त्वद्दर्शनार्थी उठें,
तों दुःखीं मज लोटिलें पुनरपी सत्यें सख्या ! उद्धटें
निद्रा होउनि रुष्ट ये न फिरुनी मत्सन्निधीं प्रार्थितां
आक्रोशें रिझवी मना तव सखा आधार तो त्या अतां ६

( ३ )

आईवीण जसें स्तनंधय, तसा झालों तुझ्यावीण मी
आधारें तुझिया कधीं न खचलों येतांहि मी संभ्रमीं
आतां मी मुकलों तुला सततचा, कर्तृत्व दावूं कसें ?
आकांक्षा मम सर्व फोल ठरती होणार माझें हसें ७

मातेला चिकटूनि बालक बसे, जातें न कोणाकडे;
अंकीं बैसुनि तें तिच्या करि किती क्रीडा प्रमोदीं बुडे;
मातेसी मुकतांच तें धडपडे, हो दीन तें बापुडें
मात्रंकस्थित जें जगा भुलवितें तें होतसे वावडें ८

होईना मन मोकळें मम अतां, बोलें न कोणासवें
कोणाशीं करुं मी विनोद, जरि ही पूर्णा धरा मानवें ?
आकारें नर, हिंस्र मी पशुपरी वृत्तीवरोनी गमें
एकाकी, रसहीन, भारसम मी निर्विण्ण विश्वीं भ्रमें ९

(४)

आतां त्वत्स्मृति आसरा मज उरे, तो ठायिं ठायीं मिळे,
बाल्यापासुनि कीं अखंडित असूं एकाच गांवांतले;
ह्या स्थानीं बसलों, कथा बहुविधा केल्या इथें या स्थलीं,
होतों भांडत, खेळलों किति इथें, येथें भुतें पाहिलीं १०

शैलाग्रीं बसतां तुझें स्मरण ये एकाच काळें अशीं
स्थानें दृक्पथिं ठाकतीं कितितरी, कल्लोळ हो मानसीं;
चित्ता स्वास्थ्य मिळावया स्मृति तुझी आधार मीं घेतला
दुःखावेग परी बलिष्ट फिरुनी पूर्वींपरी जाहला ११

जावें मी सदनीं तुझ्या प्रतिदिनीं, तें क्षेत्र वाटे अतां
भेटोनी समदुःख बांधव तुझे दुःखासि ये सह्यता,
माता आणि पिता, सहोदर तुझे प्रेमें मशीं वागती
त्यांचें दर्शन रोज रोज मिळण्या वेडावली मन्मती १२

मातेशीं सखया, तुझ्या अजवरी मी बोललों एकदां
सांगें मी तिजला तुझी उतरली आद्या परीक्षा यदा
तेव्हांपासुनि मूकवृत्ति वरिली, ती नष्ट होई अतां
तीतेंही सुख वाटतें मजसवें गोष्टी जुन्या बोलतां १३

(५)

तातांचें तव शांत चित्त बघुनी आनंदलों अंतरीं
पुत्राच्या विरहें न सात्विक मुळीं तद्वृत्ति हो बावरी
देवाचे भजनीं न, पूजनिं न वा कांहीं पडे न्यूनता
नित्याचा क्रम चालला, जणु असे सार्वत्रिकी स्वस्थता १४

प्रेमें सोदर धाकला तव मशीं वागे कधीं काळचा
शोकें विव्हळ तो तुझ्या मम अतां भाऊच हो पाठचा!
चाले वाद सदा, न एकमत हो केव्हां जरी आमुचें
दोघे आचरितों व्रत प्रतिदिनीं आम्ही जणूं भेटिचें १५

मित्रा! तूं असतां तुझे कुलज जे दूरस्थ होते मला
ते आतां प्रिय जाहले निकटचे, त्यांचा लळा लागला!
जन्माची परि जी तुझी सहचरी दूरीच अद्याप ती
प्रेमाचें दिसलें न पुष्प तुमचें हा काल नेत्राप्रती १६

( ६ )

विद्यामंदिर बंद होउनि घरीं विद्यार्थि आले जरी
आला नाहिंस तूं, असंभव पुरा येशील केव्हां तरी!
आतां मात्र मला न धीर धरवे, वेडाच झालों खरा,
पाहोनी परलाभ दृष्टिपुढती हानी कळे अंतरा १७

भेटे मित्र कुणा, कुणा सुत तसा, बंधू कुणा भेटतो
गोष्टी सांगुनि, खेळ खेळुनि सदा जो तो सुखीं रंगतो
उद्यानीं, गिरिकंदरीं, सदनिं वा पुष्पें फळें सेवुनी
पक्वान्नें कधि खाउनी करिति ते आनंद रात्रंदिनीं १८

नक्षत्रीं फुललें नभोगण कधीं, ज्योत्स्ना प्रसन्ना कधीं
सूर्याचे उदयास्त, वा खगतती, केव्हां जलाचे निधी,
चित्रें सुंदर, गोड गोड कवनें, संगीत चेतोहर,
ह्यांतें संतत सेविती रसिक ते एकत्र सौख्यातुर १९

सारे मग्न सुखीं सभोंवतिं, परी मी कोरडा सागरीं
त्यांचें पाहुनि सौख्य मी हळहळें, नाहीं परी मत्सरी
त्यांसंगें मिसळें न मी, विरस कीं व्हावा न माझेमुळें
एकाकी फिरणें, मनांत झुरणें हें एक ह्या राहिलें २०

(७)

पाहें बालक एकदां मधुर मी गेहीं तुझ्या रांगतें
बोलें ना परि मायबाप अपुले जें तत्क्षणीं सांगतें
त्या मीं घेउनि चुंबिलें, हंसविलें, खालीं वरीं झेलिलें,
नाना खेळुनि खेळ त्या रमविलें, स्वात्म्यासि तोषीयलें २१

छाया वस्तुसमीपता सुचविते, तेवी तुझें बालक
देखोनी मन दर्शना वहिनिचे जों जाहलों उत्सुक
जातां तों दिसली पुढून मम ती विद्युत्प्रकाशा अशी,
अंगा कंप सुटे, मना भ्रम पडे, ये शून्यता चक्षुंसी २२

आसन्नप्रसवा हिची रुचिर तीं मूर्ति स्मृती साठवी
आतां हें विपरीत रूप नयना सद्यःस्थिती दाखवी
मृत्यू आयकिला तुझा, अजवरी प्रत्यक्ष ना पाहिला
त्याचें दर्शन आज हो परि हिचे भालप्रदेशीं मला २३

(८)

विश्रामाश्रम नाम आश्रम तुझा रानींवनीं बांधिला,
शांतीचा प्रिय वास, सृष्टिसतिचा जो लाडका जाहला,
उत्तुंगाचलिंच्या वसे पदतलीं जो एकला सर्वथा
वृक्षाच्छादित राजमार्ग पुढती जो अक्षयीं वाहता २४

वायूच्या लहरी जिथें रविकरा शीतत्व देती सदा
जेथें निर्जनता सदैव रसिकां होते अती तोषदा
पुष्पें हांसरिं, बोलके खग, फळें जीं गोड अभ्यंतरीं
वापी तोयमया, मना वितरितीं आराम नानापरी २५

येथें तूं वहिनीसवें विहरतां पाचारिलें आदरें
यायाचें परि भाग्य हें अजवरी नाहीं मला लाभलें
आतां अध्ययनार्थ येथ तुझिया ये सोदरासंगतीं
चित्ता टोचित माझिया परि सदा ती पूर्वकालस्मृती २६

कांतासंगतिं येथ तूं विहरसी, तें कल्पनेला दिसे
होणें दृश्य न तें अतां, म्हणुनि हो मच्चित्त वेडें पिसें
चित्रें हीं तव येथ जीं विखुरलीं सर्वत्र तीं पाहतां
लागे अध्ययनीं न चित्त सुहृदा, मीं त्या बळें लावितां २७

(९)

जेथोनी रविबिंब येत उदया, अस्ता जिथें जातसे
ज्यामी क्रीडन वायुचें रुचिर तें हो दृश्य ऊर्मीमिषें,
जा विश्वीं करण्या विहार गमतो निर्धास्त मार्गापरी
नौका विस्तृत, सान वा, विखुरल्या ज्याचे शरीरावरी २८

झाला सुंदर मेखला कटितटीं मुंबापुरी ! तूजला
तो हा सागरराज भासत परी शत्रूच साचा मला
मित्राचा वध माझिया यम करी, वन्ही तया जाळितो
रक्षा घे उदरांत नीच तव हा, ती ना पुन्हा दावितो २९

(१०)

हे प्रासाद विशाल, उच्च गमतें आकाश त्यां ठेंगणें,
ज्यांचें भूगत एवढें विभव कीं लेखी कुबेरा उणें,
रात्रीं दीप असंख्य पाहुनि दिसे भूपृष्ठिं तारांगण
ज्यांची ही रचना खरोखरि असे सृष्टी-कला-मीलन ३०

ते प्रासाद असोत मोहक, मला त्यांचें नको दर्शन
एकानें सुहृदा, पुरें फसविलें मृत्यूमुखीं लोटुन
राहे तो सुखसोयि त्यांत बघुनी विश्वास्य त्या मानुन
आणोनी परि अंतकास, सुहृदा त्यातें करी अर्पण

(११)

तूं मुंबापुरि नीच कीं वितरिसी 'सोनापुरा' आश्रय,
हा वन्ही मृत मानवी तनुवरी संपादि तेथें जय!
वीरश्री तव सत्य हीच अनला! कीं त्या मृता जाळिलें,
हा केला कसला पराक्रम, तुझें हें शौर्य बा कोठलें? ३२

द्यावा शाप तुला भयंकर असें मुंबापुरी! वाटतें
जन्माचें मम वैर साधुनि तुंवा संपादिलें काय तें?
काया ही क्षयिणी, तिचा क्षय तुवां केलास मुंबापुरी!
त्याची कीर्ति असे अमर्त्य, तव ती पाहील मृत्यू परी! ३३

(१२)

शोकाचा परि दास मी बहकलों हें साच वेड्यापरी!
त्याचें दर्शन होय अंतिम मला येथेंच मुंबापुरी!
आलों येथ तदा गृहांत तुझिया आम्ही परीक्षामिषें
झाला नंतर जो वियोग अमुचा, भाळीं सदाचा वसे ३४

आणी ओढुनि आज तीच फिरुनी येथें परीक्षा मला
त्या योगें स्मृतिशेष दर्शन तरी लाभे मला या स्थलां
मातें स्थान पवित्र हें, न घडणें याची मला विस्मृति
घ्याया दर्शन येथ येइन पुन्हा, मुंबापुरी तूं कृती ! ३५

( १३ )

मित्रा ! तो दिन मोददायक खरा, भाग्यें मला सांपडे,
पत्नीचें तव काव्य गोड सहजीं हातांत माझ्या पडे;
तें बोलाहुनि गोड वाटत मला कीं गूढ तच्चित्तिचें
झालें दर्शित तेथ, जें न कळणें कोणासही तद्वचें ३६

कांतालागुनि भावना अनुपमा नांदे तिच्या जी हृदीं
पुत्रा लक्षुनि वाहते हृदयिंची जी प्रेमपूर्णा नदी,
साकल्यें कवनीं नितांत मधुरीं त्यातें तिनें दाविलें !
शोकें विव्हल ती, तरी मन मुळीं नाहीं तिचें भंगलें ३७

( १४ )

स्वर्गी तूं वससी तरि स्थिर तुझें कांतागत प्रेम तें
राहोनी अतिदक्ष जें हित तिचें तेथोनिया साधितें
'विद्याभूषण सत्वरीं चढवितों, बाळा ! स्नुषेच्या गळां'
ताताचें वच ऐकुनी मग शिवे पिंडा तुझ्या कावळा ३८

प्रेमासी तुझिया असे सहचरी ती योग्य सर्वांमतें
भक्ती निश्चल जी तिची गुरुजनीं कोणा न ती मोहिते ?
विद्यादेवि सखी मिळे कधि अतां आत्मस्नुषेलागुनी
ताताशी तव लागली प्रबल ही चिंताच रात्रंदिनीं ३९

कन्याशिक्षण नावडे बहुजना, तें निंद्यही वाटतें
वैधव्यें हत झालिया तिजसि तें दुष्प्राप्य, दु:स्पृश्य तें
ऐसा रूढिविरोध दुर्धर जरी, वाटे स्नुषा–शिक्षण
तातासी तव जन्मकार्य, तिज कीं तें भूषणीं भूषण ४०

जाई अध्ययना कुमार शिकती त्या पाठशाळेंत ती
एकाकी गतभर्तृका म्हणुनि ती टीकार्ह वाटे अती
जाणोनी व्यवहार वागत परी सच्छील ती सात्विक
विद्येची व्यसनी, म्हणोनि थिजले तात्काळ आक्षेपक ४१

मी अध्यापक जेथ तेथ वहिनी पाहूनि विद्यार्थिनी
इच्छा अंतरिंची पुराण पुरली आनंद झाला मनीं
मित्रा! तूं असतां नसे परिचिता माझ्यासवें अल्प ती,
आतां निश्चित आपुल्या अचलता येईल नात्याप्रती ४२

* * *

## द्वितीयावेग

### ( १ )

होऊनी इतिहास–लीन तुजला हो एक संवत्सर
मित्रा! तो दिन, आजचा दिन पहा, हो केवढें अंतर
तेव्हांही रडलों, अतांहि रडतों, ती तीव्रता ना परी
आशा दग्ध पुरी तदा, लव अतां ती पालवे अंकुरीं १

दग्धाशा वहिनी तदा दिसत जी कर्तव्यमूढांतर
आतां शोक निरोधुनी, धरुनि ती विद्यार्जनीं आदर
कर्तव्यें करिते मुदें जननिची, तेवी स्नुषेची सती;
भावी काल करील उज्ज्वल अशा ती दावि चिन्हांप्रती २

मित्रा! बालवया असोनि वहिनी चातुर्यथोरा असे
तें पाहोनि तिचा अलौकिकपणा चित्तात माझे ठसे
सासूतें शिकणें तिचें न रुचतें, तें सासऱ्यातें परी
वाटे इष्ट, तरी सुशील वहिनी संतुष्ट दोघां करी ३

सासूतें विसरे न एक पळही, तच्छन्द ती झेलिते
सैंपाका करि तेधवांच वहिनी अभ्यासही साधिते
हातीं ती करि भाकरी परि असे पाठांतरीं तन्मन!
भाजी भात शिजे बघून सुहृदा! ती वाचिते वाचन ४

सासू निद्रित पाहुनी निजतसे, आधीं तिच्या ती उठे
पोतेरें बघ घालुनी न बसली, ती केरही काढिते;
कामाचा भर घेउनी करिं शिरीं वर्गात वैशिष्ट्य तें
पाहोनी पदधूलि कां वहिनिची तीर्था अशी वाटते ५

सांगे काम तिला कुणी शिशु जरी वा थोर तें ती करी
केव्हांही कटु ती न बोलत, तिची मुद्रा सदा हांसरी
नाहीं हट्ट तिचा कधीं तिळभरी वस्त्रांत अन्नांत वा
विद्येचा कर, सासुचा कर तसा वाटे शिरीं कीं हवा ६

घाला बालपणींच नाथनिधनें आला खरा तीवरी
दुःखें जर्जर ती परी नयनिंचे अश्रू सदा सावरी
वृत्ती उल्हसिता सदैव धरिते, सत्पुत्र–शोकार्त कीं
सासू धैर्य धरो, बघूनि अपुली चर्या सदाची सुखी ७

कामानें थकते घरांत, गमतो अभ्यासही जाचक
कर्तव्य–द्वय तें अखंड करणें वाटे जरी बाधक
मित्रा! ती श्रमते, तरी न किमपी उत्साह कोमेजला
अर्धांगी मिळुनी अशी अरसिका! हा लोक तूं सोडिला ८

(२)

बाळाशीं तव खेळतां न कळतें गेला किती काळ तें
वाटे घेउनि बालरूप फिरुनी आलास या भूमितें
गेहीं खेळ तया रुचे न, तरि मी बाहेर नेईं मुदें
त्याची संगत सेव्य संतत मला, ती थोर आनंद दे ९

तेव्हांपासुनि जे विचार हृदयीं कोंडोनि गेले पुरे
त्यांतें वाव अतां मिळे, मन खुले, जें आजवेरी झुरे
अर्धांगी तव ती, यथार्थ करि तें नातें मशी वागतां
कीं माझेविशिं वृत्ति जी तव, तिची ती पाहतों तत्वतां १०

(३)

जोराची जलवृष्टि होय, गमतें आकाश कीं कोसळे
दाणादाण समस्त होउनि जवें मार्गांत जो तो पळे
जेथें धूळ उडोनि ताप नयनां होई, अतां त्या पथीं
पाणी वाहतसे प्रचंड, न दिसे पांथस्थ किंवा रथी ११

ऐशा मी समयीं निघें विहरण्या कीं वृष्टिनें झोडिलें,
होतें गेह तुझें समीप, शिरलों तों शून्य तें आढळे
होता दुर्दिन तो खराच, न गमे उत्साह कोठें लव,
एकाकीं बसलों तुझ्या सदनिं मी, वर्षाव तो भैरव १२

मित्रा! तूं दिससी गृहीं विहरतां, माझेसवें बोलतां
गोष्टी सांगसि त्याच त्या; अभिनवा कां झांकिसी सर्वथा
ऐसें मीं पुसिलें तुला, वदत तें जाणीव माझी मला
बोले मित्र न हा, तुझी स्मृतिपरी ही खेळवीते तुला १३

(४)

आम्ही बोलतसूं कितीतरि तुझ्या गोष्टी जुन्या वा नव्या
दोघे भक्त तुझे, तुझ्याविषयिंच्या वाटे कथा कीं हव्या
सांगें मी तिजलागिं सर्व सखया! एकत्र आलों कसे
होतों आपण कोण कोण, उरलों दोघेच हे पूर्विंसे १४

कोठें आपण खेळण्या जमतसूं शाळेंत होतों तदा
केव्हीं भांडण भांडलों, चिडुनि मी मारीं कसा सर्वदा,
चेष्टेनेंच तळ्यांत त्या बुडवितां तो मित्र हो घाबरा
मेला त्याच स्थलीं स्वतां बुडुनि जो दे दुःख आम्हां पुरा १५

तूं ऽमेलनिं राजपुत्र नटसी, हत्या तुझी जाहली
होतें नाटक तें, तरी तव किती भ्याली तदा माउली,
होतासी अपुच्यांत गायक, फुटे आवाज तेव्हां कसा,
त्या योगें तव मित्र–शिक्षक–गणीं सर्वत्र झाला हंशा १६

माझा मित्र खरा असे कवण तो, तूं कीं दुजा, याविशीं
केला वृद्धवरें उगा कलह तो, ती मौज झाली कशी,
तो झाला विजयी, तुला अयश ये, वृत्तांत तारेंत हा
आला; तो कथितां समस्त तिजला आनंद झाला महा १७

कॉलेजांत कसे सुखें वसतसूं खोलींत एका तदा
आचारी तव वृत्ति ती नियमिता झाली किती सौख्यदा
गीतापाठ सकाळचा न चुकला तेव्हां कधींही तव
खोलीची तव टापटीप बघतां वाटे जुनें तें नव १८

रात्रीचे समयीं समक्ष तुझिया मीं ध्येय तें निश्चिलें
द्रव्याचें मज साह्य अक्षय तुवां तेव्हांच आश्वासिलें
देशी वस्तु समस्त तेथ, असली खोली निवासा मम
झाली निश्चित तेधवां तव गृहीं, हा प्रीतिचा विक्रम १९

भक्तीनें सुमनें सुवासिक तुला दे प्रत्यहीं आणुनि
मद्वृत्ती तव संनिधीं अतिशयें जाई सदा रंगुनी
रंगें सांप्रत ती तशी तव कथा मी मागल्या सांगतां
श्रोता सात्विक भाव–बद्ध मिळतां तत्काळ तल्लीनता २०

(५)

पत्रें प्रेमळ जीं तुझीं स्वकरिचीं, त्वद्भावना बिंबिता
जेथें पूर्ण दिसे, तुझ्या हृदयिंचा आदर्श जो तत्वतां
जीं वाचोनि वियोग–काळ तव हा मी विस्मरें कांहिंसा
आहे ज्यांवरती तुझा उमटला प्रत्यक्ष मित्रा! ठसा २१

जीं दृग्गोचरसें प्रमाण अपुल्या प्रेमास भूमंडळीं
जीं हा काळ कुणास गुप्त धनशीं नाहींच मीं दाविलीं
जीं–ठेवा बहुमोल–रक्षण करी मी दक्षता घेउनी
तीं पत्नीकरिं मी तुझ्या वितरितों ती योग्य त्या स्वामिनी २२

(६)

काव्यें प्राकृत, आंग्ल, संस्कृत किती आम्हीं सवें वाचिलीं;
वाचोनी नव काव्य मार्मिकपणें चर्चा असे चालली
शूराची कविता तिला 'शिलरचा बंदी' अती आवडे
वाचोनी रसपूर्ण वर्णन तयीं आवेश तीतें चढे २३

काव्यें नूतन वाचुनी मजसि ती दावी स्वतां आपुलीं
जीं ऐकोनि रसाळ वाटत जणूं ही शारदा भेटली
मित्रा! सद्‌गुणराशि ती गतधवा केली कशी ईश्वरें?
वाटे सद्‌गुण हे स्फुरोत म्हणुनी तो नेत तूंतें त्वरें २४

(७)

मित्रा तूं अपुल्या विवाहसमयीं रूढी नवी पाडुनी
केलें थोर समाजकार्य सम ती निंदा स्तुती लेखुनी!
निर्लोभी परि तूं, विवाह–सुख कीं अत्यल्प येतां करीं
झालासी परलोकचा, न रमवी तूंतें जगन्माधुरी २५

भार्या रूपवती, सती, गुणवती, विद्यावती प्रेमला,
माता–तात–सहोदरादि कुलजां तूं वाटसी 'आपुला'
मित्रांचा परिवार थोर, यश ये संपूर्ण विद्यार्जनीं,
काया रम्य, सतेज उच्च, सुहृदा सत्कीर्ति नांदे जनीं २६

सोडावें परि सर्व हांसत तुवां मित्रा! कसें यौवनीं
होवोनी निरुपाय वा गमन तूं केलेंस स्वर्गांगणीं?
सारें गूढ अम्हांस, एक कळतें गेलास तूं येथुनी
आतां आवडती न येइल पुन्हां मूर्ती तुझी दर्शनीं २७

(८)

मृत्यू विक्रम गाजवी जगभरी श्रीमंत रंकावरी
तो मानी सम बाल–वृद्ध तरुणा, कीं ग्रास सर्वां करी,
तो निर्मूलन–शूर निर्जिव जगीं, तारांगणीं तो जयी
कोणा आज उद्यां कुणा हरुनि तो ने विश्व सारें लयीं २८

होतो वस्तु–विनाश, तोंच उदिता वस्तू नवी त्या स्थलीं
न्यूनत्वा रमणीयता तिळभरी जाते न भूमंडलीं,
संहारक्षम, निर्मितिक्षम अशी दा–रूप सृष्टी सती,
ज्ञाते जाणुनि तत्व हें स्थिरमती, शांती सदा त्यांप्रती २९

( ९ )

हें कांहीं न कळे अम्हांस न वळे; दृग्गोचरीं सत्यता
मानोनी रडतो अदृश्य नयनां होतां पदार्थ स्वतः!
मित्रा! भेटसि तूं न, संभव पुन्हां नाहीं कधीं भेटिचा,
आम्हां संशय अक्षयीं छळितसे, मृत्यूच तो आमचा ३०

आतां उच्च-पदस्थ तूं जरि कसें तें भव्य आम्हां दिसे?
पाहोनी विभवा तुझ्या स्वहृदया आणूं कसें बाळसें
सेवावें तुज आलिया अवनती आम्हीं कसें सांग तें
कर्तव्या न मिळोनि वाव लवही वेड्यापरी धांवतें! ३१

( १० )

शंकासागरिंच्या तुफान लहरी सर्वत्र या वेढिती,
चित्तीं गोंधळ घोर माजुनि, धृती निष्प्राण हो संप्रती!
मित्रा! दीन अम्हांसि पाहुनि कसा साह्यार्थ ना धांवसी?
कां झाली तुज विस्मृतीच अमुची? वा दैन्य आलें तुशीं? ३२

भेटावें तुज वाटतें, न दुसरा त्या मार्ग मृत्यूहुनी!
मृत्यूनें परि तृप्त होय मनिषा ग्वाही न दे ही कुणी!
ऐशी दुर्बलता दिसे, तरि मना दुर्दम्य ती वासना!
स्पर्शे ना कधिंही बलिष्ठ असुनी नैराश्य प्रेमी जना ३३

( ११ )

बाळा बैठक वाम बाहु करुनी, त्या तर्जनी दक्षिण
लावुनि अधरास हांसवित ती, तो हांसतां पाहुन
होई हास्य–मुखीं स्वतांच वहिनी! या माय–लेकां असे
पाहोनी न उचंबळे कवण तो! बेभान मी होतसें ३४

दो काखेंत करद्वयें धरुनि त्या उंचावरी फेकिते
खालीं येइ तसा फिरूनि वरती फेकूनि त्या झेलिते
बाळा खेळविते प्रसन्नवदना, त्या मी तसा देखुनी
चुंबोनी वहिनी उरस्थलिं धरी! हें दृश्य ध्यावें मनीं ३५

अंकीं निद्रित बालकास पदरें झांकोनि, डावा कर
तद्भाळीं, उजव्यांत पुस्तक, अशी ही वाचनीं तत्पर
पाहोनी वहिनीस या दिसतसे वात्सल्य विद्या–रती
एकत्र स्थित, चित्र हें दिसतसे भाग्येंच नेत्राप्रती ३६

चित्रें मोहक हीं अशीं वहिनिचीं मी प्रत्यहीं पाहतों
शोकक्लिन्न मनांत वत्सलपणा हा केवढा राहतो!
बाळा खेळवुनी मना रिझविणें वाटे तुला गोडसें
मित्रा! क्रीडनशील तूं न जवळी हें न्यून चित्रीं दिसे ३७

मित्रा! एक दिनीं विवाह तव हो त्वत्सोदराचा तसा
पाहोनी परि दृश्य आज नव हें मूढत्व ये मानसा
हा! सौभाग्यविहीन ती, विधुरता आली तुझे सोदरा
तत्कन्या जननीविहीन, वहिनी हो माय आतां तिला ३८

उत्संगीं नव बालिका सतत ती, ती एक सेव्या हिला
कर्तव्यें दुसरीं हिला न उरलीं, अभ्यासही राहिला
निष्ठेनें करि नित्य पालन तिचें, मातेकडे बाल ती
गेली दों दिवसांत लोटुनि परी दुःखांत सर्वांप्रती ३९

वाणीनें, कृतिनें, मनें विमलशा विश्वास संपादुनी
सर्वांना प्रिय, सेव्य होय सदनीं, शाळेंत ती सद्गुणी!
कर्तव्यें परि दोन हीं करुनि ती गेली थकोनी अती
माहेरीं मग शिक्षणा गुरुजनें जाया दिली संमति ४०

राहे एकचि वर्ष येथ वदिनी, माझें परी निश्चित
झालें बा! हित कीं, तुझी सहचरी मन्मित्र हो शाश्वत
प्रेमाचा अपुला प्रवाह फिरुनी प्रत्यक्ष हा वाहतो
दुर्भाग्यीं मम भाग्य हें, विरल जो जें भाग्य हें भोगितो ४१

* * *

## तृतीयावेग

### (१)

झाला पिंपळ पर्णहीन मृतवत् छाया दिसे त्यावरी,
ये माघांत दशा अशी तरुवरा प्रत्येक संवत्सरीं,
येऊनी नव पालवी टवटवे हा वृक्षराट् सत्वरीं
छायेनें रवितापतप्त पथिकां संतुष्ट सर्वां करी १

पाचोळा भवतीं बघून न कुणी तत्सन्निधीं बैसतो
पर्णें वाहुनि जीर्ण ती पवन ने, दासा असा ग्गतो
जेथें वृश्चिक, सर्प निर्भय वसे, तेथें अतां सज्जन
बैसोनीं गुजगोष्टि गोड करिती संतोषवीती मन २

प्रातःकाळ, दुपार, सांजसमयीं वृक्षाचिये खालतीं
विश्रामार्थ अनेक लोक मिळती विश्राम ते पावती
नित्याचा पररक्षणार्थ असती संपन्न तूं वैभवें
वृक्षा! प्रेतकळा तुला क्षणिक ही, ती रूप देते नवें ३

(२)

मित्रा! प्रेतकळा न केवळ परी तो प्रेत झाला स्वतां
होई पिंपळ जीर्णपर्ण, न परी तो होय प्राणें रिता!
त्याची लुप्त न चेतना, म्हणुनि त्या येते पुन्हां पालवी
प्राणा अंतरतां कशी मम सख्या! लाभेल काया नवी? ४

त्याचा होउनि देह नष्ट पुरतें हें आज वर्षद्वय
प्रेमाचा न परंतु तंतु तुटला, तो नांदतो निर्भय
अर्धांगी स्मरणीच घेउनि तुझी वेचीत सारा दिन
भेटाया तिज भावनेस अपुल्या मी धाडिं पत्रांतुन ५

नेत्रां हांसविते, मना रमविते, जी चित्सुखा अर्पिते,
ती त्वन्मूर्ति अदृश्य पार्थिव, तरी प्रत्यक्षशी भासते,
नाहीं तें दिसतें कसें? सकल वा हें वेड मित्रा! मम?
माझा नेइल नष्टते कवण तो चित्तांतला हा भ्रम? ६

सारे सांगति नाहिंसाच सखया! झालास तें ना पटे
माझें जीवित हें अजून तुझिया स्वामित्व-भावीं नटे;
स्फूर्ती जी दिधली तुवां मजसि ती शासी मदायुःक्रम
नाहीं केवळ बोल हा, कृति असे ती पूर्णतेनें मम ७

(३)

पाहीं ही तरुणी, गृहीं तव गड्या! आली नवी पाहुणी
विद्येची अभिलाषिणी, अधनता देते परी जाचणी,
वैधव्यें करपे, स्वकांति हरपे, जीवास कंटाळली,
कारुण्यें जणु मूर्ति ही घडवुनी चिंतानलीं भाजिली ८

कर्णीं ये मम वृत्त कीं युवति ती आहे विवाहोत्सुक,
भार्या ती अनुरूप होय मजला शीलान्विता सात्विक
दे प्रोत्साहन पूर्ण तीस वहिनी, देई तसें ती मला,
दोघांचा ठरला विवाह मम तो हेतू पुरा जाहला ९

मित्रा! तूं असतांच लग्न विषयीं जें ध्येय माझें ठरे
तूं गेल्यावरिही गड्या! वहिनिचे तें होय साह्यें खरें
साक्षी ठेवुनि तूजला नियम जो मीं घालुनी घेतला
तो आतां अनुमोदनें वहिनिचे मी सर्वथा पाळिला १०

(४)

प्रेमाचे प्रियबंधनीं मनुज कां स्वातंत्र्यही हारवे?
प्रेमाचे पुढती स्वतंत्र मतिही कां होमिली मानवें?
प्रेमापायिं अरण्यवास वरिला प्रासाद सोडोनि कां?
प्राणाची परवा न मानव करी, प्रेमापुढें तो फिका ११

लोहें चुंबकसंन्निधीं स्ववशता–शून्यत्व संपादणें
पृथ्वीपासुनि वस्तुचें पळभरी दूरी न वा राहणें
सूर्याभोंवति वा सदैव फिरणें माला ग्रहांची मुदें,
हा सृष्टिक्रम आवघा अचल, तो विश्वाप्रती स्थैर्य दे १२

विश्वाचे व्यवहार थोर घडती या शुद्ध प्रेमास्तव
स्वप्राणाहुति देत वीर म्हणतो युद्धास भाग्योत्सव
वाटोनी प्रिय धर्म, देश नय वा अत्यंत त्याकारणें
दास्या स्वीकरणें तसेंच मरणें त्या वंद्य, नाहीं उणें १३

पुष्पेंही त्यजिती स्वमातृलतिका, देवापदीं स्वार्पण
प्रेमानें करिती, परी मिळविती सामर्थ्य तें नूतन
होवो नष्ट सुगंध, कांति मधुरा, कृष्णत्व येवो पुरें
तो निर्माल्य शिरीं धरोनि अपुल्या सद्भक्त तो उद्धरे १४

प्रेमें स्वीकृत दास्यभाव करितो स्वोद्धार, अन्यार्थही
तो साधी सहजी म्हणोनि बुध ते त्या ठेविती संग्रहीं
होतो कुत्सित भाव नष्ट अपुला, एकाग्रता लाभते
घे संकोच अहंपणा, विकसते निःस्वार्थता शोभते १५

(५)

टाकोनी नर जीर्ण वस्त्र, वसना स्वीकारितो नूतन,
आत्मा तेंवि नवीन देह धरितो काया जुनी त्यागुन
गीतेचें वच हें प्रमाण, तरि ती जीर्णा तनू ना तव
किंवा वृद्ध न तूं, न सिद्धमति वा, ना भोंति दुःखार्णव १६

सर्वस्वीं अनुकूलता असुनि तूं कां देह तो टाकिला?
देशाची परतंत्रता न बघवे कां देशभक्ता! तुला?
देवासन्निध ज्ञाउनी स्ववदनें त्या दुःस्थिती सांगुनी
'स्वातंत्र्या सदुपाय सांग' म्हणण्या गेलास तूं येथुनी १७

(६)

युद्धाग्नी भडके जणूं दशदिशा ज्वालामुखी पेटला,
व्योमीं, सागरिं, भूवरी न बघवे, संहार हा चालला,
लोकीं भीषणता बलिष्ठ ठरली, सौंदर्य गेलें लया
हाहाकार जगांत घोर उठला शांतीस नाशावया १८

पाहोनी रुधिरौघ लज्जित नद्या विख्यात ज्या भूवरीं,
प्रेतांची नगरांत रास बघुनी भीती स्मशानांतरी
उद्यानास्थित रौद्रता भिवविते ही वाळवंटा अतां
भीतीनें पळती भुतें बघुनिया ही मानवी क्रूरता १९

ह्या होमांत अनेक मित्र, सुत, वा बंधू, पती अर्पिले
ज्यांसाठीं हृदयें असंख्य उठलीं मित्रा! वियोगानलें,
वीराचें मरणें न दुःखद तसें शय्येवरीचें जसें,
तें वीर्यें करितें परा अमर; हें अन्या लया नेतसे २०

मित्रा! मृत्यु रणांगणीं तुज जरी येता, न भाग्या कमी,
नाहीं तें परि भाग्य भारत–सुता दास्याचिये कर्दमीं;
वीरश्री स्वकरें शवासि अपुल्या घालील माळा कधीं?
वांछा उत्कट तृप्त होइल कशी ही ह्याच जन्मामधीं? २१

(७)

अंधारी रजनी, पडे चहुंकडे काळोख, ही शांतता
पाहोनी गमतें नुरे महिवरी प्राणीच कोणी अतां!
राहें मी सरिता–तटावरि उभा, भोंती चिता या किती
तज्ज्वाला तिमिरास घास करण्या प्रक्षुब्धता पावती २२

झाली ही रचुनी चिता, तिजवरी हें प्रेत मीं ठेविलें
अग्नी लावियला तयास, पवनें तत्काळ तें जाळिलें!
पाहीं मी तनु जी सजीव नुकती ती वन्हिनें व्यापिली
मातीची तनु मृत्तिका पुनरपी व्हायास ती लागली २३

कांहीं काळ विचारमग्न बसलों मी एकला त्या स्थलीं
कांहीं एक सुचे विचार न पुढें निःस्तब्धता लाभली
कोठें मी बसलों? कशास बसलों? हें काय भोंतीं दिसे?
तें काहीं न कळे, बसे दृषदसा, माझें मला ये हंसें २४

ज्वालाग्नी भडके तसा परत मी जाया निघालों गृहीं
हातीं कंदिल, मंद पाउल, अधो-दृष्टी क्रमीं मी मही
येतां प्रांत नवीन, जागृत मती झाली, विचार-क्रिया
होऊनि सुरु कल्पना उपजल्या नाना मनीं माझिया २५

क्रौर्यें मानव मानवास तिकडे नेई लया मी म्हणें
येथें कोण अनर्थ घोर करितो हा कोणत्या कारणें?
सर्वांची तनु जीर्ण होय कुटुनी एकाच वेळीं अशी
ये निष्पाप परार्थसाधक अशा निर्वंशता ही कशी २६

हे नारी नर पुष्टदेह असुनी जातात अस्ताप्रती
कोडें हेंच पडे; बलिष्ठ ठरला हा इन्फ्लुएंझा अती!
शास्त्रें मानव सर्वथैव थकलीं यत्ना न लाधे जय
हा जीवावरि चालवी यम सुरी, निर्धास्त तो निर्भय! २७

(८)

विद्यार्थीगण भोंवतीं, करतलीं ही टाळ माझे असे
तोंडानें म्हणतों अभंग, भजनीं मी रंगलेला दिसें!
मित्रा! नाटक हें, अजूनि पटलें ना अंतरंगीं लव
श्रद्धावंत जनास हें रिझविण्या मी सोंग घेतों नव २८

संस्कारक्षम शैशवीं मिशनरी अस्पृश्य बालांप्रती
येशूचीं भजनें रसाळ शिकवीं, तीं व्यापिती तत्स्मृती!
तत्वें जीं ग्रथिलीं तयांत सहजीं तीं बिंबुनी अंतरीं
त्यांचें साधत धर्मकार्य, विपदा ये आर्य धर्मावरी २९

अस्पृश्योद्धरणार्थ निर्मुनि नवी मीं पाठशाला, तयीं
देई बौद्धिक पाठ केवल; परी ती खिस्तभक्तीमयी
पद्यें छात्रमुखीं बघूनि सुहृदा! ये जागृती तत्क्षणीं
हातीं घेउनि टाळ होय भजनी मी त्या क्षणापासुनी ३०

होऊनी मन एकतान सकलां आनंद लाभे अती
येती पालकही कितीक भजना, कीं प्रेम तें भारतीं,
दुर्भाग्यें परि ही सुशिक्षित जनीं श्रद्धा विनोदास्पद,
श्रद्धाहीन पुरे तयांत दुबळे दुःश्लाघ्य वा दुर्मद ३१

विद्याभूषित आमुचे विसरती देवास, यत्नास वा;
तद्विश्वास न ईश्वरीं, नच मुळीं त्या आत्मविश्वास वा,
ते सर्वोत्तम वावदूक, नसते कर्तृत्व तत्संग्रहीं
नैराश्यें नटले, जगास विटले, वाटे नको जीवही ३२

विद्याभूषित मी करूं बघतसें अस्पृश्य विद्यान्वित
माझा तो परि जाहला गुरु, मला तो दावि माझें हित
त्यांचें प्रेम बघूनि नित्य भजनीं, प्रारंभिचें सोंग तें
टाकोनी भजना यथार्थ बनणें कर्तव्यसें वाटतें ३३

(९)

आर्यावर्त 'सुवर्णभूमि' म्हणुनी विख्यात विश्वीं असे
त्या भू 'लोहमयी' अकांचन करी, त्यांच्या शिरीं ती बसे
पूर्वी येथ सुकाळ संतत वसे, दुष्काळ आतां सदा
उत्कर्षास न पावल्या कवण त्या आतां इथें आपदा! ३४

आह्मी आपण वीरवंशज खरे, वीरत्व गेलें परी,
येथें जन्मति रामकृष्ण, शिवबा, जन्मे अतां खापरी
स्वातंत्र्यास्तव यत्नही करितसूं, ते फोल होती परी
कीं स्वार्थी जन आपुलेच धरिती मानेवरी हे सुरी ३५

शस्त्रास्त्रीं किति सज्ज इंग्रज असे, निःशस्त्र आम्ही परी
द्रव्याची मिति त्याचिया न करवे, दारिद्र्य आम्हांवरी
एकीची प्रिय भू असे सतत ती, बेकी सदाची इथें,
जावोनी परतंत्रता स्ववशता ये केवि या भूमितें? ३६

( १० )

वाटे आजवरी अजिंक्य सकलां तो लीन हो जर्मनी
झालें काय? अमानवी बल कुठें गेलें पुरें लोपुनी?
मित्रांनीं त्यजिलें, स्वबंधु फितले, एकी न देशीं उरे;
शत्रू दुर्बल जो गमे अजवरी तो आज त्या संहरे ३७

शैलाग्राहुनि एकदां गडगडे, चाले अधःपात कीं
ये भाळीं शरणागती, अवनती निःशस्त्रतेसारखी!
देई तो करभारही रिपुजना; सेना तरी शत्रुची
राहे व्यापुनि हाय! राजनगरीं ही दुःस्थिती कोठची! ३८

( ११ )

आहे मानव थोर, थोर तरि तत्सामर्थ्य सापेक्ष तें;
मर्यादा दिसते पदोपदिं तया, तें क्षीणता दावितें;
गर्वोक्ती क्षणिं वाग्विलास ठरते, मालिन्य ये मानसा
विश्वाचे शिरिं बैसण्या बघत जो तो खाद्य हो वायसा ३९

सेवोनी परि नम्र भाव जगता जो पाहतों कौतुकें
त्या आनंद अनंत संतत, तया संतोष विश्वीं पिके;
त्या नाहीं परभाव अल्प उरला, आत्मत्व चोंहीकडे
तो जाई सहजी तरूनि जगिंचें दुर्दम्य जें सांकडें ४०

संसारीं व्यवहार सर्व करितो, दुःखें, सुखें भोगितो
त्यांचें तें क्षणिकत्व जाणुनि परी विक्षेप ना पावतो;
यत्नाची करुनी शिकस्त करितो स्नेही निसर्गास तो;
ज्ञानें तो अपुल्या समस्त जगता सौख्योदकें न्हाणितो ४१

विश्वाचा प्रिय मित्र होउनि पुढें तो विश्व होतो स्वतां
त्या प्रासव्य उरे न अल्पहि दुजें, तो मोक्ष पावे अतां!
साधाया परि साध्य तें सुदृढसा आधार व्हावा मना
तो प्रेमाविण अन्य कोण भुवनीं सामर्थ्यदाता जना? ४२

(१२)

मित्रा! तूं मज भेटलास म्हणुनी तें प्रेम आत्यंतिक
अल्पांशें मम येतसे अनुभवा; व्हायास तें व्यापक
प्रेमाब्धि प्रभु विश्व-चालक हृदीं ध्यावा सदा भक्तिनें;
तें व्हावें परि केविं कीं अजवरी मी त्याज्य देवा म्हणें ४३

मी मानीं नर शक्ति-युक्ति-कृति--धी, स्वामित्व सृष्टीवरी
त्याचें चालतसे निरंकुशपणें, तें व्यर्थ झालें परी
तो हा दुर्बल सप्रमाण ठरला, माझी अहंता तरी
धैर्यानें शिर आपुलें नमविण्या बुद्धी न मित्रा! धरी ४४

( १३ )

झालें जाउनि वर्ष सप्तक तुला, सारी स्थिती पालटे;
झाली ही कृतविद्य गेहिनि तुझी, कर्तृत्वही गोमटें
स्फूर्तीनें आपुल्या तिला प्रमुखता, देती सुविद्य स्त्रिया
तेवी वाटति वंदनीय विविधा वृद्धांसही तत्क्रिया ४५

होवोनी परतंत्र सेवक मला हें होय वर्षाष्टक
मित्रा ! वृत्ति नकोच ही, पुरवलें होणें मला याचक
आतां राहुनि मी स्वतंत्र करणें मातें स्वराष्ट्रार्पण
माझें ध्येय तुझ्या समक्ष ठरलें, त्याचें घडे दर्शन ४६

( १४ )

झाले हे दिन तीन, झोप पळही ठावी न मच्चक्षुंसी
विश्रांती तिळही नसे प्रबळ कीं प्रक्षुब्धता मानसीं
विश्वाचें करितां निरीक्षण दिसे कीं क्षुद्र हा मानव;
गर्वानें परि सोशितोंच हृदिंची ती कालवाकालव ४७

व्यक्ती दुर्बल राहतां अलग ती, ती सर्व भूतांतरीं
होता लीन बने बलिष्ठ, तिजसी सामर्थ्य ये ईश्वरी !
कोठें भाव दुजा उरे न जगतीं, एकत्व दृष्टी पडे
सौख्यें ती नच हांसते, न रडते आलें जरी सांकडें ४८

कापोनी गळु काढितो स्वतनुचें प्रेमें जसा मानव
दुष्टां व्यापक वृत्तिचा नर तसा, दे दंड प्रेमोद्भव !
सुष्टां गौरवि, काळजी करितसे त्याची स्वपुत्रापरी
कर्तव्यें कटु गोड सर्व करुनी शांती सदाची धरी ४९

वृत्ति प्राप्त जगांत ही प्रभुचिया दासा, न अन्या परी
तें सत्तत्व कळे परंतु भिनलें माझ्या न तें अंतरीं
ताठा पूर्विल तो अजून सुहृदा, नाहींच गेला पुरा
त्यायोगें धरवे मला न बरवा त्याचे पदीं आसरा ५०

मित्रा! थोर तुझा असे प्रभुपदीं विश्वास, तें आठवे;
त्यातें तूं स्मरुनीच कार्य करिसी भावें जुनें वा नवें!
मद्विश्वास तुझेवरी तरि नसे केवी प्रभूचे पदीं?
गंगा–स्कंधिं बसोनि कां उदधिला क्षुद्रा न जाते नदी? ५१

(१५)

आंग्लाशा नटवी यशें, अपयशें तो दापितो जर्मनां;
व्याधी दुर्धर निर्मुनी नमवितो तो भारतीयां जनां
आकारें अफगाण सान असुनी उंचावला ईश्वरें
स्वातंत्र्यामृत कां न भारत–मुखीं घालीत तो सत्वरें! ५२

विश्वीं कार्य विशाल चालत तुझें सर्वत्र रात्रंदिन;
त्याचे अंश असंख्य हे स्थिरचरीं तें सर्व संयोगुन
कौशल्यें करितोस सुंदर कृती निर्माण तूं ईश्वरा!
व्हावी ती सकलांग गोचर कशी या क्षुद्र नारीनरां? ५३

लाहे वृक्ष–लतांस छाट तरि ते पुष्पें फळें लोंबती;
लोहा तापवुनीच त्यास रुचिरा लोहार दे आकृती!
मूर्ती रम्य करी सुतार चिरुनी तासोनि तीं लांकडें!
देवा! तूं करितोस तेंच, परि तें मूढा गमे वांकडें! ५४

त्या साऱ्या परिणामरम्य कृति हें आतां प्रमाणें कळे;
कार्यें सर्व तुझीं अतर्क्य सदया! आम्हांस तें नाकळे,
श्रद्धा एक अम्हांस तारक जगीं, आधार तो अंतरा,
संसारोदधि जावया तरुनि तो तारा ध्रुवाचा खरा! ५५

श्रद्धेचा तव आसरा मज सुहृत्प्रेमें प्रभो! लाभला
होवोनी स्थिर तो, अगम्य तव जें तें ज्ञान होवो मला
देवा! दास तुझा सदोष जरि मी आहें तरी भाविक
अज्ञानें भुललों, परी उमगलों झालों तुझा पाइक ५६

८ मार्च १९२७ ]

## मालती--निधन

( स्वागता )

मालती त्यजुनि जाइ न आम्हां
मूर्ख मी! फुकट आग्रह गे हा!
मृत्यु जो प्रियजनां करि नष्ट
तो धरी तुजसि मालति, दुष्ट        १

मृत्युसी झगडण्या कधिं आम्हां
तीक्ष्ण आयुध मिळेल? कधीं हा
योग येइल? करूं कधिं याचा
नाश? संहरुं अरी जगताचा?        २

माणसें नच असूं मतिहीन!
नष्ट दाखवुं तयासि करून!
मात भावि परि ती, अजिची न
दुष्ट ही पकड आज सुटे न        ३

मावळे टवटवी मुखिंची ती!
राहते चपलता कुठली ती?
हातपाय हिमवत् तव झाले
तोंड दीन उघडें पडलेलें        ४

काल तूं घुटुघुटूं किति पीत
दूध होतिस; अतां परि ओठ
नाहिं ते मिटत! बाहिर श्वास
चालला तव! अतां नच आस        ५

लाल जे अधर हे तव होते
पांढरे फटक पूर्ण अतां ते
पाणिदार परि नेत्र अजून
चाललीस जरि बाळ, निघून ६

तीन मासहि तुला नच झाले
—पाहिजेत दिन षोडश गेले—
तोंच जावळ तुझें किति बाळे,
वाढलें, किति मऊ, किति काळें ७

ही भयाण उचकी तुज लागे!
या कशा तुजसि सोसवती गे
यातना? अणिक ये उचकी ही!
फार वेळ न अतां जगते ही ८

एकदां वहिनि मांडिवरी द्या
माझिया नयनिं रूप रिघूं द्या!
शिक्षिता हिज करूं, मम आशा
हीच अंतिं भगिनी करि भाषा ९

प्रेम जी मजवरी करि भारी
बुद्धिवान, कवयित्रि, विचारी
देशभक्त भगिनी, जननी ती
मालती तव मनी मम होती १०

मूर्त ही स्मृति तिची शिकवोनी
मी तुला करिन आस धरोनी
मी असें, तुजसि शेवटचें हें
घेत बाळ इतुक्यांतचि आहे! ११

नाहिं होत पुरती मम आस
मालती जगत नाहिंच खास
घ्या हिला कठिण हाल हिचे हे
सोसती हिज न; दुर्घट आहे ! १२

काय दुःखद हिची स्थिति होते
ओरडे; अहह कां रडण्यातें
लागलां वहिनि ? मालति गेली ?
बाळ कां निघुनि शेवटिं गेली ? १३

नाहिंशी अजि मनी पुरि झाली
आज मात्र भगिनी खरि मेली
आमुच्या करिं हिला दिधलेंस
तूं मने, न रुचलें परि हीस १४

पोरकी म्हणुनि काळजि घेती
सर्वही घरिं, परी न दिसे ती
माउली, न करमे म्हणुनी कां
मालती त्यजि मने, महिलोका ? १५

तूं मने, निघशि सोडुनि जाया
काकु आरडति आज तशा या
धाय धाय करुनी रडती गे
कीं न कांहिंच उरे तव मागें १६

मालतीसि—मृत मालतिसी या !—
पोटिं आवळुनि 'आज मने, या
मालतीसहि यमें बघ नेलें'
बोलतां रडुनि भानहि गेलें ! १७

काकुंनी, वहिनिनीं तव बाळ
पाळितां गणियले नच हाल
चालली परि तयासि मने! ती
टाकुनी कठिण दुःखिच अंतीं १८

या मने, प्रिय तुझ्या वहिनींना
आवरे न रडणें; मरतांना—
'आपुलीच मुलगी' समजोनी
'वाढवा हिज' तयास कथोनी, १९

तूं मने, निघुनि गेलिस; त्यांनीं
सांगणें तव प्रमाण धरोनी
सारखें तिस यथास्थित केलें
शेवटीं सकल निष्फळ झालें! २०

( दिंडी )

हृदय पोळे तरि दुःख आवराया
बघे नारायण, मने! पहा गे या!
दुःख त्याला हें नावरे म्हणोनी
भरुनि येती तन्नेत्र आसवांनीं २१

स्थिती गंगाधर तीच अनुभवी गे
सिंधु, काका, हे नसति जवळि दोघे;
घरीं येतां, पाहूनि हें तयांतें
कसें होइल करि तूंच कल्पनेतें २२

× × ×

मने, काका हे द्वारिं पातलेच
काय झालें हें तयीं ताडलेंच
'गेलि मुलगी हो गेलि ही मनीची'
असा हंबरडा ऐकुनी तयांची २३

स्थिती झाली किति कठिण, अशा कालीं
धीर धरिती ते फार धैर्यशाली !
काकु काकांना मने मरणकालीं
बोलसी तूं तत्स्मृती मजसि झाली २४

'काकु काका नुकताच हो तुम्हांला
'ज्येष्ठ मुलगा सोडुनी असे गेला
'आज तुमची लाडकी मनी जाते
'द्याल कैसें तोंड या संकटातें? २५

'करीं वहिनींच्या मालतीस देतें
'नित्य माझी ही आठवण तुम्हांतें;
'अतां वहिनी होतील हिची आई
'विठ्ठलाची मुलगीच म्हणा होई २६

'अम्हां दोघांची सुता मालती ही
'विठ्ठलाची स्मृति हीच तुम्हां राही
'काकु काका, ही मालती बघोनी
'दुःख आमुचें जा तुम्ही विस्मरोनी.' २७

असें सांगुनि गेलीस मने; आतां
विठ्ठलाची मालती तवहि जातां
कसा दुःखाचा विसर पडावा गे
वहिनि आणी स्मृति तुझी अतां मागें २८

× × ×

मालती ही निष्प्राण असे झाली
मृत्तिकेची साम्यता तिला आली!
गृहीं आतां तुज कोण राहुं देतें?
स्मशानातें चल, घर अतां तुझें तें २९

'मालतीला पोलकीं चांगलीं तूं
शिवुनि देई सर्वदा' असा हेतू
स्पष्ट केला तुजजवळि रे मनीनें
परी नारायण असें असे होणें ३०

जिला नारायण 'शिविन पोलकीं मीं
रोज म्हणशी त्या तिला तिचे धामीं
न्यावयासी गुंडाळ तूंच भोंतीं
वस्त्र; त्याच्या द्या तिला अतां हातीं ३१

'हिला आतां नेणार तुम्ही कोठें?'
उठे आरोळी दुःख तीव्र दाटे
नको नारायण थांबुं; मी पहार
घेत; चालें होउं या द्वारपार ३२

अतां मालति तूं सदनिं या कधींही
कांहिं केल्या भेटणें शक्य नाहीं
एक वेळ तरी तुझें मुख अजूनी
शक्य बघणें मज हेंच दैव मानी ३३

तुला शेवटचें बघिन मी स्मशानीं
तयानंतर पाहीन कां फिरोनी!
मनी झाली अदृश्य तूंहि तैशी
मनीकन्या मालती आज होशी ३४

खेळवावें घेवोनि अंकिं तूतें
हेतु धरुनी हा गृहा सिंधु जाते
तुजशिं प्रेमें मावशी फार वागे
तिला मार्गी परि काय हें दिसे गे ३५

× × ×

फार मालति दुखवून अम्हां जाशी
पडें नेतें जन निमुटपणें सोशी !
दिसू नारायण लागलें श्मशान !
काम आहे केवढें हें कठीण ! ३६

नित्य अंकीं घेतलें मालतीला
कधीं नाहीं टाकिलें तिस भुईला
आज येथें मातींत परि पुरून
जाउं आपण तिस एकटी त्यजून ३७

उक्तिहूनी कृति कठिण फार; त्याचें
आज दिसतें हें उदाहरण साचें !
वेळ येतां परि असामान्य धैर्य
येइ; शक्तीबाहेर कृती होय ! ३८

येउनी हे पोंचलों श्मशानाला
हलुच ठेवी खालती मालतीला
खणूं आपण ये खांच खोल खोल
जेथ कोल्हे कीं श्वान नच शिवेल ३९

टपुनि आपण घेण्यासि मालतीला
बसत होतों तो काळ अतां गेला
तिला करितिल नच हिंस्र पशू स्पर्श
करूं येई एवढें आपणास ! ४०

खोल आतां ही खांच हो पुरेशी
याचपुढती कृति कठिण फार ऐशी!
बघूं अपुल्या ये बाळ मालतीला
करू शेवटचें तृप्त लोचनाला ४१

अजुनि डोळे हे दिसति पाणिदार
तेविं जावळ हें मऊ मऊ फार
स्पष्ट मालति ही ओळखितां येते
घेउं शेवटचें अतां बघुनि हीतें ४२

बघत नारायण असा किती वेळ
राहणार तरी, पुरें प्रेमजाल
तिला पोंचवुं चल पुरे अतां झालें
आपणाला तें पाहिजेच केलें! ४३

तुला करितों उपदेश तरी मीही
स्तब्ध होउनि तुजसारखाच राहीं
प्रेम बाजुस ठेवुनी करुनि धैर्य
करूं आतां ये शेवटचें कार्य ४४

पहा अजुनी एकदां मालतीला
फिरुनि नच ती दिसणार आपणाला
पाहिलें ना? झांकोनि वस्त्रिं पूर्ण
आंत ठेवूं ये हळू हिस धरून ४५

निजे अक्षयिंच्या शयनिं अतां साची
एकवार पुन्हां मालती मनीची
पाहुं ये रे, करुं वस्त्र जरा दूर
फिरुनि दर्शन तव मालति न घडेल ४६

मनी माता तव, मजवरी तियेचें
फार होतें गे प्रेम, तसें माझें
असे तिजवरि, परि बाल्य तिचें गेलें
नाहिं तोंच तिला मरण दुष्ट आलें ४७

निघुनि गेली, कन्यका परी मागें
असिस तूं; मी तुजकडे पाहुनी गे
तिच्या विरहाचा विसर करीं; तूंही
जाशि; मजला अनुकूल दैव नाहीं ४८

गाढ आता तूं नीज गे सुखानें
देववेल न तुज दुःख कुणाच्यानें
तुझें दर्शन हें शेवटचें घेई
तुझा होणार न विसर मज कधींही ४९

× × ×

अतां झाली मालती वस्त्रआड
अतां होऊं लागली मातिआड
अजुनि दिसतें हें वस्त्र जरा; आतां
पूर्ण लोपे तें, अतां भरे गर्ता ५०

मालतीनें दिन आठ भूषवीले
मनिसि, नंतर विस्मरण तिचें केलें
काळ थोडा जाय तों स्वतां गेली
अडिच मासांमधिं सकल कथा झाली! ५१

१० सप्टेंबर १९१२]

## कायदेभंग

(१)

महाभाग कुणि राष्ट्रासाठीं श्रमला, झिजला, शिणला,
कारावासा खडतर काढुनि गेहीं स्वजनीं आला १

स्वजनीं आला परतुनि, वाटे पुनर्जन्म जणुं होई
वास तुरुंगीं दीर्घकाल कां वास न मृत्यूगेहीं ! २

सुत मातेला, बंधु भगिनिला, पति पत्नीला भेटे
पूर्ण तयांचे होति मनोरथ, ज्यांनीं अंतर दाटे. ३

नरकिं राहिला तरि नरकाचा तो न एवढा झाला
सुगंध त्याचा तो पूर्वींचा जैसा तैसा ठेला. ४

आनंदीं ते बुडले सारे परि तो क्षणिक असे कीं,
व्यवहाराची दृष्टी भीषण आनंदा त्या रोकी ५

दृश्य गेहिंचें दारिद्र्याचें विश्रांती दे कुठुनी
उद्योगा लागला, तिषी त्या जावोत न कीं पिचुनी ६

उद्योगा लागला परि न त्या मिळे काम भरपूर
सभोंवतालीं सदा त्याचिया हेरांचें लेंढार ७

जाई तेथें पडे तयाच्या सच्छीलाची छाप
तसें विरघळे भय हेरांचें नकळत आपोआप ८

अवसर देखुनि अनुकूल धरी काळाचा तो कान
लावी त्याला अपुल्या कामा, गेलें दैन्य निघून ९

संसाराची ठेवण आतां भिन्न तयाच्या होई
कला नांदतां दिसे त्याचिया सदनीं ठाई ठाई १०

सखे जुने ते जमले फिरुनी, मित्र नवीन मिळाले
नित्य तयाच्या गेहीं कुणि तरि असेंच आलें गेलें ११

मातेचें पत्नीचें वाढे काम तरी त्या तुष्ट
लौकिक लाभे, इष्टप्रद तरि होती दुःसह कष्ट १२

कारागारीं वर्षे गेलीं सहा, न विद्या घडली
तळमळ लागे माधवहृदयीं निष्फळ परि ती ठरली १३

विद्याभूषित करीन भगिनी निश्चय त्यानें केला.
मातेला तो, पत्नीलाही कळतां संमत झाला १४

करी मालती अव्यभिचारी सरस्वतीची सेवा
सत्वर हातीं येत तियेच्या विद्यारूपी ठेवा १५

सुत मित्राचा माधव-गेहीं येई विद्याभ्यासा
सहाध्यायि समवयस्क तो ये मालतिचे सहवासा १६

मधुकर मालति जोडी झाली प्रसिद्ध अल्पाचि कालें
बहीण भाऊ विद्याव्यसनीं एकरूप ते झाले १७

(२)

कारागारीं माधव भारी सुशील म्हणुनी गाजे
प्रसन्न त्यावरि सुष्ट दुष्टही सारे अधिकारी जे १८

घरीं तयाचे येति पाहुणे जेलर जे पूर्वीचे
प्रसन्नता तेथील पाहुनी मन आनंदे नाचे १९

माधव–तनया जवळी घेउनि खेळवीत त्या बोले
‘कारागारीं ये न पित्यासम कांहींही जरि झालें’ २०

माधव बोले, ‘कारागारीं येउं कुटुंबी सारे
‘तेथ नांदतें स्वातंत्र्याचें खरोखरीचें वारें २१

‘देशभक्तिचा निकष खरा तो, तेथ परीक्षा पास
‘होतां लायक ठरे घडविण्या राष्ट्राचा इतिहास २२

‘राष्ट्रोद्धारक थोर थोर ते वर्तमान वा भूत
‘अपूर्ण त्यांचें चरित्र कारावासावांचुनि होत २३

‘कारागारीं उदय गुणांचा होत, तसा परिपोष,
‘कारागारा लांछन देतां लांछन मानव्यांस.’ २४

कारागारस्तवनीं रमली माधववाणी मधुर
आला मधुकर येइ मालती, तेहि आणिती बहर २५

कारागारस्तोत्रें म्हणतां देशप्रेमें भरलीं
म्हणतां म्हणतां अंतःकरणें त्यांचीं उलुनी आलीं २६

जेलर झाले स्तिमित बोलले ‘देशप्रेमा ऐसा
पूर लोटतां स्वातंत्र्याचा वाटे पूर्ण भरोसा’ २७

(३)

विद्याभूषित होई मधुकर, होय मालती तेंवीं
माता बोले, ‘बाळें आतां विवाहभूषित व्हावीं.’ २८

‘भूतभविष्या सांधुनि द्याया विवाह रूढ समाजीं
‘असंख्य निर्मी संघटना तो असंख्य मनुजांमाजीं २९

'नर वा नारी अपूर्ण सारे अन्योन्यावांचूनी
'परस्परांचें मीलन फुलवी बाग मुलांचे भुवनीं ३०

'मोडुनि विश्वाधार नियम हा व्यापाराची पेढी
'विवाहसंस्था करुनी मानव त्यांत मानितो प्रौढी ३१

'आकर्षण सृष्टीचें बीज न, हुंडा बीज विवाहीं
'अंतःकरणा मूल्य न उरलें, धन हो सारें कांहीं ३२

'सूज्ञ, सुशिक्षित मधुकर अपुला तेवि मालती सुगुणी
'सहचर सहचारिणी पहावी स्वतांच ज्यांची त्यांनीं ३३

'अनुभव वडिलीं कथुनि करावा मार्ग सुकर तरुणांचा
'त्यांस विकासक्षम ओलावा पुरवावा हृदयींचा ३४

'प्रश्न आद्य परि तरुणांपुढती आज असे अन्नाचा
'सुटल्यावांचुनि तो लग्नाचा विचार करिसी कैंचा?' ३५

माधववच हें संपतें न तों मधुकर तेथें आला
मालतीहि ये मागुनि, लागे तोंड तेथ वादाला ३६

गहिवर येउनि मधुकर बोले, 'तुम्ही काळजी माझी
'किती वाहतां आईबापां ज्ञात न नांवाला जी, ३७

'जन्मावाचुनि जनकजननिनीं मला दिलें तें काय
'तुम्ही प्रयत्नें माणुस केलें, केली सारी सोय ३८

'उपकाराचें नांव परंतू निघे न तोंडांतूनी
'सानथोरही घरांतील मज मनापासुनी मानी ३९

'भाग्यवंत मी मम भाग्याचा विकास होइल खास
'पोट भराया समर्थ व्हावें हा परि पहिला ध्यास ४०

'विचार घेउनि तुमचा नंतर सहचारिणिचा शोध
'करुनी साधूं शुभप्रसंगीं वैवाहिक संबंध.' ४१

वदे मालती, 'विवाह शब्दाचि मला नकोसा वाटे
'नको! कल्पना नवऱ्याची ती, काळिज माझें फाटे ४२

'विवाहनामें गुलामगिरिची स्त्रीस घालिती बेडी
'अंतर्बाह्यीं करकचतां ती होय बापुडी वेडी ४३

'त्वेष उफाळुनि बंडखोर ती व्हाया होतां सिद्ध
'धर्माचें तें भूत उभारुनि करिती तिजला बद्ध ४४

'मानव्यातें मारुनि इच्छा द्विपाद पशु व्हायाची
'असेल, व्हावें तरी विवाहित–कीव येत त्या स्त्रीची ४५

'कुंवार राहुनि करीन सेवा अखंड मी राष्ट्राची
'दादानें ते हाल सोशिले, पर्वा मजला कैची?' ४६

सर्वांचे ते बोल ऐकुनी मनीं म्हणे म्हातारी
'सरो अतां अवतार आपुला, काळ बदलला भारी.' ४७

(४)

पारतंत्र्यकर्दमीं बुडाला, मानव्याला मुकला,
लूट धनाची होतां होतां अस्थी–पंजर उरला ४८

निराश झाला, पोटासाठीं उदार जीवावरती
परी अंतरीं फुका तळमळे हत्यार नाहीं हातीं ४९

जपान गेला पुढें चिमुकला, जगीं मान्यते चढला
अफाट भारत दौर्बल्याचें प्रतीक केवळ ठरला ५०

अपमानाचा खुराक खाउनि मान वांकुनी बसणें
स्वभाव ज्याचा बनला त्याला आतां कैचें सुटणें! ५१

अशा निराश स्थितींत भारतिं तरुणांनीं इतिहास
जुना नवा वा अभ्यासोनी, करुनी जगत्प्रवास ५२

उठाव करण्या निश्चय केला हातीं घेउनि बाँब
यशाऐवजीं परी सभोंतीं उठे आगिचा डोंब ५३

तेव्हां माधव बाँब करोनी गेला कारागारीं
झाली गेली कथा, परतला तेजस्वी माघारीं ५४

(५)

नसे संस्कृती नसे ज्ञान वा मानव देह असोनी
नसे बुद्धिचें स्मरण, कष्टती सदैव शेतीं, रानीं, ५५

कष्ट करिति परि निकृष्ट जीवन, अन्नाचा निर्माता,
वस्त्राचाही स्वतां उपाशी दिसे नागवा फिरतां ५६

शस्त्र धरोनी हातीं करितो रक्षण धनवानाचें
स्वत: अरक्षित, कुणी कुटावें त्याला शब्दें वाचें ५७

शरीरधारी कर्म–योग जणु समूह हा मनुजांचा
भरला भारतवर्षी, झाला विषय जगा चेष्टेचा ५८

दु:ख–दैन्य–दारिद्र्य–मूर्ति ती जनता जागृत करुनी
तिला दावितां वस्त्रान्नाचा निश्चित लाभ निदानीं ५९

उठाव करितां तिचा, तियेच्यापुढें न पाड कुणाचा
कधिं लागे, हा धडा जगाच्या घेउनि इतिहासाचा ६०

भीषण उठली लाट भारतीं व्यापुनि दाहि दिशांना
संचरली ती माधव–चित्तीं स्वस्थ बसूं देईना ६१

माय, मालती. मधुकर यांना जवळीं घेउनि बसला
हृद्गत अपुलें सांगायाला माधव सिद्ध जहाला ६२

म्हणे, ' पहा ही हांक मारिते, जागृत जनता झाली,
' दिशा दिशा ती व्यापुनि वरती आकाशाही भिडली ६३

' जनतेचा मी अंश, बहाणा करुनि, होउनी बधिर,
' पाठ फिरवुनी करित बसूं कां सांगा हा संसार ६४

' दोघी होत्या सान बालिका तेव्हां त्यांसह आई
' काळ काढिला, निर्धन असुनी दैन्य दाविलें नाहीं ६५

' काळ बदलला, मधू लाभला, मित्रांचा परिवार
' किती वाढला, सहानुभूती आतां असे अपार ६६

' जनतेचें हें बंड, तुरुंगीं असंख्य येतिल वीर
' तेव्हांचे ते कष्ट न, विजयहि मिळेल थोडाफार ६७

' आशीर्वादें तुझ्या तदा मी क्षत्रिय ठरलों आई
' तुला कधीं मी दूषविणारा कुपुत्र नाहीं, नाहीं. ६८

' परगांवीं तूं मधू ! चित्त परि तुझें येथ राहील
' राष्ट्रसेविका भगिनी माझी गमनें मम तोषेल ६९

' समरभूमिवर जातां कांता अडवी काय पतीला ?
' रजपुतरमणी पूर्वीं होत्या, नाहित कां या काळां ?' ७०

सर्वांनीं त्या प्रसन्न चित्तें रुकार तत्क्षणिं दिधला
निरोप घेउनि इष्ट जनांचा निघून कार्या गेला ७१

( ६ )

परक्यांनीं पढविला भारता शब्द सानसा एक
त्याचे बनलों भाट, दास वा, नुरला कांहीं विवेक ७२

अनंत शतकें घालिं भारतीं 'धर्म' शब्द थैमान
मित्र मिळाला शब्द 'कायदा' समर्थ त्याचेहून ७३

अधिंच बावळे धर्म करि अम्हां, साह्य कायदा त्याला
बावळटांनीं पुराण भारत पुरता फुलुनी गेला ७४

असा कायदा, तसा कायदा, कायदाच सर्वत्र
सर्व कायदे पाळूं जातां नाहिं अरत्र परत्र ७५

विचारशक्ती नाशा नेली आजवरी धर्मानें
उरली ती नाशुनी कायदा चढवी पशुपण-लेणें ७६

प्रबलांहातीं शस्त्र कायदा चिरडाया दुबळ्यांना
विष अबलां, पीयुष प्रबलां असे कायदा जाणा ७७

सधन इंग्रजा करी, भारता अधन, कायदा तोच
द्विपाद पशुपरि भरतपुत्र हे हा न तयांना पोंच ७८

हातीं धरणें, घरिंहि ठेवणें, हत्यार हा अपराध
घोर ठरविला, आम्हां पटला, केला नाहिं विरोध ७९

शस्त्रहीन तो वस्त्रहीन जणुं दुनियेचा निर्लज्ज
अब्रूची त्या चाड न तिळही, बूट चाटण्या सज्ज ८०

अर्ध शतक हा रिवाज चाले, पौरुष अस्ता गेलें
नपूंसका परतंत्र राखणें पौरुष आंग्लां गमलें ८१

अन्न न खाण्या शस्त्र न लढण्या तारण उरलें मरण
मरणाआधीं मिळेल त्यानें सज्ज लढाया तरुण ८२

भीषण भारत–तरुण–दशा ही बघुनि मनीं कळवळला
सरसावुनि हो पुढें महात्मा, बोले राष्ट्रसभेला ८३

'शस्त्राकरितां निराश होतां, शस्त्र शत्रुनें हातीं
'तुमच्या दिधलें कधींच, करितां निष्कारण कां खंती? ८४

'शस्त्रहीनता आपत्ति न ही, शस्त्रहीन तो प्रबल,
'निर्भय आत्मार्पणा सज्ज जरि, सशस्त्र त्या वंदील ८५

'अन्यायी कायदे करोनी मानव्या मुकवीलें
'तोडा ते; जनतेची सत्ता, परके आले कुठले? ८६

'शासनसंस्था जनतेला जी मान्य तीच मानावी
'अमान्य होतां निर्भयतेनें त्यागानें नाशावी ८७

'तसे कायदे जनताभक्षक सैतानें जे केले
'मोडावे, आनंदें शासन भोगावें, जरि झालें.' ८८

उठाव करण्या उत्सुक तरुणा अमृत गमे ती वाणी
प्रचार त्यांनीं केला शहरीं, खेडोपाडीं, रानीं ८९

जनतेची मग हांक ऐकुनी जग सारें हादरलें
जनतेच्या त्या अफाट सागरिं माधव जाउनि मिसळे ९०

शस्त्रहीन भारत–जनतेचा सशस्त्र सत्तेसंगें
तेव्हांचा संग्राम देखुनी सहृदय कोण न रंगे? ९१

पेशावर ते रामेश्वर वा कराचि ते कलकत्ता
कुठेंहि जातां, दिसे उसळली अपार जनतासत्ता ९२

पोलिस लाठीबंद, मशिनगनवाले करिती हल्ला
हत्यार नसतां जनतेचा परि चाले प्रचंड धुल्ला ९३

सशस्त्र समरीं सदा चमकती केवळ पुरुष तरूण
युद्ध अहिंसात्मक दे सर्वां योध्याचा बहुमान ९४

बाल–तरुण–वृद्ध स्त्रीपुरुषा संधि शौर्य दावाया
मुहूर्त दुर्लभ मिळतां ऐसा, कोण घालविल वांया ! ९५

आजवरी अन्याय साहिले अनंत अगतिक बनुनी
निर्भय होतां न्यायप्रीती दिसे विविध मार्गोनीं ९६

प्रभातफेरी, सायंफेरी, मिरवणूक कुणि काढी
सभा करी कुणि, काढि बुलेटिन, हुकूम जो तो मोडी ९७

घोडे–हल्ला, लाठीहल्ला, तुरुंग वारंवार
दंड, फांशि, हे मार्ग भीतिचे पडले सारे गार ९८

पूर वाहिला रक्ताचा, स्त्री अब्रूला आंचवली
नांगर फिरला सर्वस्वावरि तरी न जनता भ्याली ९९

समुद्रतीरीं, रानोमाळीं, खेडोपाडीं, शहरीं
सत्याग्रहिंना धरितां थकले सरकारी अधिकारी १००

आजवरी संग्राम असा हा देखिला न इतिहासें
थांबविलें दुनियेंत तयानें हिंदिजनांचें हांसें १०१

स्वयंस्फूर्तिनें संग्रामीं त्या माधव समरस झाला
लढतां लढतां आनंदानें कारागारीं गेला. १०२

(७)

समरचमत्कारीं या माधवगेहीं प्रेमतरूचें
बीजारोपण होउन वर्धन चाले रोज तयाचें १०३

माधव कारागारीं, इकडे तीन बायका पोरें
प्रताप सोबत जाइ, चालती तारुण्याचीं थेरें १०४

माधव तात्विक, गांभीर्याचा सागर, हांसे न कधीं
गेहीं त्याचे हास्यरसा वा नसे विनोदा अवधी १०५

बघुनि माधवा विनोद गेहीं बंदिवान जणुं होई
माधवगमनीं, प्रताप येतां, सूड पुरा तो घेई १०६

विनोद, यौवनसुलभ संचरे मालतिचित्तीं पूर्ण
प्रताप दिसतां बने सदन जणुं हास्यरसाची खाण १०७

गोष्टी, गाणीं कोस्थ्या तेथें अखंड चालति आतां
'प्रताप गेहीं सदैव राहो' ध्यास मालती-चित्ता १०८

सासुसुनांना प्रकार नूतन रुचे न हा इतुकाही
असंतोष परि मालतिचा त्या स्वप्नीं रुचणें नाहीं १०९

प्रतापसंगतिं मालतिला जो अनुभव नूतन लाहे
त्यांत रंगुनी मायवहिनिच्या मना न ढुंकुनि पाहे ११०

सोदर अपुला पिता जणूं जो पडला कारागारीं
विसरुनि तें रंगली मालती प्रेमाच्या व्यवहारीं १११

राष्ट्रसेविका राष्ट्रसंकटीं प्रेमसेविका बनली
स्फोट करोनी वाफ पळत, जी आवरणें आडविली ११२

प्रतापभार्या नावडती त्या, वसे सदा माहेरीं
ठावें हें मालतीस त्याच्या तरि गेली आहारीं ११३

सर्वांची लाडकी मालती, दुखेल चित्त तियेचें,
म्हणे न कोणी कांहीं, वाढे बंड तसें प्रेमाचें ११४

चांदण्यांत तीं दोघें निघती सहल कराया रात्रीं
म्हणे माय ‘फिर मालति मार्गे, कसली ही तव मैत्री!’ ११५

‘स्वातंत्र्यावरि कधीं न माझ्या घाला घालीं दादा
‘गदा घालिसी स्त्रीस्वातंत्र्यीं! धिक् धिक् गुलाम बंदा!’ ११६

ऐकुनि वच हें प्रताप थिजला बोले रागावूनी,
‘ज्ञान न मज हें कीं तूं येसी मातेला दुखवूनी.’ ११७

माय वदे ‘मज शंका नाहीं लव तुमची दोघांची
‘भितें जगाला, भीती भारी कठीण जनलज्जेची.’ ११८

(८)

मालतिचा मोकळेपणा तो पूर्ण नाहिंसा झाला
बालभाव तो फिरुनि न दिसला पूर्वीचा कोणाला ११९

सर्व वृत्त तें कळवी माता मुलास कारागारीं
तरुणा दोघां गूढ कळाया बोलाविलें त्या चतुरीं १२०

प्रताप–मालति दोघें जाती माधवास भेटाया
भ्यालेलीं परि हृदयें त्यांचीं जातांना त्या ठायां १२१

तुरुंगिं तो कष्टतो, रंगतो आम्ही कामुक रंगीं
भेटाया त्या पात्र न धामीं मग कोठून तुरुंगीं १२२

उदार वृत्ती परिचित त्याची, आमंत्रण आलेलें
म्हणुनी, दोघे भीत भीत मनिं, भेटाया त्या गेले १२३

परिचित जेलर पाहुनि वाटे त्यांस हायसें भारी
मालतिची तो करुनी थट्टा जाय निघोनी दूरी १२४

भ्यालेल्यांना सभोंवतालीं भीती दिसते नित्य
लगाम पडतो जिव्हेला, कीं बोलवे न जें सत्य १२५

मौन आणि मालती, विसंगत आजवरी जें भासे
दृग्गोचर तें होउनि माधव अंतर्यामीं हांसे १२६

वार्ता कळली तिची सत्यता आपसूक त्या पटली;
'मुहूर्त केव्हां?' माधववच ती ऐकुनि लज्जित झाली १२७

'दादा, वदतां काय कळे ना,' प्रतापवच हें कानीं
पडतां माधव आंठ्या घालुनि बोले कठोर वाणी १२८

'विवाहित स्त्री टाकुनि आतां मोह घालिसी इजला
'सोबत करितां फांस लाविला सर्वांच्याच गळ्याला. १२९

'विद्याभूषित, वयें विवाहायोग्य असा तूं भगिनी
'सहचर अपुला निश्चित केला स्वतां परीक्षा करुनी १३०

'अनुमति माझी पूर्ण तुला, तुज सुख लाभो संसारीं
'मुहूर्त ठरवा, मजला कळवा, कीं मी करिन तयारी.' १३१

नेत्र-निर्झरी मालतिची तों वेगें वाहूं लागे
झांकियलीं आंसवें प्रतापें अपुलीं वस्त्रामागें १३२

दोघांची ती दशा देखुनी माधव मनिं गहिंवरला
पाठिवरुनि कर फिरवित बोले प्रेमानें भगिनीला १३३

'कठोर वाणी तुला बोचते; रुचते कां आईला?'
प्रश्नें या ती शरम पावुनी स्तब्ध पडे धरणीला १३४

अल्प काल जातां तो बोले, 'तुरुंग हा ना गेह
'ऊठ संपला समय मजविशीं नको तुला संदेह. १३५

'स्वस्वातंत्र्यासवें पराचें स्वातंत्र्यहि राखावें
'तरी स्वतांला स्वातंत्र्याचे अभिमानी म्हणवावें १३६

'असें मालती, तुला मन तसें आहे आईलाही
'परंतु तेव्हां तुला मालती, आठवलें तें नाहीं. १३७

'तुला माउली तशीच वहिनी लाभे भाग्यें थोर
'परि तेव्हां तूं अज्ञानानें झालिस गे शिरजोर. १३८

'जाउनि आतां क्षमा मागुनी दोघींना करिं तुष्ट
'शांत झालिया दोघी त्यांतच सदैव होइल इष्ट १३९

'भाऊ भाऊ प्रताप झालों आपण दोघे आतां
'परकेपण तें लोप पावलें अपुलेपण ये हाता.' १४०

क्षणांत दोघे दृढालिंगनीं एकत्वाला गेले
प्रताप मालति पतिपत्नी हें नातें निश्चित झालें. १४१

'सवत तुझी ती भाग्यें मजला लाभे बहिण नवीन
'आधीं तिजला भेटुन गेहीं येइन मी येथून' १४२

असें म्हणुनि तो निरोप त्यांना प्रेमळ देता झाला
भेटीचा त्या शेवट सुखकर झाला पूर्ण तिघांला १४३

(९)

प्रेमासक्ता प्रतापठायीं भगिनी अपुली कळतां
माधव पत्रीं विचारि त्याच्या श्वशुरा प्रताप–वार्ता १४४

श्वशुर तयाचा मित्र निघाला माधवचा पूर्वीचा
'प्रताप–दोष न' कळवी तो, 'वा दोष न मम दुहितेचा; १४५

'मीलन त्यांचें असंभाव्य परि कोणी कांहीं केल्या
'पुनर्लग्न करण्यास तियेचें वृत्ती माझ्या फुलल्या १४६

'उदारधी तव साह्य मिळे तरि होइल इच्छा पूर्ण
'मुक्त झालियावरि होइल कां तव इकडे आगमन?' १४७

प्रतापमालति येण्याआधीं पत्र येइ हें त्याला
यास्तव होता सिद्ध तयांना संमति तो द्यायाला. १४८

(१०)

'मधुकर मजला दिसला, हंसला कीं प्रेमा अंतरिंचा
'दृढालिंगना धावे, बडगा परी दिसे नीतीचा १४९

'नीतीनें बांधिलें मला त्या कायमचें पुरुषाशीं
'लग्नापासुनि सर्वांशीं मी वाटे ज्यास नकोशी १५०

'धर्में माझा पती असोनी स्पर्श न ज्यानें केला
'प्रेमें ज्यानें कधिं न पाहिलें, बद्ध असें मी त्याला १५१

'जिवंत आहें का मेलें मी, विचारपूसहि न करी
'जप त्याचा कर, नीति सांगते, घेउनि माला स्वकरीं १५२

'नीतीचा हा डोलारा मी फोडुनि मधुकरकंठीं
'मिठी मारुनी कां न बसावें प्रेमाच्या वैकुंठीं?' १५३

अशा विचारीं कितीक वेळां वासंती हो लीन
आचार न परि समर्थ करण्या वेडी जाय बनून १५४

प्रतापपत्नी वासंती ही, वास करी माहेरीं
आज कितिक दिन मधुकर राहे त्याच घराशेजारीं १५५

त्याचें वर्तन, त्याचें जीवन, त्याचें भाषण तिजला
तसें तियेचें मोहक त्याला, हें ठावें दोघांला १५६

सौभाग्यवती परि ती; कुंठित झाले दोघे पुरते
मनांत झुरती; सांगावें हें मनिंचें केविं कुणातें? १५७

( ११ )

वासंती मम भगिनी तिज मी भेटुनि येइन गेहीं
माधव वदला इंगित त्यांतिल कळे न दोघांनाही १५८

परिचय कुठला वासंतीचा, भगिनी केवी झाली
चर्चा चाले त्यांची तरिही गूढ न कोणी उकली १५९

माय–वहिनिची अनुमति मिळतां हर्ष मनींचा वाढे
वर्धित झालें प्रेम तयांचें पूर्वींचें जें गाढें १६०

शुभवार्ता ती कळवि मालती मधुला पत्रांतून
उत्तर त्याचें वाचुनि गेली आश्चर्यानें थिजुन १६१

'प्रताप–पत्नी होसी, मी तत्पत्नीचा पति होतों
'अनुरागें एकत्व पावलों, संकट परि वाटे तो. १६२

'धिक्कृत करि तिज, मालक परि तो तिचा, सांगतो धर्म
अनुज्ञा न तो दे तरि आमुचें ठरतें हें दुष्कर्म' १६३

पत्र वाचुनी प्रताप धाडी उत्तर त्या संक्षेपें
'वासंतीसह संसारीं तूं सुख सेवीं पतिरूपें.' १६४

मालतिनें माधवा धाडिला हा पत्रव्यवहार
गांभीर्यातें जिंकुनि तैं त्या हास्य करी बेजार १६५

सुटका होउनि येइ तुरुंगाबाहेरी तों पुढती
येउनि मित्र उभा, बोले 'हा मधुकर, ही वासंती.' १६६

आनंदाला उकळीं फुटली हृदयें भरुनी आलीं
प्रवास झाला सुखकर हांसत त्यांचा खेळीमेळीं १६७

* * *

दो लग्नें तीं झालीं, प्रेमाला तेधवां चढे रंग
माधव वधूवरांना वदे करा नित्य 'कायदेभंग.' १६८

१२ ते २४ मार्च १९४१ ]

# निरलसाश्रम

(शार्दूलविक्रीडित)

माझ्या मैत्रिणि चार आज मजला भेटावया पातल्या
होती एक कुंवार, एक विधवा, दोघीजणी राहिल्या
सौभाग्यें युत एक त्यांतुनि, परित्यक्ता चतुर्था असे
त्यांचें वृत्त हितप्रद प्रचुर तें सांगें तुम्हां कांहिंसें १

× × ×

'सारे भेटतसूं' कुंवार वदली, 'फारा दिसांनी अजी
'अन्योन्यां अनुभूति सर्व अपुली सांगूं असे सत्य जी'
साऱ्या संमत सूचना पडुनियां दाणे चणे शेव मी
आणीं, खाद्य खमंग होय वदना, कानां कथा संयमी २

× × ×

'तेव्हांचें सगळें' कुवार वदली 'ठाके स्मृतीचे पटीं,
विद्याभूषित होय पंचक यदा, ती मोदराशी घटी!
दु:खें दग्ध मनोंचि आपण तदा जे एकदां पांगलों
ते हे आज समस्त कष्ट करुनी एकत्रता पावलों ३

घेवोनी तुमचा निरोप सदनीं गेल्यावरी आढळे
कीं बाबा शरपंजरींच पडले उल्हास तो मावळे
शुश्रूषा करण्यांत वेळ सगळा जाई, न आरामही
बाबांना लव वाटला; मज गमे फाटूनि जाते मही ४

गेहीं पोरवडा किती ! जननि ती सावत्र ! बाळें तिचीं;
मी एकाकि; पिता निघे यमपुरीं संपत्तिही कोठची ?
माझ्याशीं तितुक्यांत मूढ जननी सापत्नभावा धरी
गेले ते दिन ! ते पुन्हा न कवणा येवोत विश्वांतरीं ५

× × ×

बाबांच्या निधनाग्नितूनि सजिवा बाहेर आलें कशी
काळा ठाउक एकट्या; नसतसे आशा मला अल्पशी
नाथाच्या निधनें शहाणपण ती आश्चर्यदायी शिके
पूर्वींची जननी न, नूतन जगीं घे जन्म वाटे निकें ६

बोलावून मला म्हणे, 'विसर तें जें आजवेरी घडे
ठाकें बालकपूर्ण गेह अपणा दोघींपुढें रोकडें
तूं आधार मला, तशीच इतुक्या बाळांस विश्वांत या
तातातें स्मरुनी मला भगिनिशी मानूनि दावी दया.' ७

मातेचें नव रूप पोषक मला पीयूषसें जाहलें !
आशादग्ध मनास अंकुर नवे जोमें फुटूं लागले !
पूर्वीं निर्जन जें श्मशानच जणूं वाटे मला गेह तें
झालें पुष्पफलांदिकीं विनटल्या उद्यानसें खेळतें ८

आईचें अधिकार–वेड पुरतें लोपोनि गेलें अतां
माझ्याशीं समताहि ना; मजकडे स्वामित्व देई स्वतां
योगक्षेमविशीं पडे सदनिंची जोखीम माझे शिरीं
होई ती परिपूर्ण सुंदरपणें प्राप्तीच कीं चांगली ९

माझे भाउ, तशा मदीय भगिनी शालागृहीं वा, गृहीं
ज्यां त्यां आवडती, न ठाऊक तयां संकोच किंवा दुही
आई त्यांजवळीच सद्गुण शिके, तीं बाळ झाली जणूं
ताठा पूर्विल तो, स्वभाव कुचका राहे न आतां अणूं १०

× × ×

भावंडें रमलीं, तशी जननिही, मीही दिसें रंगलें,
'माझें' जें अजुनी विशिष्ट जगतीं आहेच तें राहिलें
'माझें हें घर' मी म्हणें परि मना वाटे यथार्थी न तें
चित्तीं शल्य सखोल बोचत सदा मी ना जरी बोलतें ११

× × ×

नाहीं मी बुजरी मुलीं, न पुरुषांपासोनि राहीं दुरी
बोले शिक्षकसंगतीं कितितरी चेष्टाहि त्यांची करी
कांहीं शिक्षक–शिक्षिका मजसवें बोलावयातें भिती
झाले ते मम मित्र सर्वहि पुढें कीं मी सदा सन्मती १२

माझ्याशीं समता दिसे हरगुणीं ऐसें सुमित्रद्वय
लाभे तेथ; तयांत एक मजला झाला अतीव प्रिय
त्याला मीहि तशी; परंतु तिसऱ्या मानीतसूं ना कमी
झालों मित्र तिघे प्रसिद्ध; अमुची एकत्रता नेहमीं १३

× × ×

होतों मित्र तिघे, परंतु तिसरा झाला नकोसा पुढें
ध्यानीं येउनि त्याचिया स्वहृदयीं तो नेहमींचा कुढे
बोले स्पष्टपणेंहि तो परि अम्ही नाहींच तें मानिलें
तच्चित्तांत मम प्रियाविषयींचें शत्रुत्व संचारलें १४

तो त्याचेविषयीं कथा मज खऱ्या खोट्या सदा सांगुनी
चित्तभ्रंश करावयाहि झटतां ओशाळलें मी मनीं
ते मित्र प्रिय, माझियास्तव अतां शत्रू पुरे जाहले
प्रेमाला कटु लागलें फळ, तयें हालाहला जिंकिलें १५

× × ×

कर्तव्यीं अति दक्ष शिक्षक असे दोघे सदा गाजले
त्यां 'दुर्लक्ष करावयांत पहिले' ही किंवदंती सले!
बोलूं स्पष्टपणें स्वहृद्गत चला दुश्चित्तता नाशण्या
ऐसें योजुनि पातलों नदितटीं प्रेमा जणूं जाळण्या! १६

ते दोघे बसले, बसें जवळ मी, चर्चा सुरू जाहली;
तों आवाज चढे, म्हणें मधुन मी 'व्हा शांत; ती मंडळी
लांबोनी बघतात;' मद्वच परी दोघे न ते ऐकती
मारामारिंत होय शेवट; नको तें दृश्य वा ती स्मृती!' १७

× × ×

धीरार्चा, परि बोलवे न तिजला बाहेर गेली जरा
आम्ही दुःखित जाहलों, नयनिंचा चाले कुणाचा झरा
येतां ती परतूनियां पुनरपी झाली सुरू काहणी
थांबूं येथचि आज आम्हि म्हणतां ती घे न ध्यानीं मनीं १८

× × ×

'अन्योन्यां करिती प्रहार, पडलें मी त्यांत, केलें दुरी!
आला शेतकरी अचानक तिथें ती होय मात्रा खरी
ओशाळूनि मनीं अम्ही परतलों, चित्तीं नसे शांतता
डोळां झोप न अल्प, ऊठबसतां जाळी जिवा व्यग्रता १९

मी बाहेर पडें प्रभात अजुनी झाली न तों, लाडक्या
गेहीं जाउनि पाहतां दिसत तो डोक्यास मारी बुक्या
मातें देखुनि लाजला 'चल' म्हणे ' जाऊं तयाच्या घरा'
तेथें तेंच दिसे, अम्हां बघुनि तो झाला जरा घाबरा २०

तों आम्ही वदलों 'क्षमा कर अम्हां' एकत्र कीं बैसुनी
अश्रुक्षालन चाललें, व्यथित कीं चित्तास मात्रा गुणी
लोकीं हीच; पुढें विचार करितां या निश्चया पातलों
आणी मित्र तिघे असूं सततचे कोणी कुठें पांगलों!' २१

× × ×

( भुजंगप्रयात )

कथा संपली संपलें खाद्यही तें
मनोरंजनाचें सुचे कार्य मातें
सिनेमास सारे तसे थेट गेलों
तिथें हास्यकल्लोळ आनंदिं ठेलों २२

× × ×

( शिखरिणी )

परित्यक्ता आतां कथन करिते वृत्त अपुलें
तिचें ऐकोनीयां कवण जन जो चित्तिं न उले ?
तिच्या हालांच्या त्या रसभरित गोष्टी स्थिर मनें
कशा ऐकाव्या कीं गमत अबलांचें पशु–जिणें. २३

× × ×

'पित्याला मातेला मजविण न आधार जगतीं
तयांच्या प्रेमाचा अनुभव मला ये बहु रितीं
सुतेचे पुत्राचे परिचित मला लाड सगळे
स्मरोनी ते आतां नरकगत चित्तीं जळफळे २४

मुलींच्या खेळांचा मज-भंवतिचा ढीग दिसतो
कधीं झिम्मा, पिंगा कधि करित गेला समय तो
मला आट्यापाट्या, हुतुतु, फरिगद्गा शिकविले
सदा प्राविण्यें मीं गुरुजन तयींच्या सुखविले. २५

मुलींच्या कामींही कुशल करि सैंपाक सुरुचि
स्तुती वक्तृत्वाची करिति, जरि ती ना अभिरुचि
रुचावें मातें तें अनवसर ही तत्क्षणिं मिळे
जणूं हो स्वर्गींची धरणिचर धेनू मजमुळें २६

× × ×

सुतेच्या संतोषा जनक-जननी होउनि बळी
मला बी. ए. केलें, अजवरि न बी. ए. जरि कुळीं
पिता-माता तेव्हां मज नियमिती एकवचनें
'विवाहावेळीं मी अभिलषित त्यांचें पुरविणें.' २७

जयांनीं माझें ना अहित लव केलें अजवरी
मदिच्छा-सिद्धी जे करिति, अपुली सारुनि दुरी
पितामाता ऐसे करितिल अकल्याण न कधीं
अशा विश्वासें दें वचन, न गृहीं कीं कुणि कुधी २८

चिकित्सा पूर्णत्वें करुनि वर ते निश्चिति मम
मलाही हो मान्य स्थळ, न सुटला एक नियम!
विवाहाची शोभा अनुपम खरी सर्व म्हणती
असंभाव्या ऐशी उमटत परी संकटतती २९

× × ×

विवाहापूर्वींचा, विधिसमयिंचा नाथ उमदा!
सर्वे वागायाचा अनुभव परी ये मज यदा,
दिसे गोऱ्या देहीं लपुनि बसलें कृष्ण हृदय!
नको! या लोकींचा पति मम असे मूर्त अनय ३०

असे त्याची कोणी प्रणय–लतिका ती मज अतां
दिसे, भेटे, बोले, तिजजवळि त्याची रसिकता
स्फुरे; ती जीवाची निरुपम सखी प्राण दिसता
तिची सेवा दासी म्हणुनि करितां मी पति–रता! ३१

तिची सौख्यप्राप्ती पति–हृदयिंचें वांछित खरें
तदिच्छासिद्धीशीं समरसपणा मद्व्रत ठरे!
स्वतांचें, त्याचें ना, परि वच तिचें वेद मजला
नको तें ये भाळीं; अहह! जडला संग कुठला! ३२

विवाहें माझ्याशीं रति पति अपेक्षी न परि तो
पित्याची संपत्ती निरखुनि मशीं लग्न करि तो.
मनोराज्याचें हें प्रथम न कळे रूप मजला
अतां प्रत्यक्षीं तें बघुनि धरिलें मीं धरिणिला ३३

× × ×

करीं लाठी काठी, गमत मज मी शूर, अबला
असें नांवाला मी, नर शरमती पाहुनि मला
असा तोरा पूर्वी मिरविं परि तो पूर्ण गळला
अतां नांवाची कां? बनत कृतिंची सत्य अबला! ३४

करी हल्ला केवी रिपु? उलट हल्ला चढविती
कसा? ठावें मातें; अभिनव परी ही रणरिती!
बघोनी तें सारें नयन मिटले शुद्ध बुजली
पडे लाठीऐसी पळभर पतीच्या पदतळीं ३५

रिपूशीर्षीं लाठी, परि पति-पदीं मीच पडलें
परी त्याचें त्याला अणुभरहि ना हृद्गत कळे!
मला त्या दोघांनीं उठवुनि तदा हें शिकविलें
'जगायाची आशा तुज, जरि अम्हां तूं सुखविलें!' ३६

× × ×

कुळीं जन्में मोठया, जनक-जननी शुद्धचरित
असद्वृत्ती याची विदित न, न वा संशयगत
विवाहें त्या लाधे सधन तनया पत्नि म्हणुनी!
तरी कां ठेवावी प्रिय रमणि त्यानें लपवुनी? ३७

× × ×

न तेथें सासू, ना श्वशुर न पिता ना जननि वा!
नसे संधी व्हाया परिचय कुणाशीं मम नवा!
तयासंगें गेलें हंसतमुख मी; हास्य परि तें
निघोनी जें गेलें, अजुनिहि न तें लेश परते ३८

सखी त्याची गेली प्रथमचि तिथें नोकरिमिषें
नसे ठावें मातें, हृदयिं तरि तें येइल कसें?
धनप्राप्तीपायीं गमन मज दूर–स्थलिं रुचे,
परी तेथें जातांक्षणिंच मनिंच्या मी मनिं खचें! ३९

अम्हां न्याया आली अधममति ती स्टेशनिं जशी
नकोशी ती वाटे, अनलसम ती होय मजशीं!
तिचा ह्याच्याशीं जो परिचय मला तेथ दिसला
तयें चित्तींचा तो हुरुप मम गेलाच सगळा! ४०

× × ×

नसे लावण्याची खनि, न युवती वा सुदृढ ती!
तिची हास्यें युक्त प्रबल परि वाणी मधुमती
तिचा त्याचा होई परिचय कसा ज्ञात न मला
तिनें त्या वाणीनें परि बनविलें शुद्ध कुतरा ४१

विवाहाची नाहीं अभिरुचि, कुमारी असुनि ती!
परी त्याचे ठायीं अनुपम तियेची अनुरति!
तिच्या ठायीं त्याची दृढतम तशी प्रेमळ मति
जणूं अन्योन्यांची प्रणयविषयीं ते प्रतिकृति! ४२

× × ×

'न जाई बाहेरीं कधिंच' मज आज्ञा सततची
तया दोघांची मी बटिक बनलें नीच परिची
शिपाईही माझेवरि करि पहारा निशिदिनीं
न येऊं दे कोणा, जवळिं तरि कां येइल कुणी? ४३

तयाची मी वेडी भगिनि, जगतीं काळजि कुणी
नसे घ्याया, आणी म्हणुनि परदेशींहि जपुनी
कथा ऐशी सर्वां कथुनि लपवी पाप अपुलें;
तयाची ती कांता, करिति तिजला मान्य सगळे ४४

× × ×

सवें माझ्या तातें कितितरि अलंकार दिधले
न ते माझे हातीं, करगत तयाच्याच सगळे!
तयाच्या साह्यें ते करिति नव तारुण्य तरुण
तुम्हां सर्वांचें तें स्मरण मज होई निशिदिन ४५

न हें कांहीं ठावें श्वशुरगृहिं, ना मातृगृहिं वा
पिचें मी अंधारीं, गमत करूं कां सर्व बकवा!
विचाराला कोणाजवळ न मला स्थान कुठुन
अखेरीला केलें जगतिं जगणें त्यास कठिण! ४६

× × ×

शिपाई वा कोणी जवळि नसतां गेह त्यजिलें
विवाहाचे फोटोसह गमन शाळेंत वरिलें
वरिष्ठांतें सारें कथन करि मी सत्य अमुचें
कुणा विद्यागारीं अधम कधिं का शिक्षक रुचे! ४७

कथा तो आश्चर्यें श्रवण करि कादंबरि जणूं
प्रतिप्रश्नीं ठेवी स्वहृदयिं न तो संशय अणूं
तयाची ती काया, मधुर वच तें, धीर मज दे
पित्याशीं मातेशीं गमत मजला मी जणुं वदें ४८

भयार्ता मी आलें भयरहित तात्काळ बनलें
बघोनी हें त्याचें मृदुल मन भारी गहिंवरे!
चहा आणी प्रेमें बहुविध फळें दे मज तशीं
तयाचा ना राहे लवहि परका भाव मजशीं ४९

× × ×

सुखासीना झालें कितितरि दिसांनंतर खरी
सभोंतीं ग्रंथांचें बघुनि मज भांडार लहरी
पुन्हां आनंदाच्या उमटति, गमे वाचन करूं
महात्म्यांच्या ग्रंथीं विहरुनि मनःशोषण हरूं ५०

करीं ग्रंथा घेई, मन तिकडे लागत मुळीं
तया शिक्षा होते, चढत अथवा दुर्बळ मुळीं
विचारांच्या ऐशा लहरिंवरि माझें मन डुले
स्थिरा वृत्ती गेली, मन विकल झालें, अडखळे ५१

× × ×

अशा वेळीं येई श्रुतिवरि तिघांचें वचन जें
मना घे वेधोनी, प्रकट परि मी होऊं न धजें,
मला बोलावी तो; मज बघुनि दोघे चमकले
तयांच्या तोंडींचें मधुरपण तें सर्व विरलें. ५२

'कुणाचे हो फोटो' म्हणुनि पुढती तो करि तसे
न ते बोलायातें धजति, बनले पामर पिसे
'निघा, या साध्वीला कपट करुनी थोर छळिलें
तुरुंगाचें आतां प्रखरपण तुम्हांस ठरलें.' ५३

तयाचे ते पायां पडति शरणार्थी, न उठती
म्हणे 'जावें हीतें शरण, तिज दावा उपरति;'
पदीं माझ्या तेव्हां पडति, मज दोघे विनविती
न नातें मी पाहें कटुतम वचें दे जणु मृति ५४

महात्मा तैं बोले 'विधिगृहित भार्येस कपटें
दुरी आणोनी तूं करिशी कृति जी लेश न पटे
चिता तीचे भोतीं रचुनि अनला दीप्त करुनी
मजा हीचे संगें बघसि, तव ही धन्य करणी! ५५

स्वतां तूं स्त्री स्त्रीतें सजिव असतां जाळिसि सुखें
करी ज्वालांनीं ती तडफड, तुझें चित्त हरिखें
कशी प्रेमापायीं मरणसम निष्प्रेम बनसी?
न ही हिंसा कोणी तुजविण करी बावनकशी ५६

न ही भार्या तूझी, नच भगिनिही, ही तव बळी
सुटे सद्भाग्यें ती; अभिनव जणूं जन्म कवळी
न नातें पूर्वीचें उरतहि, घटस्फोट घडला,
चला सोडा विद्या-सदन क्षणिं हें, ह्या नगरिला' ५७

× × ×

न ठावें तच्छब्दा नगरिंत अनुल्लंघन कधीं
तयें काळें केलें त्वरित, करितां मीं न अवधी
निघालें त्या खाणावळिमधिं हिची गांठ पडली
नको ती माहेरीं, श्वशुरगृहिं, जी हाय उठली.' ५८

× × ×

(शार्दुलविक्रीडित)

'भेटे तैं मज ही अचानकपणें खाणावळीमाजि कीं
लागे बाळ रडावया दसढसा वेडीच वाटे निकी
दु:खाचा कढ ओसरे, मग मला ही कांत–विद्वेषिणी
सांगे, 'पावन मी तरी मज पती टाकी', कटू काहणी ५९

अश्रूंचा नद वाहवूनि मज ही सांगे कथा आपुली
तेव्हां मी मनिंच्या मनांत जळलें पोळें निराशानलीं
पाहोनी रडतां हिला मजसिही आवेग ना आवरे
ही तात्काळ निघून जाय परि कीं, तो ये तसा ओसरे ६०

× × ×

(शिखरिणी)

'न नीचांचें होई मन सुखित त्या नीच कृतिनें
स्वमाता–तातांचीं, जनकजननींचीं मग मनें
असत्यें सांगोनी कलुषित करायास सजती
परित्यक्ता मातें पदवि करिती दान कुमती.' ६१

× × ×

(अनुष्टुभ)

कथा ही ऐकुनी आली । सर्वां चित्तीं विषण्णता
विश्रांति संपतां सांगे । विधवा आपुली कथा ६२

× × ×

[ मंदाक्रान्ता ]

'उद्योगाचें सदन पदवी जी मला प्राप्त होई
केली सार्थ प्रचुर कृतिंनीं, स्तोत्र हें मी न गाई!
गेहीं दारीं सकल वदती काम हीनें करावें
नैराश्याचा परिचय न वा नाम त्याचें न ठावें ६३

बी. ए. झालें तरि न नसती ऐट आरंभिली मीं
छोटी मोठी सुकृति करण्या सिद्ध बाहेर, धामीं
विद्या-भूषा म्हणुनि सधना बुद्धिमंता हवीशी
साधी साध्वी अधन दुबळ्यां वाटते आपुलीशी ६४

भाऊ सारे धन कमविण्या कष्टती; एकली मी
सेवाधर्मी रत; भगिनिला मानिती ते निकामी!
देशाचें त्यां हित न दिसतें, नाहिं त्यांना समाज
संपत्तीचा नयनिं भरला त्यांचिया मत्त माज ६५

कांता त्यांच्या पतिरत खऱ्या, नात पाणी उतारा,
त्यांचें त्यांना हित अहितही नाकळे; व्यर्थ तोरा!
मत्प्रेमाचें व्यसन, तरिही भिन्न त्यांचा स्वभाव
एके ठायीं करुनि वसती नाहिं सौख्यास वाव ६६

झालें कार्यी रत परि मना सोबतीची जरूरी!
नाहीं गेहीं कुणि हृदयिंचें होइ जें साह्यकारी;
नित्याची मी करित फिरतें उच्च वा नीच सेवा
विश्वासाचा कुणि न मनिंचा जेथ ठेवीन ठेवा. ६७

× × ×

हातीं माझ्या अवचितपणें पत्रिका एक येई
वाचोनी जी फिरुनि फिरुनी बावरी वृत्ति होई!
साचें का हें? मन रिझविण्या मस्करी कां करी ही?
दोलारूढा दिवसभर मी निश्चिती नाहिं नाहीं ६८

मार्गी तों मन्नयन पथिं ये, जाइ वेगें निघूनी
आलों कार्यें निगडित अम्ही एक ठायीं फिरोनी!
आधीं बोले कवण, उभयां ध्यास हा लागलेला
बोलायाचा प्रथम मग मीं शेवटीं धीर केला ६९

'चेष्टा माझी करि अजि कुणी, पत्रिका धाडियेली
वाचीं ती मी त्वरित, तव तों देखिलें नांव खालीं;'
बोलें या तन्मुखि चमकले भीतिचे घर्मबिंदू
तद्रीतीनें हृदयिं उसळे माझिया मोदसिंधू ७०

'घर्माचे ना वदनिं तुझिया बिंदु हे प्रेमबिंदू!
दारिद्र्यानें नरवर नको आपणा अल्प निंदू!
कार्यानें तूं जनहृदयिंचा घेतला पूर्ण ताबा!
श्रीमंती ही सुलभ न जगीं, ही अलभ्या अलभ्या' ७१

झाला भीती-रहित हरिखें, हो खुलें चित्त, बोले
'दारिद्र्याचा वर सततचा, त्यापुढें काय चाले!
दारिद्रें मी अजवरि पुरा पारखा शिक्षणाला
ध्येय-प्राप्तीवरि मम पुरा घालि तें घोर घाला ७२

विद्याभूषान्वितजनकरीं श्रेष्ठता ये सुखानें
विद्या लक्ष्मीकर धरुनि ये, निर्धनीं ती न येणें;
खस्ता खाई किति कितितरी; द्रव्य हातीं न येई,
तत्प्राप्तीचा त्यजुनि पथ, ही पाइकी वृत्ति घेई ७३

सेवेसाठीं जनन जगतीं मानवानें वरावें
सेवेसाठीं तनमनधनां `चणें पूर्ण भावें
सेवामार्गें अखिलजनतासंस्कृती साधुनी घे
ध्येयें या मी कृति करित; तूं भेटसी तेथ ओघें ७४

मी एकाकी, अधन, धनिकांपासुनी दूर राहें
माझी सेवा विपुलहि यशःसंपदा अल्प लाहे;
नैराश्याचें पटल म्हणुनी मानसीं येउं पाहे
त्वत्साह्याची निकड, तरि मी मूढसा तूस बाहें, ७५

तूं बी. ए, तूं धनिक, नगरीं मान्यता थोर तूंतें
विद्या नाहीं मज, धन न, मी पारखा मान्यतेतें
भिन्नत्वाचें असुनि मजसी ज्ञान तें पत्र धाडीं
मूर्खत्वाची खचित कृति ती; वृत्ति हो पूर्ण वेडी.' ७६

'वेडी वृत्ती वचन तव हें दाविते, पत्र तें न
पत्रीं मातें सहज मिळतें मन्मनोराज्य पूर्ण!
साह्यापेक्षा तुज, मज तशी उत्कटत्वेंहि वाटे,
तूं मातें, मी तुज उचितशी; योग्य योग्यासि भेटे' ७७

× × ×

भावासी ना वहिनिसि न वा आवडे कृत्य माझें
श्रीमंतांची भगिनि अधना घालितां माळ साजे?
नाहीं आलें विधिसहि कुणी; मी पुन्हां त्या घरांत
नाहीं गेलें, जरि यमपुरीं जाइ तो पुण्यवंत ७८

मानव्याचें हनन करुनी चाललें या समाजीं
धूर्ता स्वार्थप्रद म्हणुनि तें साधण्या तेंच राजी
आम्ही दोघे शिकवण नवी कष्टतों नित्य द्याया
होते पूर्वी पददलित ते लागले ताठ व्हाया ७९

नीचांची ही सहज न जगीं नीचता, कृत्रिमा ही
स्वार्थोपायीं करुनि वळुनी निर्मिली ही नरांहीं
स्त्री शूद्रादी म्हणति, 'शिकणें आमुचा धर्म नोहे'
हें सृष्टीचें कथन न, कथी ज्ञानवान् त्यां सदा हें ८०

सत्तत्त्वाचा जप करित या जोडपें नित्य जाई
सेवा त्या त्या समयिं उचिता चालली ठाइं ठाईं
झालों आम्ही सुहृद अबलां, शत्रु सामर्थ्यवंता
आतां भोंती जमत अमुच्या संच जो कार्यकर्ता ८१

× × ×

'नाहीं अंगीं वसन, उदरीं अन्न ना, गेह नाहीं
दुर्गंधीची सहवसति त्यां नित्य आमृत्यु राही
चाले अस्मत्पशुकरण हें सारखें आजवेरी,
ना हें दैवीं, मनुजकृत हें, ही असे शुद्ध चोरी!' ८२

गर्जे ऐसें तरुणगण तो काढुनी उच्च सूर
कीं थोरांच्या हृदयिं उसळे राग जो दुर्निवार!
लाखोली कीं शिरिं अमुचियां दुर्वचांची पडावी,
धर्मप्रेमी रत नर कुणी मृत्युची भीति दावी ८३

थोरांशीं हा कलह अमुचा चालला नेहमींचा!
आतां आला समय, नुरला आमुचा संघ कांचा!
होते थोडे, तरि तरुण ते भारलेले पुरेसे
ज्या त्या ठायीं उडविति हंसें त्या जनांचें प्रकर्षें ८४

× × ×

होता कोणी कृषिवल ऋणीं जो बुडाला शिखान्त;
जाची त्याला अधम धनको, वाटला त्या कृतांत!
शब्दें ताडी प्रखर, धजला मारण्या त्या छडीनें
राहे मार्गं व्यथित हृदयें एक बाहेर येणें ८५

गेहांतोनी रडत निघतां पाहिलें मी तयाला
होता त्याचा परिचय तशी जाणि मी सावकारा!
घेवोनी त्या गमन धनकोपाशिं तात्काल केलें
मातें त्याचेसह कटुवचें निर्भयें ताडियेलें ८६

प्रार्थी त्याला मृदुल वचनें 'निर्धना दान द्या या'
ओकोनी तो गरल वदला 'येसि या केंवि ठाया?'
'शिक्षा याला कडक करणें' निश्चयें या निघालें
जावोनी मीं कृषिवल–गृहीं कागदां धुंडियेलें ८७

आल्या माझ्या करिं कितिकशा पावत्या त्या जुनाट
वाचोनी त्या मज उमगलें त्यांत खोटें अफाट!
आश्वासोनी मधुर वचनें त्या गरीबा, त्वरेनें
येतां गेहीं पति मज म्हणे 'आपुलें हेंच लेणें' ८८

आधारें त्या करुनि खटला खेचिलें कोडतांत
साऱ्या गांवा कळुनि चुकली ती क्षणार्धांत मात!
आले अस्मद्‌गृहिं किति धनी, प्रार्थिती 'त्यास तारा'
भावांचीही पदधुलि करी पूत माझे अगारा ८९

आम्ही दोघे, कृषिवल तसा, राहिलों सत्यनिष्ठ!
देणें नीचा अभय, गणणें हो असत्या वरिष्ठ!
साऱ्यांनीं तें सतत खपुनी साधिला तो पुरावा
गेला कारागृहिं धनिक तो, होत संतोष जीवा ९०

× × ×

संतोषानें अधनजनता वाटली मत्त झाली!
संतोषानें धनिक वदनीं आलि लाली निराळी!
बाहेरीं वा सदनिं सगळे बोलती हीच गोष्ट
आशावादी दिसति बनले लोक सारे कनिष्ठ ९१

× × ×

निर्द्रव्यांची अघविरहितां थोर संख्या तुरुंगीं
आणी त्यांना धनिकगण निष्कारणें त्या प्रसंगीं
त्यांची कोणी कधिं न करिती चौकशीही जगांत
जातां तेथें अधम धनको गार्वि झाला अकांत ९२

कांटे झालों धनि–गण–मनीं आम्हि दोघे म्हणोनी
शिक्षा आम्हां करुं बघति ते साधुनी घोर हानी!
पूर्णत्वातें तदभिलषित प्राप्त होई त्वरेनें
गेला माझा सहचर तरी मी न मेलें मनानें ९३

× × ×

अंधारीं मी पतिसह जवें जात होतें; अशांत
लाठया डोंई पडति, पडलों आम्हि दोघे, न शुद्ध!
आली शुद्धी मज, न परि त्या जाइ अस्तास त्यांत!
वीराचें त्या मरण मिळलें, हाच आनंद होत! ९४

दोषी झाले प्रकट न कुणी, शोध केला अपार!
दुःखी झालें, परि न विरलें, मी मनाची कठोर!
आले भाऊ, वहिनिहि, परी जोडिली मीं न मैत्री,
गेला माझा सहचर तरी तत्स्मृती साह्यदात्री.' ९५

× × ×

( आर्या )

व्रत चालवी पतीचें धैर्यें, अभिनंदिती तिला सारे;
सौभाग्यवति–कथा ती ऐकाया सिद्ध सर्वही झाले ९६

× × ×

( स्रग्धरा )

'कॉलेजीं राहिलें मी, सुटत न परि ती सांप्रदायी प्रवृत्ति
चाले तें पूजनादि प्रतिदिन मम, कीं जाहली थोर ख्याति;
झालें ह्या काळची मी प्रथितयश 'जनी,' येइ चेष्टेस पूर;
विद्युद्दीपारती मी करित नत मनें रोज तुम्हांसमोर ९७

भावें नीरांजनीं मी सुबक चिमुकल्या घातली तेलवात
झाली चेष्टा सुरू कीं पळभर न टिके आंत खोलींत ज्योत!
लावोनी 'टॉर्च' जेव्हा प्रभुसि अळविण्या लागलें, होय टाळी,
राहे ताजी स्मृती ती, अणुभर विसरे ना तदाची टवाळी ९८

× × ×

लग्नाला अष्टवर्षा वधुच उचित हो मी वयें एकवीस
प्रायश्चित्तें पवित्रा बनुनि सुखविं मी आपुल्या मानसास
पूर्वींचे ढंग सारे विधिसमयिं पुरे पाळिती जे वराडी
केले मी आवडीनें, तरुणजन परी त्यावरी फेकि राडी ९९

श्रीमंतीची अनिच्छा जगतिं असुलभा; मातृतातादिकांनीं
केली त्यांची पसंती धनिकतम अशीं पारखूनी घराणीं;
साजे माझे वयाशीं वय, सुदृढ तनू, नेटकें रूप, रंग,
वाटेना शिक्षणाचें विषमपण पुरें साधण्या लग्नभंग १००

कॉलेजी शिक्षणाची अभिरुचि म्हणुनी मी न कॉलेज गांठीं
लग्नाचे ना रुचीला अनुसरुनि जमे, ही वयें होय मोठी
ठेवा गेहीं कशाला! जनकजननिनीं धाडिलें तेथ मातें
माझी तेथील वृत्ती प्रचुर अनुभवें ज्ञात सारी तुम्हांतें १०१

× × ×

श्रीमंतीचे सभोंतीं जगभरिं दिसतीं दाट जाळीं जुनाट
धर्माचे रूढिचे त्या अहितकर तरी वाटती बांध कोट!
होती ते वैभवाचें विलसन करण्या साह्यदाते प्रभावी
जों जों श्रीमंत वाढे, अधिक अधिक तों धार्मिकी वृत्ति दावी १०२

श्रीमंताची सुता मी श्वशुरगृह पुन्हां वैभवें थोर भारी
श्रद्धेचें स्तोम तेथें बघुनि मजसिही फार येई शिसारी
दुर्गंधी हो सुगंधी परिचय घडतां दाट, हा न्याय लोकीं
जिव्हेला दुष्ट दारू प्रथम, संवयिनें मानितो गोड षोकी १०३

झालें तेथें जुनी मी, दिवसभर तशी दंग हो त्याच कामीं
पंचांगातें बघोनी फिरुनि फिरुनि तें तेंच हो नित्य धामीं
श्रद्धा आतां असो वा नसुनिहि घडतां तेंच, होतो स्वभाव
नाहीं नावीन्य कोठें दिसत, नुरत वा गेहिं नावीन्य–नांव १०४

मद्वृत्ती ती पुराणी, सहवसति तुम्हां तार्किकांची मिळून
होई कांहीं सहिष्णू, पुढिल अनुभवें पूर्ण झाली नवीन!
श्रद्धेच्या बंधनीं त्या स्मृतिपुढति तुम्हां मंडळींचीं वचें तीं
येवोनी मन्मनातें डिवचुनि म्हणती, योग्य ही काय रीती? १०५

गेल्यापासोनि तेथें हळु हळु विसरूं लागलें ज्ञान माझें
विद्याव्यासंग नाहीं पतिस, तरि कसा तोच पत्नीस साजे?
विद्येहूनी मलाही अभिमत गमली शांतता मद्गृहींची
सर्वांचें प्रेम लाहे, तरि न मम मना वाचनाभाव जाची १०६

मामंजींना न बी. ए. म्हणुनि रुचत मी, शिक्षिता मी असून
धर्मांकर्मांस मानीं, सुगुण मम तया आवडे हाच पूर्ण
कांताचेंही अडाणीपण लपवुनियां टाकण्या एक मार्ग
अज्ञानी पूर्ण मीही म्हणुनि मिरविणें झांकुनी ज्ञानयोग १०७

गेहीं बाहेर माझें सुगुणकथन जें चालतें सर्व ठायीं,
त्याची ही रूपरेषा–'सकल विसरली येथ येतांच बाई;
आम्हां ऐशीच वागे, स्वकरिं न धरिते ग्रंथ केव्हांच साध्वी
दावा ऐशी कुणीही नगरयुवति जी ज्ञान केव्हां न दावी?' १०८

स्तोत्रांचें गान माझ्या श्रवणिं मम पडे, मी न संतुष्ट त्यानें
ज्ञानाचें हें कुणाला अवगणन पटे? हा अधःपात जाणें!
गेहींच्या शांततेचा पथ म्हणुनि मला सेवणें प्राप्त होई
लग्नापूर्वी कुणासी पळभरहि कधीं कल्पना ही न येई १०९

मातातातादिकांसी, ममहि मनिं तदा शिक्षणाची न हौस
कोणाच्याही परंतू हृदयिं वचनिं वा ज्ञान–निंदा न खास !
तेव्हां मी ज्ञान–वापी–तटिं बसुनि किती पान आकंठ केलें,
ओकावें लागलें तें; अहह मम शिरीं पाप हें काय आलें ? ११०

चित्ताची शांतता मी ढळुं न परि दिली, चेहरा हांसराच
नित्याचा ठेविला मी कृति करित सुखें गेहिंची उच्च नीच !
ध्यानीं येई सदा, जो कटुतम तुमचा वाटला बोल तेव्हां
'काढावा मार्ग काला धरुनि नव असा, हो जुना त्याज्य जेव्हां' १११

× × ×

मामंजींचा गुरू ये प्रथमच आमुच्या पाहुणा आज गेहीं
सिद्धी तत्स्वागताची बहुविध करितां प्राण कंठासि येई
रागावेना कधीं जी, कडक वच वदे माउली सासुबाई
मामंजींशीं न त्यांचा कलह बघितला, आज ती वेळ येई ११२

सर्वांआधींच पाटावरति बसुनि तो लागला जेवणाला
उष्ट्याचा आपुल्या तो श्वशुरवदनिं दे घास, तो मान झाला !
मानाचा घास आतां सदनिं, पुरुष वा स्त्री, समस्तां जनांला
द्याया तो लागला कीं गुरुजनमनिं मी घातला आद्य घाला ११३

आले सारे प्रसादा, स्वकरिं भरवितो, धांवल्या सासुबाई !
नांवें हाकारि मातें, सकलहि म्हणती धांव, त्यां होय घाई !
नाहीं आलें परी मी, श्वशुरमनिं तसा थोर संताप होई
सोहाळा जेवण्याचा उरकुनि निजला, नीच विश्रांति घेई ११४

कांतांनीं बोलवूनी पुनरपि मजला त्याचिया सन्निधानीं
नेवोनी तत्पदाचें चुरण करिं असें सांगतां मानहानी
झाली भारी गणोनी, त्वरित निघुनि मी जाय तेथोनि खालीं
आतां ये संकटाची तति दिनरजनीं माझिया या कपाळीं ११५

× × ×

पूर्वींची लाडकी मी, सकल जन मला मानिती प्रेमभावें
आतां मी तीच झालें, अवगुण सदन प्रेम गेलें स्वभावें!
होई आतां अवज्ञा प्रतिपदिं, मजला गेह वाटे श्मशान
सौंदर्याची खनी मी हंसतमुख तदा, हो अतां कांतिहीन ११६

नाथांनीं दापिलें कीं, 'गुरुजन–मन मीं मोडिलें मूढतेनें
जाऊं या तेथ दोघे, गुरुपद नमुनी याचना लीनतेनें
माफीची त्या करूनी, गतसुख मिळवूं, कोठला व्यर्थ ताठा?
ताठ्यानें सर्व हानी, सुगुण-सदनही पूर्ण होतो करंटा.' ११७

त्यातें लाभे न माझी अनुमति, वदती कीं सुखें जा निघोनी
नाहीं मी जात ऐसें बघुनि नववधू आणियेली कुठूनी
झालें तेव्हांच त्यांचें परिणयन दुजें, मी तशी कीं निघालें
माता–तातांचिया त्या पुनरपि सदना आश्रयालागिं आलें.' ११८

× × ×

( साकी )

सर्वजणींच्या कथा ऐकुनी माझी मी सांगाया
प्रवृत्त होतां स्मृती जुन्या त्या आल्या मज दुखवाया ११९

× × ×

(पृथ्वी)

'पुरें करुनि शिक्षण स्वगृह थाटण्या मी निघें
सुता अपुलि द्यावया मजसि थोर जो तो बघे
बघें कितिक मी तरी; मजसि शेवटीं जी रुचे
रुचे तिजसि मी; असें बघुनि बद्ध झालों वचें १२०

सुहृन्मम कुणी करी श्रवण वृत्त हें, पत्रिका
लिहून कळवी मला त्वरित, 'लग्न लावूं नका'
विचार करिं मी, दुजा गुपित हें विचारी तरी
न गूढ उकले, न दे मजसि वा कुणी खातरी १२१

वधूस न पिता न वा जननि, रक्षिता मातुल
न संशय कुणी तयाविषयिं घेई तो सत्कुल;
अशांत प्रिय मित्र तो मजसि भेटण्या पातला
म्हणे सवड काढुनी दिवस दो प्रवासा चला १२२

प्रवास करुनी कुण्या नगरिं येउनी पोंचलों,
तसें तडक मोटरींतुनि कुण्या गृहीं पातलों!
प्रवेश गणिकागृहीं करितसूं, कळोनी मला
प्रकाश पडला हृदीं न वच-वाच्य तो याजला १२३

× × ×

वधू मम ठरे अतां अनुभवेंच वेश्यासुता;
असत्य जगिंचें अतां कळुनि ये मनीं खिन्नता;
वधूचरित पाहतां न परि लेश शंका गमे
विमूढ बनलों खरा क्षणभरी मनःसभ्रमें १२४

'कुळावरुनि सद्‌गुणी कुणि असद्‌गुणी वा ठरे'
न मान्य मत हें मला अजवरी; अतां तें खरें
ठरे, तरि न शास्त्रसंमत तशी न नीती खरी!
सुशील असतां वधू न करिसी खरी वैखरी? १२५

विचार करुनी मनीं ठरविं, लग्न कीं तीसवें
करीन, दुसरीसवें न; सहजीं मिळे जें हवें;
विवेक करुनी असा स्वमन शांत कीं तत्क्षणीं,
शिरे सदनिं तों वधू मम सचिंतशा लक्षणीं १२६

सगद्गदित ती वचें वदत 'मी असत्या खरी
असत्कुल न आपुलें कथियलें कधीं मीं; तरी
वचःपरिणिता मला समजुनी न या संकटीं;
क्षमा मज करा, असें म्हणुनि जाउं पाहे सती १२७

× × ×

तिला अडवुनी म्हणे 'तुजसवें, न मातेसवें
विवाह करणार मी, अघ तुझ्यांत ना संभवे!
करूं ठरविलें तसें, घर करूं नवें आपुलें
न जेथ मल अल्प, सज्जनहि जें बघुनी डुले' १२८

रुचे तिज न हें म्हणे 'अजुनि जीविताच्या रणीं
सुशील मम शील वा अधम, व्हायची पाहणी!
सुशील अनुभूतिनें सहज मान्य कालांतरीं
जरी करिल सज्जन, प्रिय तुम्ही म्हणावी तरी' १२९

× × ×

कलंक तिज लागला जननिचा; तिची वृत्ति ती
कुणी नियमिली? तिच्या जननिनें? तिची दुःस्थिती
कशास्तव? निरुद्यमा, मिळत अन्न ना खावया!
तिला स्वतनुविक्रयाविण नुरे जगीं मार्ग या १३०

निरुद्यम, निराश्रित, स्थगितबुद्धि नारीजनां
मनुष्यपण राखण्या करुनि योग्यशी योजना
कलंक गणिकाख्य जो जगतिं न्यावया त्या क्षया
सुसज्ज सति हो जणूं समर जिंकण्या क्षत्रिया १३१

स्वतांस अघमूर्ति या गणिति सर्व वारांगना
समाज–गत घाण त्या म्हणति आपुल्या जीवना
उपाय न दिसे दुजा जगिं परंपरा मानुनी
तनू विकुनि राखिती तनु, न हौस ती त्या मनीं १३२

अनीति गमते पुढें संवयिनें स्वभावक्रिया
अवश्य गणिका नरा विषयलंपटा लोकिं या
परस्परसहाय्यक प्रथित ही पुराण प्रथा
स्त्रियांस करि आळशी पसरवी समाजीं व्यथा १३३

चिडोनि करिते स्त्रियां सदुपदेश ती सारखी
तिचा 'निरलसाश्रम' प्रथित, ती समस्तां सखी;
तदाश्रम हळु हळू पुरवुनी तयां उद्यम
सुखें शिकवि त्यां मनुष्य बनणें करोनी श्रम १३४

प्रमोद मज जाहला बघुनि पूर्व वारांगना
सदाचरणि जाहल्या, श्रमुनि साधिती जीवना;
स्वतांसह मलाहि ती 'निरलसाश्रमीं' राबवी
तिच्या सुगुणगायनीं जन कठोर होती कवी १३५

× × ×

तिचें वचन पूर्विंचें सफल पूर्ण केलें अतां
प्रमोद किति वाटला हृदयिं आमुच्या तत्वतां
तदा वरुनि मी तिला उपकृता करीं वाटलें;
अतां वचन पाळुनी मज तिनेंच उंचावलें! १३६

× × ×

तुम्ही भगिनि लाडक्या मम, तदा जरी पांगलों
मुहूर्त शुभ आजचा, फिरुनि मद्गृहीं भेटलों
जरी घरिं न आज ती तुमचिया खऱ्या स्वागता
तुम्हांस कथितों तरी सकल मी तिचे हृद्गता १३७

इथेंच तुम्हि राहुनी 'निरलसाश्रमीं' कष्टुनी
प्रयोग नव सिद्ध हा करुनि दाखवावा जनीं
पहाल सखिसी किती सुख तुम्हांसवें राबतां
समाज सुखवूनि व्हा सुखि तशा तुम्हीही स्वतां १३८

× × ×

प्रिया माझी इतुक्यांत परत आली
चढे आनंदा रुची तों निराळी
तिनें आग्रह त्या फार फार केला
मान्य त्यांना तात्काळ तो जहाला १३९

मैत्रिणी त्या स्थलिं भिन्न भिन्न चित्तें
काल कंठिति, एकत्र व्हावयातें
असति उत्सुक, हें स्थान योग्य वाटे
प्रेम कार्यासह येथ तयां भेटे. १४०

१८ ते २८ जुलै १९३८ ]

# पुनर्मीलन

(चाल–धन्य शिवाजी–)

(१)

प्राणप्रिय जो, प्रेममूर्ति जो, त्यानें जें दिधलें,
केवळ त्यानें उच्चारित जें पूर्वी लडिवाळें
नाम मालिनी अवचित कानीं पडतां ती तरुणी
दचकुनि मागें वळुनी पाहे विस्मित नयनांनीं
दिसे तिला, तों सस्मित वदनें अश्रुपूर्ण नयनें
समीप तीच्या उभा मावळा पाहत प्रेमानें
हो वेषांतर, हो रूपांतर, हो जन्मांतरही
परि प्रेमांजन लाहे लोचन अचुक तरी राही
प्राणनाथ हा ओळखुनी ती देहभान विसरे
कोमल लतिका कीं वृक्षाच्या स्कंधीं आधारें.

(२)

हृदयांदोलीं मूर्ति सदा जी खेळे स्वच्छंदें
विसावतां ती अवचित्त अंगीं केविं न आनंदें !
बोल सांवरी तिचा भुजेनें एक्या, दुसरीनें
पसरि कांबळी, निजवी तीवरि किती दक्षतेनें !
क्षणार्धांत हें घडलें सारें, जागी ती झाली;
प्रियकरवृत्ती पाहुनि अंतरिं रसिका ती धाली
विनयवति परी क्षणीं उठोनी बसे शिळेवरती
आस मनीं कीं कंबलासनीं बसो प्रेममूर्ति;
परी मावळा शिलासनाचा जन्माचा स्वामी,
स्कंधिं कांबळी घेउनि बसला समीप आरामीं.

(३)

प्रथम उमाळा ओसरतां ती बोलाया सजली
म्हणे 'ईश्वरी चमत्कार हा गांठ अशी पडली!
कडीकपारीं, निर्जन रानीं एकलेंच जाणें
कुणा रुचेना, जी ती मजला जाउं नकोच म्हणे
अंतर्यामीं परी वीरवर मद्रक्षणकाजीं
सदैव तत्पर राहे, त्याची स्मृति करुनी ताजी
निसर्गदेवीसंगें त्याचीं स्तोत्रें गायाला
आलें कीं तो अकस्मात मज पाठीशीं दिसला'
इतुकें बोलुनि गहिंवरली ती, कंठ तिचा दाटे
यत्नेंही तो पूर तियेच्या नेत्रिंचा न आटे!

(४)

सहृदयतेला वेड दुज्याशीं एकरूप होणें
वेड वाढतें तें प्रेमाचे साह्यें कोटिगुणें.
प्रेमें त्यांतहि बद्ध जीव जरि बद्ध एक काजीं
त्या वेडाहुनि मोहक दुसरें नसे जगामाजी!
विरघळला तो प्रबल वीर परि जणुं मालिनि बनला
यत्नें नियमित करितो अपुल्या कोमल वृत्तीला;
समीप तिचिया जाउनि बोले मधुर मधुर बोलां
'पाहिं विहंगम नितान्त सुंदर बोलावी तुजला'
ऐकुनि वच हें, उठुनि तत्क्षणीं आंसु तिनें पुसिले,
मधुर हास्ययुत वदनें वच हें मार्मिक ती बोले,

(५)

'विहंग सुंदर—नितांत सुंदर—एक मला गवसे,
त्यासंगें मी क्रीडा करितां स्वर्गसुखा हांसें
विनोद केला, विरोध केला, हंसलें रुसलेंही
जन्माचा तो सहचर मम, या विश्वासें राहीं
परी विहग तो, जाय विहरण्या, काल किती गेला!
वर्षें झालीं बारा, नाहीं लेखहि धाडियला
नागरिकाचा होय रानवट, मुंडासें डोई,
कटिं लंगोटी, आणि कोयता, पायताण पायीं,
खांदिं कांबळी, हातीं काठी मावळाच झाला.
त्याचे गेहीं मीच होउनी आलें भेटीला.'

(६)

'भेदक नव हा विनोद मालिनि' तो तिजला बोले,
'नाहिं विसरलों तुजसि, वियोगें अंतर ममहि उलें.
कोपें भूपें कारागारीं मजला पिचवीलें!
बंधमुक्त होतांच दर्शना तुझिया त्वरित पळें.
एकलीच तूं होतिस, केलें स्वागत आनंदें
तात तुझा परि येतां तत्क्षणिं घालवूनि तो दे
तीव्र लालसा स्वतंत्रतेची, बंडाला सजलों
अपयश आलें म्हणुनि, मालिनी, कारागृहिं पडलों.
परि तव तातें चोर—जारसम मजला मानियलें;
प्रिय पहिला मी, तरि मग दर्शन नको नको झालें;

(७)

‘परोपरीनें तुम्हां विनविलें, लाभ काय झाला!
प्रेमबद्ध परि विवाह–बंधन नव्हतें अपुल्याला;
होतों अंतरिं एकरूप, परि लोकीं परकेच;
नेउं कसें तुज? ठेवुं कसें तुज? पडे मला पेच
क्षणांत एक्या मनांत माझें भाजे काहूर
नुचले पाउल पाहुनि तुझिया नेत्रींचा पूर
स्वांतर नंतर तव पितयानें उघडुनि दावियलें
नृपरोषा कां पात्र करूं त्या? जाणें मज रुचलें!
वंदन करुनी तुला मालिनी तुझिया पितयाला,
पाठ फिरविली दोष देत मी हत परवशतेला!’

(८)

प्रसंग साक्षात् तो पूर्वींचा पुढें उभा राहे
विचार, वाणी क्षणभर त्यांची मूकपणा लाहे.
तसेंच कांहीं काळ चालतां ते दोघे संगें
मालिनिचे वचनें तें त्यांचें मौनव्रत भंगे
म्हणे मालिनी, ‘दिलदारी ही दुर्लभ दुनयेंत,
दोष न दिधला लेशभरी जरि झिडकारी तात.
निरोप घेतां दुःख जाहलें, तें स्मरतें मातें
मूर्ति मनोहर ध्यानीं आणुनि ती दिन घालविते
स्मरणी घेउनि तपभरि तप मीं आचरिलें भावें
प्रभुप्रसादें फल त्याचें मज आज पूर्ण पावे.’

(९)

मालिनिचे हे कुणा न रिझविति बोल जिव्हाळ्याचे
नाचुं लागलें जणुं त्या काळीं हृदय मावळ्याचें
म्हणे तिला तो, 'स्मरणी माझी अक्षय तूं घेसी;
परि रुचलें तें सांगें केवीं तुझिया पितयासी.
कुंवार अजवरि राहिलीस तूं कैंवीं तें सांगें
कुमार कां कुणि भेटला न जो प्रेमीं तव रंगे
रूपवती तूं, शीलवती तूं, बुद्धिमती असशी.
रसिक, धनिक तूं असशि एकली तनया तातासी,
तरि तातें का नाहिं पाहिला वर अनुरूप तुला?
कुशल पिता कां तुझा? स्मृती मम हो कां कधि त्याला?'

(१०)

बोल बोचले मालिनिच्या हे कोमल चित्ताला
रडूं लागली, वदे, 'पिता कीं अस्तंगत झाला'
मृत स्मृतीला वाहि मावळा अश्रूंची माला;
म्हणे, 'मालिनी असे प्रभूची ही अघटित लीला!'
'एकलीच तूं अतां मालिनी? कोण साह्यकारी?
तूं असशी गे जणूं जानकी, तरुवरची वेली.'
सहज जानकी म्हटलें, तिज तें किती किती रुचलें,
अश्रु निमाले हृदय चमकलें, प्रसन्न मुख झालें.
म्हणे, 'जानकी तरुवरची मी वेली, रघुनाथ
समीप असतां अनाश्रिता मी असेन का येथ?'

(११)

म्हणे मावळा, 'असें जरी मी नामें रघुनाथ
तुला जानकी म्हटलें तरि तव होउं कसा नाथ?
चरित्र माझें ऐकतांच ह्या द्वादश वर्षांचें
नको, नको संसर्ग अशाचा वदशिल तूं वाचें!
हालअपेष्टा कारागारीं सलगीच्या झाल्या
नाजुक साऱ्या पहिल्या संवयी तेथें मावळल्या.
निरोप घेउनि तुझा निघालों तो रानीं गेलों
अंगा फासुनि राख खरा मी गोसावी बनलों,
पुनर्जन्म जणुं झाला माझा, जग हें नव भासे
फिरूं लागलों चहूं दिशा मी गोसावी-वेषें!

(१२)

'समाज वाहे गोसाव्याची स्वेच्छेनें चिंता,
उदरंभरणीं चाले त्याची जनतेवरि सत्ता
निवासार्थ त्याचिया चहुंदिशीं भव्य धर्मशाळा
शीतनिवारणिं यथेच्छ लाहे इंधन, धूनीला,
सरित्तटीं वा वृक्षाखालीं उतरो गोसावी
सर्व सिद्धता हो त्याची जणु कामधेनुकरवीं
न्यून तयाचें पडतां वाटे पाप धार्मिकाला
स्वतां सोसुनी हाल तयाच्या पुरवी इच्छेला;
स्वीकारीं मी कितीक वर्षें ही त्यांची वृत्ती
तुला जानकी, रुचे कालिमा कां हा रघुनार्थी!'

(१३)

'जटा वल्कलें धारण करुनी रघुनाथहि फिरला
असाच रानोवनीं, न कां तत्सत्कारहि झाला?
सान, थोर, नर नारी त्यास्तव आत्यंतिक झटले
ते प्रेमें वा तेव्हां त्यांनीं दानधर्म केलें,
मान्यांचा सन्मान करावा, ध्यासचि हा सकलां,
नियम जगाचा, युगत्रयाचा, अनुभवासि आला,
सत्कारें जें, स्वेच्छेनें जें, दिधलें तद्ग्रहणीं
मानहानि ना, तें दे प्रभुवर मान्यांचा मानी.'
असें वदुनि ती स्तब्ध बसे, ते शब्द मावळ्याला
आनंदप्रद झाले, परि तो या बोले बोला.

(१४)

'रावणारि रघुनाथ कुठें; मी पोटभरू कोठें?
उपमा त्याची मजसी देसी, आश्चर्यचि मोठें,
फिरलों मी आसेतुहिमाचल, काय परी केलें?
कष्ट न करतां स्वोदरपूरण यथेष्ट साधियलें
दानशूर जे श्रद्धा त्यांची विफला म्यां केली,
जाणुनि बुजुनी पापरास मी उदंड सांठविली
प्रेमळ, निर्मळ—मानस तुजसम बाला लोभवितां,
अनंत माझे जन्म न पुरती अनृणी मी होतां,
पुरे मालिनी, पुरे नाद हा, अंधारीं भ्रमसी
अमूल्य अपुलें आयु असें कां उगाच घालविसी?'

( १५ )

'बुद्धिमती जी, शीलवती जी, रसिका जी ठरली
निष्कारण ती, अवचित केवीं अंधारीं भ्रमली?
भार भूमिला कधिंहि न होणें माझा रघुनाथ,
चालुनि आल्या भाग्यावरि का देऊं मी लाथ?
दासबोध ज्या कळला, वळला, अंतरंगिं भिनला
असो संकटीं सुखासनीं वा करि कर्तव्याला?
आर्यावर्ती सूक्ष्म निरीक्षण करण्या जे भ्रमती
पोटभरू त्या म्हणती त्यांच्या जिव्हाही झडती
प्रेमाचा किति अंत पहावा? विनोद हा कुठला?
उदारचरितां, पदरीं घ्यावें दुर्बल दासीला.'

( १६ )

असें वदुनि रघुनाथ–पदा ती न्हाणी अश्रूंनीं;
स्वकरें तिजला तो उठवोनी बोले गंहिवरुनी,
'एकनिष्ठ तुजसमा गुणवती स्वतां माळ घाली
कोण नको म्हणणार सांग नर अरसिक भूमितलीं?
परी कर्दमीं रत्न पडावें हें रसिका न रुचे
म्हणुनि तुझा स्वीकार कराया मन माझें काचे;
जें जें माझें असेल तें तें पवित्र तुजसि दिसे
परी मालिनी! मज वरितां तूं, तव होईल हसें.
म्हणुनि उर्वरित ऐक कथा मम, मग निश्चय करिं तूं
वरिलें नंतर तरी न राहिल मम मानसिं किंतू.

(१७)

'सूक्ष्म निरीक्षण करण्या फिरलों मी आर्यावर्त
मद्र, वंग, पंजाब सिंध मी पाहें गुजरात,
दिल्ली, आग्रा, प्रयाग, मथुरा, बघे गया काशी
परी हायसें गमे न माझ्या कोठें चित्तासी;
चढें हिमालय, विंध्य, पाहिली तेथिल मीं शोभा
परी खुलेना कुठें मालिनी हृदयींचा गाभा.
रामेश्वरिंचा सेतू, पश्चिमपूर्वसिंधुतीर
पाहियला मीं परी न तेथें लव धरवे धीर.
महाराष्ट्र मम पंचप्राणचि, तोच गमे प्यार,
तो जीवाचा, तो ध्येयाचा एकचि आधार

(१८)

'तुकया वाणी, बालज्ञानी ज्ञानोबा, नाथ
उदारधी, संतांनीं ऐशा यत्प्राणज्योत
प्रदीप्त केली, समर्थ–शिवबा कर्मवीर ऐसे
लाभुनि यत्कीर्तीसी अपुरें त्रिखंडही भासे;
महाराष्ट्र तो, मराठि भाषा, लोक मराठे ते
अखिल भारतीं अपूर्व अजवरि एक जगज्जेते
डोंगराळ हा नापिक असला जरि राकट साचा
धकाधकी मामला कराया जन्म असे त्याचा;
अशा स्वदेशीं परतुनि येतां अवीट आनंद
वाटे मजला, हृदय उफळुनी नाचे स्वच्छंद

( १९ )

'दुर्ग विखुरले चहूं दिशीं जे स्मरण शिवाजीचें
अक्षय देती, जागृत करिती शौर्य मराठ्यांचें,
पावन तीर्थें तीं, त्यांमाजी प्रतापगड राणा,
ज्याचें दर्शन होतां लाभे स्फूर्ति मराठ्यांना
गडाभोंवतीं वसति मावळे शिवबाचे वीर
कायावाचामनें अजुनि ते पवित्र खंबीर,
संगगडि होउनि मजला त्यांचा वर्षत्रय झालें,
इथें रहावें, त्यां सेवावें, निश्चित हें ठरलें.
कष्टद येथिल वास किती, हा वेषचि मम सांगे
कसें सौख्य तुज होय मालिनी, रानवटासंगें?'

( २० )

वदे मालिनी 'श्रीरघुनाथासवें जनकदुहिता
रानोमाळीं फिरे, दुःख ना झालें लव चित्ता;
अंतर्ज्ञानी प्रेम सूचवी, 'तव सहचर कष्टी,'
द्वादश वर्षें मावळली मम सौख्याची दृष्टी;
निश्चय माझा, व्रतस्थ वर्तन पाहुनि पितयाला
शोक जहाला, वदे 'तुझा मीं प्रियकर घालविला'
तशांत झाला अंत तयाचा मजसि अंतकाळीं,
सांगे, 'बाळे निश्चित वर तो आहे तव भाळीं;
भेटतांच त्या सांगें माझा प्रिय आशीर्वाद
आणि सांग कीं सुखें सुतेसह मग बाळा नांद.'

(२१)

ऐकुनि वच हें सजे मावळा आलिंगन द्याया
तोंच सख्या तिज शोधित आल्या अवचित त्या ठायां.
एक म्हणे, 'तुज ताई भेटे सांग कोण येथें,
कीं ज्यासंगें विसरुनि जाशी आम्हां सखयातें?'
'स्नेहि पुरातन अकस्मात मज, सखि येथें भेटे,'
'कोण? मावळा, स्नेही तव हें आश्चर्यचि वाटे!'
'पार्वतीस तों शंकर भेटे' सहज म्हणुनि गेली,
हास्यरसाची सखीगणीं कीं जणु उकळी फुटली,
प्रथम विरमली, परि तत्काळीं धैर्यें ती नटली
कथी सखिजनां गोष्ट पुरातन ती सगळी अपुली.
म्हणे एक सखि, 'पर्वतकन्येसम तूं तप केलें
ब्रह्मारण्यीं निधान आजी करीं तुझ्या आलें,'
म्हणे, 'मावळा निधान साचें प्राप्त हिला झालें
कीं त्यासंगें नागरीकपण तव सखिचें गेलें,'
तों ती मार्मिक वच बोले, 'श्रीशंकर पार्वतिनें
वरितां झाला कुमार भारत रक्षियलें त्यानें.'

( शार्दूलविक्रीडित )

त्यांचा होय विवाह मंगल नसे न्यून प्रमोदा तदा
प्रेमा प्रेम मिळे तरी नच उरे मोदा कधीं वायदा
तेव्हां जें वदली विनोद म्हणुनी त्यांची सखी, हो खरें,
आशीर्वाद तसा तुम्ही रसिक द्या कीं दैन्य हें संपलें.

गीताजयंती, १५ डिसेंबर १९२६ ]

# संन्यासिनी !

(दिंडी)

'गुणीं दुर्गुण, दुर्गुणीं गुण दिसावे
दैवविलसित हें !' हें कसें रुचावें
नृवर नांदावा नित्य शिरोभागीं
तोच कारागृह भोगितो अभागी १

दृश्य देवा ! मज काय दाखवीलें ?
देशभक्तीला हेंच फळ मिळालें !
भक्त कैवारी म्हणविसी स्वतःला
आणि भक्ता दाविशी बंदिशाला ! २

कसा कृष्णा ! इतिहास विस्मरें मी !
जन्म तरि का तव होय स्वीय धामीं !
पिता माता कोंडिले बंदिवासीं
आणि यदुराया ! तेथ जन्म घेसी ! ३

त्रस्त चित्ता मी शांत करायातें
दूर गेलें; मी एकलीच होतें.
शृंखलांचा तों ध्वनी येइ कार्नीं;
थवा कैद्यांचा कीं दिसे दुरूनी ४

चित्त भ्यालें; लटलटां वक्ष झाले !
चक्षुपुढतीं भय केवढें उदेलें !
भीति माझी ही सार्थ जरी झाली
नको देवा ! हें पाहणें कपाळीं ! ५

अशी ईशा विनवीत मंद चालें!
तोंच सारें तें दृश्य निकटिं आलें!
काळपुरुषाचा पाहरा सभोंती
मधें कैद्यांच्या असति दोन पंक्ती. ६

दोषदोघां बेडींत गोंविलेले
पदीं प्रत्येका शृंखला खळाळे!
स्कंधिं कांबळि करिं थाळि, शिरीं टोपी
अंगिं कुडतें, चोळणा आडमापी ७

भीत भीतांचि मी पाहि धरुनि शंका
तोंच आम्हीं पाहिलें एकमेकां!
जणूं माझे जवळून वीज जावी
स्थिती माझी तत्क्षणीं होय तेंवी ८

नेत्र मिटले, उघडोनि मी पहातें
दृश्य भीषण दृष्टिला दिसेना तें;
जेथ दर्शन मज होय, त्या स्थलींची
धूलि सीमा पावली पूततेची ९

भाळिं लावुनि, बहुमोल संग्रहीं ती—
घेउनी मी परतलें खिन्न चित्तीं
विचारांचें काहूर माजलें तें
कसें शमवूं? प्रभुवरा! शरण तूतें १०

बद्ध होणें मशिं लग्न-कंकणानें!
परी झालें विपरीत हें कशानें?
वरी भगिनी मानसीं अर्जुनाला!
तुवां कृष्णा! संन्यास दिला त्याला! ११

परी अंतीं संन्यास फोल केला;
सुभद्रेचा सिद्धीस हेतु गेला;
भक्त भगिनीहुनि प्यार तुला देवा!
द्रौपदीला बा! तूंच रे विसांवा १२

सकल सद्गुण एकत्र तेथ झाले;
परी माझें मातींत रत्न गेलें!
घात माझा तो काय एकटीचा?
परी झाला केवढा मातृभूचा! १३

राघवाचा वनवास, पांडवांचा
अक्षयींचा हितकरि हो जगाचा!
दिसति दुःखी जे वर्तमानकालीं
तेच परिणामीं ठरति भाग्यशाली! १४

× × ×

विचारें या ती क्षणिक शांत झाली!
फुटे दुःखाची तोंच नव नव्हाळी!
कैंवि पितयाचें, तेविं माउलीचें—
करूं वांछित कर्तव्य पुत्रिकेचें १५

कसें दाबुनि मी गुह्य अंतरींचें
शांतवूं त्या? मजवरी प्रेम त्यांचें!
वाहिलें मीं सर्वस्व नाथ-पायीं!
नसे माझें मजजवळि अतां कांहीं. १६

असे इंगळ लागले विचारांचे—
मना 'अमले'च्या शब्द तों पित्याचे
श्रवणिं येती, 'बाहेर बाळ! येई
तुला बोलावी पहा तुझी आई!' १७

बसे मातेच्या जवळिं जाउनी ती.
वदे माता तिस थोपटीत हातीं,
'मौन कां हें? उल्हास कुठें गेला?
काय लागे तव काळजी मनाला?' १८

जनक बोले, 'ती गोष्ट प्रभातींची
रुचुनि चिंता लागली वियोगाची?
बोल अमले! मम कल्पना खरी का?
कशी बोलसि तूं? मज न परी शंका!' १९

माय बोले, 'मज सत्य तेंच वाटे;
तुला का गे भेटले तेच वाटे?'
शल्यसम हा तिज बोचला विनोद!
करीं तिचिया तो हृदयिंचाच भेद! २०

घाम आला, रोमांच अंगिं आले;
पूर नेत्रांतुनि तों तिच्या खळाळे!
त्वरित तिजलागीं माय जवळिं घेई.
वदे, 'झालें तुज काय सांग बाई! २१

तुला रुचला तो नाहिं का विनोद?
क्षमा मजला करिं; होय तो प्रमाद!'
तरि न बोले ती; पिता जवळिं येई
वदे, 'अमले, गे, बोल काय होई! २२

आजवेरी लपविलें तूं न कांहीं,
आज कुठुनी संकोच तुला येई?
मान्य नवरा तो तुजसि नसे कां गे?
प्रेम तव का अन्यत्र असें सांगे!' २३

अधोवदना बैसली, ती न बोले;
नेत्र पदरें पुसतांहि अश्रु चाले!
शब्द नुमटे, दाटोनि कंठ आला
पडे संकट पितयास माउलीला! २४

माय एकाकी भेटतां हृदीचें
गुह्य उकले, हें गुपित बालकांचें!
जाणुनी तें तेथूनि पिता गेला;
माउलीचे कीं पडे गळां बाला. २५

× × ×

'विवाहाचें तुज सांकडें पडे कां?
मनीं नाणी तूं अल्पही कुशंका!
माय तव मी; एथें न दुजें कोणी;
आसवें मी तव होय दीनवाणी' २६

माउलीचें वच ऐकुनी वदे ती;—
'माधवीं गे मम गाढ असे प्रीति!
नाथ माझा तो एकलाच लोकीं!
बंधु-तातासम इतर नर विलोकीं' २७

नेत्र अमलेचे पुशित माय बोले,
'प्रेम तुमचें पूर्वींच कळुनि आलें!
अतां माधव तुज भेटणार कैंवी?
स्मरण त्याचें चटकाच जिवा लावी; २८

बालपणिंचा तो सवगडी तुझा गे!
एकमेकांचें वेड तुम्हां लागे!
होय विद्यार्जन सर्व कांहिं काळ
पुढें गेला तो दूर जरा बाळ २९

परी अवसर मिळतांच अल्प त्यानें
तुझे भेटिस यावेंच निश्चयानें!
परी त्याला तो नाद लागतां कीं
अम्हां वाटे तो स्नेह तुझा टाकी.' ३०

'भेट झाली दुष्प्राप्य जरी मातें
कुशल नियमित मज कळत तरी होतें!
विसर माझा पडला न लवहि आई!
थोर कर्तव्यें प्राप्त विरह होई ३१

दीर्घकालिन ये विरह जरी भाळीं–
तेथ वृत्ती अनुरक्त पूर्ण झाली!
प्रेम अक्षय हें, प्रेम अनादी हें
भेद त्यातें संकटें ज्ञात नोहे ३२

वाहिलें मीं सर्वस्व त्याच पायीं;
वृत्ति माझी रंगली त्याच ठायीं;
स्मरणमात्रें हो मन्मन प्रसन्न;
देशसेवा कर्तव्य एक जाण ३३

त्राण आर्तांसी अहोरात्र द्यावें;
आळशांना निरलसचि म्यां करावें;
स्वत्व शिकवावें स्वत्वविहीनासी.
हेंच रुचतें कर्तव्य मन्मनासी ३४

व्रताचरणीं या काळ जरी गेला
तरिच वाटे मम जन्म सार्थ झाला !
प्रतिध्वनिनें ध्वनिरूप दिसुनि यावें !
व्रतें माझ्या तद्ध्येय स्पष्ट व्हावें.' ३५

वचन अमलेचें माय शांत चित्तें
श्रवण करुनी मग बोलली तियेतें !
बोल बाळे ! तव खोल हे रसाळ !
गमे ऐकावे तेच सर्वकाळ ३६

परी जग हें विपरीत असे बाळे !
त्यांत अबलेचें फार गे निराळें !
निसर्गें स्त्री दुर्बला निर्मियेली !
समाजेंही ती दूष्य लेखिलेली ३७

मुली ! अविवाहित राहणें न सोपें;
विमल जरि ती, चिकटती तिला पापें !
जय न लाहे निर्मळ जरी प्रेम !
युक्त व्यवहारें तेंच सिद्धकाम ३८

क्रुद्ध किंचित होऊनि वदे बाला
'न ये मम का विश्वास माउलीला ?
नांव घेसी तूं उगिच गे जगाचें !
असे आई ! भय तुझ्या अंतरींचें ३९

शुद्धशीला मम माय, तात तेवीं,
भाउराया सत्कीर्ति ती मिळावी!
दिसे पूज्या जगतास सर्व ताई!
मीच कुलटा ठरणार काय आई!' ४०

क्रोधदीप्ता, आरक्त नेत्र बाळी
स्तब्ध बैसे, व्याघ्रीच जणुं भुकेली
रूप भेसुर पाहोनि माय बोले
'नाम अमला तव, अमल अससि बाले; ४१

शुद्ध शीलाची तव न मला शंका!
व्यर्थ अपुल्या चित्तास शिणविसी कां?
चित्र जगताचें दाविलें तुला मीं तें
यथार्थत्वें कीं कळो बाळ! तूंतें ४२

सुखें करिती संसार भाउ ताई!
मीच अमला देशास आज देई!
करीं अपुलें कर्तव्य मुदित चित्तें
पूर्ण देवो यश ईश त्यांत तूंतें.' ४३

अमृतवाणी ही मायमुखींची ती
श्रवण करुनी हो मुदित मुदित चित्तीं
मोद दिसला तात्काळ मुखप्रांतीं
हास्य अधरा, असु चक्षु भूषवीती ४४

× × ×

कथा पतिला मग माय सकल सांगे;
मान्यता तो दे तेंवि सानुरागें!
करी अमला आरंभ कीं कृतीला!
पळ न वेंची ती आळसांत बाला ४५

जनां सेवावें; दूष्य परि ठरावें;
धैर्य धरुनी कर्तव्य आचरावें!
व्रताचरणीं ती दक्ष सर्वकालीं
पूज्य सकलां तात्काळ ती जहाली ४६

जगा सेवी परि तनुसि धिक्करी ती
क्षीण अमला अत्यंत होय अंतीं!
बंदिशालेचें स्मरण त्यांत व्हावें!
सुदृढ कायेनें तरि कसें रहावें! ४७

× × ×

सेवि इतरां, तिस अन्य सेविताती!
शांत अमला परि असे स्वीय चित्तीं!
तिला शांती कर्तव्य केलियाची!
परी तळमळ अंतरीं प्रियकराची ४८

म्हणे 'माझें दे आयु त्यास, ईश!—
निश्चयें कीं होईल दैन्यनाश!'
अशा चिंतनिं असतांच सुहृन्मेळीं
वेळ मरणाची तिची जवळ आली ४९

मायताता ती वदे शांतचित्तें
'मुक्त होउनि भेटतां कथा त्यांतें
जगीं अमला प्रतिकृती तुझी भासे'
वदुनि ऐसें ती मधुर मधुर हांसे ५०

× × ×

दुर्दैवें अमला क्षणांत सकलां दुःखांत लोटोनि ती
झाली शांत; कृतांत घेउनि तिला गेला ठरे तत्स्मृति !
लागे ध्यास पित्यास अंतिम तिचा संदेश पोंचे कसा?
पोंचे तो न कधींच, हो सततचा तो रोग तन्मानसा. ५१

२३ डिसेंबर १९२६ ]

# धर्मश्रद्धा

(शार्दूलविक्रीडित)

'इच्छा सूचित तूं करोनि अपुली, कां संकटीं पाडिलें?
अर्धांगी तुझियासमान मिळणें, हें भाग्य आहे खरें
बाळे! खिश्चन तूं परी, असत मी हिंदू; करावें कसें?
धर्माचें मज वेड; तो जरि सुटे, जीवास थारा नसे १

हिंदुस्थान जगांत गाजत, जरी दुर्भाग्य त्या लाधलें
तो कां? धर्मविहीन तो जरि बने अस्तित्व कीं संपलें
धर्माचें बळ त्यास एक उरलें, साह्यें तयाच्या पहा
अग्रस्थान पुन्हा जगीं मिळवितो, सिद्धांत गे सत्य हा २

हिंदूंना करुनी पराजित पुरे तत्संस्कृती नष्टते
न्याया सिद्ध सदैव जे असति त्या खिस्त्यांत जी मोडते
मी तीतें वरुनी तिलांजलि कशी देऊं स्वधर्मावरी?
नोहे मानव तो खिस्तव धरी धर्मावरी जो सुरी ३

अर्धांगीविण ना गृहस्थ बनतो, नाहीं गृहस्थाश्रम
केवीं पालित हो समाज तरि तो? गाजे पुरा संभ्रम
अन्योन्यीं रत दंपती सतत ज्या प्रेमें असे वंद्य तें
वाटे त्याज्यचि तें परी, जरि गदा धर्मावरी आणितें ४

व्यक्ति-प्रेम सुखास साधन असे या लोकिंच्या केवळ
धर्माचा जरि त्यास आश्रय मिळे लोकद्वयीं तत्फळ
तत्साह्यें इथलें मुदें करिति तें कर्तव्य नारी नर
साधाया हित पारलौकिक तसें ते राहती तत्पर ५

माझी मैत्रिण तूं पुरातन, असे अन्योन्य विश्वासही
चारित्र्यें परमोच्च तू; गुणखनी आहे तुझ्या संग्रहीं
तूंतें मी वरण्यास सिद्ध न परी, धर्में पुरा नाडलों
इच्छाभंग तुझा असे प्रथम हा, मी संकटें ग्रासलों.' ६

× × ×

त्याचें हें वच ऐकुनी न लवही ती विस्मयें पीडली
कीं तें संकट ठाउकें तिज असे, तें वारण्या लागली
'निष्ठा व्यक्तिगता वसे मम हृदीं, ना धर्मनिष्ठा तशी
भीती त्यास्तव वाटते न अपुल्या संमेलनीं फारशी ७

सिंधू संगम पावतां उदधिशीं व्यक्तित्व नासे तिचें
माझें होइल तेंच, सावलि वरी साम्यासि कीं वस्तुचे
नामें खिश्चन मी; कृती मम परी हिंदूस साजे अशी
ठावें हें असुनी उगाच म्हणणें कां हें विधर्मी मशी!' ८

'नामें खिश्चन तूं, प्रवेश सहजीं धर्मांतरें मत्कुळीं
तूझा होइल; आस सिद्धिस तुझ्या माझ्याहि चित्तांतली
जाऊनी, अपुल्या नितांतमधुर स्नेहास ये शाश्वती'
त्याचे शब्द करूनिया श्रवण ती जाई स्वताताप्रती ९

बालेनें विनयें तयास कथिला वृत्तांत सारा खरा
तो बोले, 'मज लाधलीस तनये तूं संकटीं आसरा
मीं धर्मा त्यजिलें, कुळा बुडविलें स्वार्थाहि ना साधिलें
लाहे आस नवीन एक न कुणी, गेले पुराणे भले १०

द्रव्या साधन धर्म होय नव हा, आशेस या लोभलों
बाळे! आस निराश होउनि पुरी ती पूर्ण पस्तावलों
मुक्तीचा मज एक मार्ग सुचला 'धर्मा जुन्या सेवणें'
धैर्याचा परि लेशही न उरला, शांती कशी पावणें ११

बाळे! संकटिं या पडोनि पुरता मी पाहिं वेडावलों
कांतेसी, जरि ती अतृप्त असली, ना शब्दही बोललों
चित्ता शांति मिळे न एक पळही चिंता सदा जाळिते
बाळे! तारक भेटलीस मज तूं जाऊं अतां मुक्तते; १२

मातेतें कथिलें स्ववृत्त मनिंचें तों ती न दे आश्रय
साध्वी ती अबला, तिला छळित मी, मीं दुष्ट, मी दुर्नय
धर्मीं नूतन या प्रवेश करणें वाटे अनीती तिला
श्रद्धा ठेवुनि ती परी मजवरी हो सिद्ध या क्रांतिला १३

वाटे शांत तिला न एक पळही, मातें तसें बोलली
म्यां तीतें झिडकारिलें परि तदा ती फार पस्तावली
तेव्हांपासुनि शब्दही न वदते, चित्तीं जळे ती सदा
आतां होइल तुष्ट ती खचित कीं तूं वारिशी आपदा १४

बाळे! ईश्वर भेटलीस मज तूं कीं पाप माझें पुरें
नाशोनी, असतां पुरा पतित मी उच्चत्व देशी खरें
जामाता मिळतो महा कुलिन तो पूर्वस्थिती पावलों
पुण्याई मम थोर थोर तव कीं बाळे! पिता जाहलों.' १५

ऐसें बोलुनि तो पुरा गहिंवरें, पायीं तियेच्या पडे
होता तो जरि वृद्ध बाळ बनला कीं मुक्त कंठें रडे
भांबावे तनया, तिला नच कळे कैसें करावें तदा
ताता सांवरुनी, कृतज्ञ मतिनें पूजीयलें तत्पदा. १६

× × ×

(पृथ्वी)

क्षणीं कळवि वृत्त तें प्रिय समग्र नाथास ती
तिचे समचि त्याचिया न उरली प्रमोदा मिती
कुटुंब नटलें पुन्हा सकल तें स्वधर्मं मुदें
विवाह मग जाहला; विजय धर्म प्रेमास दे. १७

२५ डिसेंबर १९२६]

## विधिघटना

( पृथ्वी )

न दोष तव लेशही, पडत आज आकाशिंची
कुऱ्हाड सखये शिरीं क्षिति नको करूं तूं तिची!
अतर्क्य घटना अशी घडविणें विधि-क्रीडन!
प्रभूसि शरणागती करुं; न आसरा त्याविण १

मला व्यसनिं लाभला इत वरिष्ठ, शिक्षा मिळे;
तुवां मधुवचें मला समयिं हेंच त्या शिक्षिलें!
तुझ्या वचनिं लाडके! धरुनि पूर्ण विश्वास मी
उगाच हंसलों, जरी बुडुनि जाइं चिंता-तमीं २

प्रसंग तुझियावरी कटु लगेच हा पातला,
निराश परि होसि कां उगिच, जीव कंटाळला!
परास उपदेशिणें सुलभ; आचरावें स्वयें,
तरीच महती खरी; न तरि शब्दि वैफल्य ये.' ३

न कांत-वच हें रुचे तिजसि ती वदे, 'स्त्री जरी
पवित्रपण हारवे, मरण एक ती स्वीकरी!
जरायुत तनू जशी त्यजुनि घेइ आत्मा नवी,
तसें करिन मी; मला मलिन ही न काया हवी ४

तनू विमल, चित्तही विमल राखणें संतत
विशेष पुरुषाहुनी असत आमुचें हें व्रत
न तें मजसि चालवे, तरि न जीव हा ठेवणें
बनूनि पतिता मृती न वरितां कुलीना उणें ५

कुलीनपण भूषण प्रिय अमोल आम्हां गमे;
तयास्तव करूं मुर्दे हवन सर्व सृष्टिक्रमें!'
असें वदुनि ती अधोवदन होउनी बैसली,
अचेतन जणूं तिच्या प्रियकरास ती भासली ६

तिला जवळिं घेउनी, करुनि लाड नानापरी,
तयें त्वरित आणिलें प्रथम तीस भानावरी;
म्हणे तदनु 'ही तनू तुज नकोच दे टाकुनी'
स्वतांस अनुकूल तो बघुनि हृष्ट झाली मनीं ७

'तनू तव विटाळवी अधम तो दुढालिंगनीं;
तया उचित शासनें नमविलेंच मी तत्क्षणीं!
परी न विमनस्कता तव विराम पावे लव!
तुझ्या हृदयिं चालली सतत कालवाकालव ८

तनू तव विटाळली; मन असे परी निर्मल!
स्वतां अबल ती; तिला फिरवि मानसाचें बल!
तनू मलिन कर्दमें मन करी जलें उज्ज्वल!
करील सुकृतें तुझ्या मन तनूसि गंगाजल ९

तनू प्रबल शस्त्र हें प्रभुवरें तुला दीधलें;
पहा अनल–भक्ष्य हो मरण तूं जरी सेविलें
परी त्यजुनि कामना करित सत्कृती शस्त्र तें
विनाश जरि पावलें, मिळवि अक्षया कीर्ति तें १०

वरी जनन त्या असें मरण लागलें निश्चयें!
तयास्तव कशास तूं करिसि यत्न? तें ये स्वयें!
तशी न परि कीर्ति ये; निकष लाविते मानिनी!
परार्थ तनु जाळितां नमत त्यास ती धांवुनी!' ११

करोनि सुकृती तनू झिजविणें, न मृत्यू बरा
गमोनि तिस, ती करी त्वरित पूर्ण वेषांतरा !
असोनि नवयौवनीं दिसत ती जुनी योगिनी;
परोपकृतिवांचुनी न दुसरें उरे तन्मनीं १२

घरास विसरे सती मन निरिच्छ साचें बने
पतीस न रुचे तिचें त्वरित वृत्ति ही सेवणें.
तयें अजुनि सेविलें न सुख सेव्य संसारिंचें,
परी मुदित मानसीं बघुनि थोर कार्या तिचे १३

तिला अधम जो छळी करुनि ती पुरा दुष्कृति
तिचें व्रत हरावया टपुनि बैसला दुर्मति;
परी न करण्या शके सफल कामुकी वासना;
म्हणोनि तिचिया वधें सुखवि आपुल्या तो मना १४

( शार्दूलविक्रीडित )

कांता सद्‌गुणमंडिता बघुनि तो हर्षे पुरा अंतरीं
दुःखी हो अवहेलनोद्गत मनोभंगें तिच्या तो परी
पाहोनी सुकृती तिच्या फिरुनि त्या आनंद जो जाहला
होवोनी वध तो तिचा, सततचा दुःखानलें भाजला १५

( आर्या )

विधि—घटना अघटित ही पाहुनियां ईश्वरा शरण जावें;
कीं चित्ता तोषाया अन्य न साधन कुणासही ठावें. १६

२६ डिसेंबर १९२६ ]

## क्षेत्र-पालिका

(शार्दूलविक्रीडित)

'केलें त्वां शर-लक्ष्य निश्चित जया तो प्राणरक्षार्थ या
क्षेत्रीं सूकर येउनी नृवर! ने आधींच सस्या लया!
होतो अन्यविनाश आत्मकरवीं हें ज्ञान त्या कोठुनी?
तूं दीनावनि लब्धकीर्ति, धरिं रे अश्वा घरीं रोधुनी  १

आहे सूकर वध्य तो तव शरें; क्षेत्रांतुनी त्यासि मी
देतें हांकुनि; सत्य उक्ति मम ही; अश्वा निरोधीं! नमीं!
विश्वासोचित का नसे मम गिरा?' रागें असें बोलुनी
रश्मीतें धरुनी 'नृपा! फिरविं या' ऐसें वदे भामिनी.  २

शब्दातें न बघे, बघे तिजकडे जो धिक्कृतीनें मग्ना!
तो आतां मनिं खिन्न होउनि उभा राहे, तयातें बघा!
चित्तीं तो थिजला, विमूढ बनला, मूकत्व ये त्याजला!
वध्यातें त्यजुनी अधोवदन कीं वेगें त्यजी त्या स्थला.  ३

× × ×

'चित्तीं सस्य-सुरक्षिता धरुनि मी यत्ना करीं, तों अशी
ये भूपा विमनस्कता! मम सुखें तो पोळला मानसीं
कर्तव्यें करुनी, श्रमापहरणीं भूनाथ येई वनीं!
त्या झालें उपरोधिनी, अघ घडे हें घोर सस्यावनीं;'  ४

ऐसा थोर मनीं विचार करुनी ती बालिका तत्क्षणीं
धांवे तीव्र जवें, तिला न दिसवे, साहे न ती टोचणी!
रानोमाळ फिरे; निराश विचरे; धांवे तरी ती त्वरें!
यत्ना दैवबळें मिळे यश, तिचें कीं चित्त हो हांसरें ५

× × ×

उत्साहें नटला नृपाल, खुडिला उत्साह त्याचा पुरा;
लंबी तो म्हणुनी निरस्त तरुच्या देशा करोनी त्वरा!
वेगें घोर वनीं शिरोनि, तरुच्या मूळीं हया बांधुनी
बैसे तो; अवमान ना अधिक त्या दे ताप अकांहुनी ६

'नारी वा नर दृक्पथीं मम कुणी केव्हांहि जो पातला
वांके तच्छिर तत्क्षणीं, अजवरी हा गर्व म्या वाहिला;
त्या माझा हय रश्मि मार्गिं धरुनी स्त्री रोधि एकाकिनी!
तेजस्व्या जगिं कोणती अवनती ईशा! दुजी याहुनी? ७

धिक्कारीं बघुनी विनंति, नत ती झाली जरी सुंदरी,
नाहीं मी वळलों, तसा भडकला क्रोधाग्नि अभ्यंतरीं;
तों ती ये सरसावुनी पुढति कीं अश्वा धरी तों पुरा
गेला कीं मम गर्व तत्क्षणिं; गमे जावें निघोनी घरा; ८

मातें थोर म्हणोनि, भाकुनि दया जेव्हां तिनें होउनी—
माझा थोरपणा जगांत दिसण्या संधी दिली आणुनी
तेव्हां अंतरिं संचरे अधम ती उद्दाम वृत्ती; तिनें
तेजातें मम सर्व कीं हरविलें! वाटे नकोसें जिणें ९

शत्रूंतें अखिल स्ववीर्यकरवीं ज्यानें पुरें दंडिलें
तो मी, तें मम वीर्य, आज अबला पाहोनि कां लाजलें?
ती केवीं अबला? खरी प्रबल ती कीं मी तिला पाहुनी
होवोनी हतवीर्य धांवत निघें! ती कीं नको दर्शनीं. १०

जावें, शासन मीं तिला उचितसें वाटे करावें, परी
ती स्त्री; शस्त्र नसे तिचे करिं; न वा तें साच योध्द्यापरी!
मीं तीतें जरि जिंकिलें, तरि असे कां ती जगीं थोरवी!
स्त्रीनें पूर्ण मला परी हिणविलें! ही मानहानी नवी.' ११

× × ×

ऐसा खिन्न मनीं; विचारसरणी त्याची क्रियाध्वंसिनी,
तों येई तरुणी स्वपापदहनीं उद्युक्त ती होउनी
घालोनी प्रणिपात, 'घोर घडला भूपा! प्रमाद भ्रमें'
बोले ती; नृप तोपला; परि गिरा त्याची विनोदीं रमे. १२

'वाणी वा करणी तुझी मम मनःसंतापकारी पुरी
तेव्हां विद्ध करोनि योजिसि अतां ही तूं गिरा माधुरी!'
वाटे तो चवताळला; जणुं गमे दंडील आतां तिला
वृत्ती शांत परी तिची न ढळली धैर्यें वदे त्याजला १३

'धर्मानें करुनी स्वकर्म, मिळण्या शांती मना या वनीं
आलासी मृगयार्थ! मी परि तुला भेटें नृपा! पापिणी!
केलें पाप अघोर मीं; परि नसे भूपा! असद्वर्तनी!
वृत्तिच्छेद न हो, म्हणोनि करणी ती जाहली दुर्गुणी १४

वार्धक्यें मम सर्वथैव पितरें आहेत, बा! ग्रासिलीं;
दुर्दैवें सुत हारवोनि, तनया एकाकिनी राहिली;
ती मी क्षेत्रिं अहर्निशीं श्रमुनि तत्सेवा करोनी तशी
योगक्षेम करीतसू नृपवरा! रक्षूनि सत्कीर्तिसी १५

आहे शेत लहान; सूकर तिथें येऊनि नाशा करी
त्यामार्जी बघुनी तुझा हय शिरे, भ्यालें नृपाला! खरी
धान्याचा घडतां विनाश पितरें कैशी दशा भोगिती
येऊनी मनिं कल्पना नृपवरा! मी वागलें त्या रितीं. १६

× × ×

सत्यानें भरल्या विशुद्ध हृदयापासोनि वाहे गिरा
सत्याचें प्रतिबिंब मुग्ध वदनीं पाहोनि भूभृद्वरा
वाटे कौतुक; बोलला तिजप्रती, 'खोटाच मी कोपलों
येतां या दिशिं पाहुनी तुजसि मी तेव्हांच आनंदलों १७

वृद्धा, हीनबला पित्या जननिला आधार तूं एकली!
सौख्यातें अपुल्या पुरें विसरुनी झालीस त्या माउली
त्यातें सेविसि, गेह रक्षिसि, तसें तूं शेत सांभाळिसी;
कर्तव्याचरणार्थ जा मुदभरें, संतुष्ट मी मानसीं! १८

चित्ता रंजविण्या परार्थ-हनना राजा धजे पाहुनी
एकाकी असुनी तुवां शिकविला त्यातें धडा भामिनी!
तूं माझा गुरुराज! खिन्न न मनीं व्हावें तुवां अल्पही
कीं स्वार्थार्थ न दुःखिता करिन मी निष्पाप आतां मही.' १९

× × ×

ऐकोनी वच तें नृपाल-मुखिंचें अत्यंत आनंदुनी
गेली नम्रपणें निरोप तरुणी त्याचा क्षणीं घेउनी;
आला तो मृगयार्थ; त्या न मृगया अत्यल्पही लाधली!
लीलेनें नृप-चित्तवृत्ति परि ती घेउनिया चालली. २०

झाली पाहुनि दोष–निष्कृति, मनीं हर्षूनि ती बालिका,
क्षेत्रीं जाउनि, योजुनी निरलसा तद्रक्षणीं सेविका,
एकेका करिं एक धेनु धरुनी जाया गृहीं ती निघे;
अश्वारूढ कुणी पथीं नर तिशीं बोलावयातें बघे २१

मानोनी तिस हीनजा अधम तो चेष्टा कराया सजे;
त्याशीं ती परि शब्द एक न वदे; हें पाहुनी तो खिजे;
आला तीजवळीं म्हणे 'पय मला दे धेनु तूं दोहुनी'
'तातासी पय हें पुरें न किमपी' थांबे असें बोलुनी २२

एकाकी बघुनी अमंगल पुन्हां तो बोलूं लागे, तशी
कोपोनी अविलंब निर्भयपणें शिक्षा करी योग्यशी
अश्वाचे चरणद्वयीं अडकवी गो–शृंग ती युक्तिनें
लाधे कीं यश तीस; तो अधमही पस्तावला शासनें २३

× × ×

शृंगाच्या पदबंधनें हय पडे; तो नीचही त्यासवें!
मागोनी नृप येई मंदगति; हें पाहोनि धांवे जवें!
भेटे ती तरुणी पुन्हां विजयिनी; वृत्तांत तीतें पुसे;
नीचा शासन योग्य हो, म्हणुनिया सानंद राया हंसे २४

कोपें ती वदली 'न मी अविनया; हा दुष्ट; कां हास्य हें?'
राजा बोलत 'हास्य येत कुतुकें; दुर्वृत्त कोणा सहे?'
दुष्टा दंडुनि, वंदुनी तिजसि तो भूपाल गेला पुढें!
तीही जाउनि शांतचित्त सदनीं कर्तव्यकर्मीं बुडे २५

× × ×

(उपजाति)

भूपाल-चित्तीं तरुणी रिघे ती;
त्याची मनःस्वामिनि होय अंतीं!
येऊं न दे अन्य मनीं विचारा!
कर्तव्य-मूढत्व वरी बिचारा　　२६

स्वतांसि दोषार्ह नृपाल मानी;
कृषीवली कीं मन ने हरोनी!
जों जों मना हीनपणें हिणावी
तों तों तिची मूर्ति पुढें स्थिरावी　　२७

माता, पिता केवळ देव जीतें
यद्रक्षणीं जी न गणी कुणातें;
तेवी जिचे मानसिं राजभक्ति
मानूं कशी मी तिस हीनजाति?　　२८

असत्पथीं तो नर नेउं पाहे
जो यन्मनीं भाव कदापि नोहे,
भुले न जी, वा न ढळेहि शांति,
मानूं कशी मी तिस हीनजाति?　　२९

तो नीच हो तापद फार, पाहे
एकाकि ती, ना परि भीति लाहे!
सुचे प्रसंगीं जिस थोर युक्ति
मानूं कशी मी तिस हीनजाति?　　३०

एकाकिनी दुर्जन दंडुनी ती
वाहे न गर्वा वदनीं, न चित्तीं,
विनीत भावें वदली मशीं ती
मानूं कशी मी तिस हीनजाती ? ३१

कुलीन ती निश्चित वा विचारीं
गमोनि तो हर्षित होय भारी
विचारितां सांगति लोक नाना
'संपद्विहीना, परि ती कुलीना.' ३२

जीनें मना मोहुनि मूढ केलें
पराक्रमें, मंजुळ नम्र बोलें,
कळे कुमारी कुलजा, तशी ती
आशा बळावे महिपाल–चित्तीं ३३

औत्सुक्य राया क्षणही त्यजीना;
चित्त स्थिराया करि यत्न नाना
प्राप्ती तिची एकचि साध्य त्यातें
भेटे तिच्या जाउनि कीं पित्यातें. ३४

× × ×

तो जीर्ण वस्त्रांकित, जीर्ण देह
त्याचें असे जीर्णचि तेविं गेह !
परी मनो-वैभव पूर्विचें तें
पावे न त्याचें लव हीनतेतें ३५

त्या मात सांगे नृप अंतरींची
वृत्ती खुलेना परि थोर त्याची;
'नवी तुझी ही महती नृपाला
उच्चत्व तत्पूर्विल ह्या गृहाला ३६

लक्ष्मी रुळे बा! तव पादपद्मीं;
दारिद्र्य नांदे मम आज सद्मीं;
पळांत लक्ष्मी परि होय नष्ट
परी कुलीनत्व सदा वरिष्ठ ३७

धनें विहीना परि शुद्ध, शूर
मोही तुला कार्य करूनि थोर!
रूपें गुणें ती महिषी–पदाला
योग्या; न लाभे परि हीनजाला.' ३८

ही स्पष्ट, निर्भीड तदुक्ति भूप
ऐके, तसा जाय लया हुरूप!
पिता तिचा तो म्हणुनी प्रकोप
आला तसा शांतहि हो अपाप ३९

'परोपकाराविण आन कांहीं
स्वप्नींहि ठावें लव ज्यासि नाहीं;
त्या स्वीय जामातृपदीं मला कां
स्थापावया वाटत थोर शंका!' ४०

भूपोक्ति ही ऐकुनि तो वदे कीं
'तूं योग्य जामातृ न बा! विलोकीं'
विषण्णचित्तीं गृहिं भूप गेला!
स्मरे तिला; ना अवमाननेला. ४१

× × ×

भार्येसि हें सांगत वृत्त गवें
ती अंतरीं थोराचि दुःख पावे;
म्हणे 'सुसंपन्न दशा सुतेला
चालूनि ये; कां छळितां तियेला ! ४२

जन्में न तो थोर, परी गुणानें
पूर्वींच हें दर्शविलें नृपानें !
तरी न जामातृ-पदासि योग्य !
हें कन्यकेचेंच खरें अभाग्य !' ४३

हे शब्द तीचे हृदयींच गेले;
गेले तसें अंतर विद्ध केलें !
पाहोनियां खिन्नमुखी सुताही
तात्काळ तो जाइ नृपाल-गेहीं ४४

वदे, 'नृपा ! तो मम हो प्रमाद
सुखेंच्य आम्हांस नृप-प्रमोद !
स्वीकार राया ! करि मत्सुतेचा !
हो तुष्ट आत्मा तव तेविं तीचा.' ४५

( भुजंगप्रयात )

तयांचा यथासांग झाला विवाह
मनें एकमेकां दिलीं जेंविं देह !
गुणें साजिरा पुत्र झाला तयांतें
'हमीरा'भिधानें जगीं ख्याति ज्यातें ४६

८ जून १९१७ ]

# प्रबल अबला

( शार्दूलविक्रीडित )

‘भेटीची मम आस तीव्र तुजला लागोनि बोलाविलें,
हातीं पत्र पडे तशी त्वरित मी गेहीं तुझ्या पातलें
मातें वागविसी स्वतांसम गडे मी ही जरी पापिणी
प्रेमाला जन आंधळे म्हणति तें हो सिद्ध या वर्तनीं  १

पापी मानितसें स्वतांस न मुळीं मी त्या खुनाचे मुळें;
मानी खून न पाप मी क्षणभरी; मानोत वेडे खुळे!
स्वर्गारोहणिं हक्क सांगिन सखे ईशास त्याकारणें;
केलें पावन कृत्य एकच जगीं जन्मून तें मी म्हणे.  २

× × ×

‘केलें पाप न लेश मी’ म्हणसि तूं, भोळी तुझी भावना,
सत्कृत्यें कळती जनां, अपकृती ठाव्या स्वतांच्या मना;
माझा हा विनयातिरेक गमतो? हें सत्य ऐकें तरी
ऐकोनी झणिं तोडशील मम तूं संबंध ही खातरी.  ३

× × ×

‘ज्याचा खून करून निर्घृणपणें, विख्यात झालें जगीं
तो ‘त्यांचा’ अधिकारि थोर तरिही स्नेही जुना खाजगी!
अन्योन्यागृहिं जातसूं, करितसूं एकत्र पानाशन
त्याच्या आणिक आमच्यांत तिळही कोठें कधीं द्वैत न.  ४

'तत्कांता पुरती अशिक्षित, तिला सौंदर्य कांहीं नसे;
तीतें कांहिं कळे न चाईट बरें, वेडी सदाची हंसे;
होता सद्गुण एक—कुत्सित न ती केव्हा करी कल्पना;
कांतेच्यासम संतती तरि पती त्यांचा करी राग ना ५

मोठा त्या अधिकार, वेतन बडें, मोठा तसा लौकिक;
कांता—पुत्र—सुता न पोषक परी उत्साह—संहारक!
गेहीं नोकर ठेविले किति, तरी अस्वच्छता ना ढळे;
त्याला सौख्य न लेश मानसिं परी आनंद दावी बळें. ६

× × ×

'तो खिन्न स्वगृहीं, प्रसन्न अमुच्या होई घरीं येउनी!
त्याला आवड फार फार अमुची त्या स्वीय गेहाहुनी!
प्राप्ती फार नसूनि नित्य अमुच्या सौंदर्य राहे घरीं;
तें त्यातें स्वगृहीं कधीं न दिसणें कांहींहि केलें तरी.' ७

× × ×

'बाल्यापासुनि पाहतें सुबक तूं आंतून बाहेरुनी;
सर्वांना प्रिय तूं, घरोघर तुला सन्मित्र, सन्मैत्रिणी;
लाभोनी अनुरूप कांत तुजला सौंदर्य हो सुंदर!
वाटावें रसिका तसें अरसिका स्वर्गीय तूझें घर! ८

× × ×

'माझें जों कळलें न वृत्त सगळें तों तूं असें बोलसी,
तें सारें कळतांच तूं प्रियसखी होशील वेडीपिशी.
स्नेहाचीं परमोच्च त्या हळुं हळुं स्थित्यंतरें जाहलीं
तीं कानीं पडतांच वाघिण जणूं येशील अंगावरी. ९

× × ×

'दारिद्र्यांतुनि मान्यतेस चढला, उत्साह वाटे किती,
लोपे जो परिपूर्ण तो परतुनी येतां स्वगेहाप्रती;
दुर्मार्गें स्वमन प्रसन्न करितो, कानीं कधीं ये असें;
विश्वासाई न तेधवां गमत तें, आणी आम्हांला हंसें. १०

× × ×

'हातूनी' अपराध घोर घडला वा लादला ना कळे.
त्यांचीं निश्चित कल्पनेस दिसतीं कारागृहीं पाउलें.
मोक्षाचा पथ एकमेव उरला, त्यांनीं क्षमा मागणें
त्यांचे हातुनि तें कधीं न घडणें मृत्यू जरी त्या म्हणे. ११

× × ×

'एकाकीच गृहांत मी, समयिं त्या ये मित्र अस्मद्‌गृहीं
अश्रू आणुनि लोचनीं मज म्हणे 'हा मूढ, हा आग्रही;
वाटे संकट यास आज वहिनी! माझी क्षमा मागणें
हा जाईल उद्यां कुठें न कळतें कीं भाग्य याचें उणें १२

सांगें तूं वहिनी! तयास तव ती योजूनि वाङ्माधुरी
तो ऐके न तुझें, कुणासहि खरी वाटे न ही वैखरी.
नाहीं मागत तो क्षमा मम, नको, तूं एक दे देणगी;'
शिक्षा होय मला लगेच अबल स्त्रीत्वास जी हो जगीं १३

× × ×

'झालें भ्रष्ट, जणूं भ्रमिष्ट बनलें, कांहीं कळेना मला
गेला काळ अशांत तोंच पतिचा आवाज मीं ऐकिला
'निर्दोषी सुटलों'; तशी तडक मी खालीं सखे धांवलें;
झालें मीलन, त्यांत मी विसरलें दुर्भाग्य; आनंदलें. १४

× × ×

'नाहीं ओसरला अजूनि पुरता आनंद तो आमुचा
तों आला अभिनंदनार्थ अमुच्या शत्रूच जो मैत्रिचा
संतापें भडकेन मी मज अशी वाटोनि भीती महा
कांहीं कारण काढुनी त्यजुनि मी जाई तदा मद्गृहा. १५

× × ×

'मार्गीं तों दिसली सुता परतुनी शाळेंतुनी चालली.
देखें तें मुखिंचें तिच्या स्मित तसें मद्वृत्ति हेलावली.
हातीं तीस धरुनी जों परतलें मार्गप्रतीक्षा मम
औत्सुक्यें करितां पतीस बघुनी, तात्काळ गेला भ्रम १६

× × ×

'अत्याचार करी कुणी म्हणुनि का मी प्राणनाथा छळूं?
कन्या ही करुं पोरकी? मन असें व्हावें न माझें हळूं.
अत्याचार करी अनीतिकर तो, पापी न मी अल्पही
अन्तस्ताप सहून निर्मिन सदा आनंद मी मद्गृहीं. १७

× × ×

'गेहीं हा शिरला अतां मज कळे मित्राभिधानें अरी
न्याया दुष्पथिं या तनूस पुरती पूर्वी तयारी करी
घेसी कांत–विमोचनार्थ अधमा! हें मूल्य तूं कोठलें?
सामर्थ्यें दुबळी म्हणूनिच बळी तूं घेसि माझा बळें १८

ऐसा आजवरी न नीच मजला प्राणी कुणी भेटला
विश्वासें व्यवहार आजवरिचा माझ्या घरीं चालला
आतां पूर्विपरीच मी स्मितमुखी साधीच वाटें जरी
केव्हांही फसणार ना फसविण्या कोणीहि आलें तरी. १९

× × ×

'चित्ताची स्थिरता अशी मिळवुनी मी त्यांचिया उत्सवीं
झालें सामिल, गोड सुंदर करीं मी आज भोज्यें नवीं
आणी बोलवुनी तयास सदनीं केली दिवाळी खरी
ताजी ती अनुभूति संतत परी जाळी मला अंतरीं. २०

× × ×

माझें मानस त्यास मीं कळविलें ही पत्रिका धाडुनी,
' जाऊं दे, घडली कृती अधम ती मित्रा तुझे हातुनी;
केव्हांही व्यभिचार थोर पदवी पावे न नारी-जनीं;
होतो दुर्बळ आजचा जन उद्यां शूरांमधें अग्रणी.' २१

+ + +

'तो ये पूर्विपरीच, वर्तन असे माझेंहि पूर्वीपरी,
मानी -मूर्खच तो- 'मला वश पुरी ही जाहली सुंदरी.'
आला एक दिनीं अचानक गृहीं मी एकली पाहुनी
होतें रक्षणिं सिद्ध मी सततची; भीती अतां कोठुनी? २२

+ + +

'येवोनी मम सन्निधीं अधम तो निःशंक श्रृंगारिक
बोले बोल; सुरा तसा खुपसुनी झालें तया अंतक
खालीं तो पडला मरून, उठला आवाज तो ऐकुनी
आली मोलकरीण धांवत तदा माडीवरी खालुनी. २३

+ + +

'वार्ता सत्वर ती घरोघर कळे सर्वांस खोटी खरी
गेहाभोंवतिं सान थोर जमली दाटी तिथें थाटली;
कानीं वृत्त पडे तसे सदनिं ते वेड्यापरी धांवले
गर्दीतून न वाट लौकर मिळे कैसे तरी पोचले. २४

× × ×

‘मित्राचा मृत देह लाल रुधिरें, तो लाल रक्ती झरा;
कांता सन्निध लाल मित्र–रुधिरें तो लाल रक्तें सुरा;
भोंतीं पोलिस–पाहरा, जन तिथें होते दुजे पंच जे;
‘त्यां’ना दृश्य दिसे असें; स्मृति न ती माझी अजूनि बुजे २५

कांपे भीषण दृश्य देखुनि तदा पोलीस धैर्याचल.
‘त्यां’चें वर्णन कैंवि मी करुं गडे, तें कल्पना सांगिल!
जो विश्वास निधी जुना प्रियसखा त्या ठार कांता करी
कांता जी प्रतिमाच खास अपुली जी त्या मृता आदरी! २६

× × ×

‘अत्याचारकरास मीं चिरियलें, आनंद झाला जनां
त्यानें भ्रष्टविल्या सुशील ललना त्या येति मद्रक्षणा
सारा दोष जळून खाक ठरलें न्यायासनीं निर्मल
फांशीं जाइन वाटलें परि ठरें आदर्श नारींतिल.’ २७

+ + +

‘पापी तूं म्हणसी स्वतांस न परी तूं पाप केलें लव;
अत्याचार करी कुणी तुजवरी पापी न तूं त्यास्तव
प्रायश्चित्त दिलेंस तूंच, दुसरी नाहीं तुझ्यासारखी
वाटे संकटिं मार्गदर्शक खरी तूं तूंच आम्हां सखी २८

आम्ही शिक्षकिणी सखे, कितिजणी ही सोशितों जाचणी
कोणा ती करणी तुझी अवगुणी; आम्हांस चिंतामणी;
सांगे मार्ग कुणी गिळीं हिरकणी; ती भीरुची काहणी.
पाहीं आचरणीं विचारसरणी आणीन ही मैत्रिणी.’ २९

१५ फेब्रुवारी १९३९ ]

# पोरकें पोर

( अनुष्टुभ )

प्रत्यहीं वाढतो माझा । आजार, मरणाकडे
ओढुनी तो मला नेतो । बाळ होणार बापुडें  १

तयाची मजला चिंता । जाळते एकसारखी
चिंता–आजार–संयोगें । शांतता पूर्ण पारखी  २

खिळलों आंथरूणा मी । व्यवहारा मुकें पुरा
जाणें बाहेर नाहीं, वा । नाहीं येत कुणी घरा.  ३

थकला बसला देह । चित्ताची परि चेतना
द्विगुणीं त्रिगुणीं नाचे । क्षण एक बसेचि ना  ४

अकल्पित कथा कल्पी । निराशा वरितें कधीं
लोळें हास्यांत तें केव्हां । डुंबें वा आसवांमधीं  ५

स्मृतीची पेटिका किंवा । उघडूनि जुन्या कथा
पुन्हां दावूनि बनवी । तेव्हांचा मज सर्वथा.  ६

× × ×

कहाणी एक पूर्वींची । ऐकुनी त्याग तूं मम
धजशील करायातें । मी वाटेन नराधम  ७

लाडक्या मृत मातेचा । द्वेष वाटोनि त्यापरी
येईल तुज जीवाचा । कंटाळाच खरोखरी  ८

शतधा शपथा बाळा । वाहिल्यास परोपरी
आटेल ऐकुनी तें त्वत् । प्रेमाची खास निर्झरी ९

मी आणि लाडकी माझी । अपराधी नसूं खरे
तुरुंग फटके फांशी । देशभक्ता परी ठरे १०

आईबाप जगन्यायें । जगिंचे अधमाधम
वाटतील तुला तेवी । परि दारीं उभा यम ११

म्हणुनी सत्य सांगूनी । मानसा शांत मी करीं;
सत्य स्वरूप दावावें । तुज ही आस अंतरीं. १२

× × ×

उदरंभरणा एक्या । ठायीं मी एकला वसें
करोनी दिन रात्रीचा । अन्नाची निश्चिती नसे १३

कधीं येथें कधीं तेथें । कष्टतां नोकरी मिळे
पुरुषार्थ गमे केला । मित्रांनीं अभिनंदिलें १४

घेई लहानशी खोली । पाकसिद्धी स्वतां करी
शयनीं पडतां रात्रीं । स्वर्ग वाटे जणूं करीं. १५

× × ×

शेजारीं जोडपें राही । व्यसनी नवरा पुरा
छळी तो नित्य भार्येतें । तिजला कोण आसरा! १६

वेश्यांना आणि तो गेहीं । मद्यपी मित्र त्यापरी
नीचांची त्या यथार्थत्वें । साध्वी ती करि चाकरी १७

भजी, भाजी, चहा कॉफी । चिवडा, शेव, भेळ वा,
कामधेनूच ती साची । देई जिन्नस जो हवा. १८

× × ×

कंटाळा त्यास पत्नीचा । मार्गींची धोंड ती गमे
घराबाहेर आरंभीं, । न घरीं व्यसनीं रमे १९

व्यभिचारीं सुरापानीं । रमे पाहोनि नोवरा
दापी ती गोड शब्दानें । तो त्या वाटे जणूं सुरा २०

व्यसनासक्ति वाढे । वाढे द्वेष तिचा तसा
डोळ्याआड कशी होते । ही चिंता नित्य मानसा २१

संतोषें निघुनी जावी । स्वगेहांतुनि गेहिनी
गेहींच या विचारानें । जमवी मित्र मैत्रिणी २२

× × ×

किंकर्तव्यविमूढा ती । करावें काय ना कळे
कुठें जावें? न मायेचें । कुणी माणुस आढळे २३

व्यसनासक्ति पतिची। ठाउकी सकला जनां
चाले सर्वत्र ती चर्चा । बोचणी ती सतीमना २४

ती न जाई कधीं कोठें । कोणी ये ना तिचेकडे
एवढ्या जनसंमर्दीं । माउली एकटी पडे २५

धिंगाणा घालिती आतां । व्यसनें सान्निधीं गृहीं
रावे तरी अहोरात्रीं । शांती कीं थोर संग्रहीं. २६

× × ×

शुद्ध मी, न जरी कांता । नीच तो पतिसंगतीं
विरोधें या जनाठायीं । मद्विशीं होय सन्मति २७

एकाकिनी एकदां ती । साध्वी पाहुनि तस्कर
शिरूं पाहे गृहीं, साह्या । ओरडे ती, तिचा स्वर २८

ऐकुनी धांवलों वेगें । मी, न येई दुजा कुणी
धरिलें, शासिलें नीचा । आनंदे ती अती मनीं २९

वृत्त तें कळतां कांता । आला तो भेटिलागुनी
सांगें मी गोड शब्दें त्या । कीं व्हावें शुद्धवर्तनी ३०

पाहुनी त्या गृहीं माझे । आश्चर्यें मूढ मी बनें !
नीचाचेंही परी होतें । संकटें चित्त शाहणें ३१

म्हणे तो, 'व्यसनासक्ति । तापदा वाटली जरी
सुटावें केविं? तीपायीं । जाईन मरणा–करीं ३२

कांता परि विशुद्धा ही । सन्मित्र तिज भेटला
आसरा न तिला कोठें । तुम्हांविण जगीं तिला. ३३

× × ×

सुरापानीं मस्त होतां । कांत, तन्मित्र–मैत्रिणी
मद्गृहीं धांव घेई ती । गेह सोडोनि गेहिनी ३४

जन्मतां संकटापोटीं । स्नेह वाढ विलक्षण
पक्वता पावण्या होणें । लगे त्या दीर्घकाल न ३५

× × ×

सतीसवें स्वगेहीं मी । बसें बोलत एकदां
मदिरामत्त तो देखे । येतां तेथेंच मी तदा ३६

मुद्रा ती, चालणें तेवी । त्याचें अस्पष्ट बोलणें
येणें तें आमुच्या रोखें । सहावें केविं सज्जनें ? ३७

येतां तें तिचिया ध्यानीं । निघे दाराकडे सती
जाई मागें तिच्या मीही । तों रस्त्यावरि मूर्ति ती ३८

पायऱ्या चढतां नीच। आम्हां दोघांस लक्षुनी
बोले अभद्र वाणी कीं। संतापोद्रेक ये मनीं ३९

पत्नीतें मारण्या पाहे। कीं मीं ढकालिलें तया
पडे गडगडे कीं तो। निघे स्वर्गांत जावया ४०

धराया त्यास दोघेही। आम्ही उतरलों तसे
प्रेतासभोंवती त्याच्या। जमलीं किति माणसें ४१

म्हणती 'दारुडा झोंक। जाउनी पडतां मरे'
वाक्यें या निवलीं तेव्हां। आमुचीं भीत अंतरें. ४२

× × ×

तरुणी तरुणासंगें। एकांतीं बोलतां दिसे
पापी संबंध कीं त्यांचा। जनतामानसीं ठसे ४३

ती गेहीं माझिया येई। पाहुनी लोक भीतिचे
कुतर्क रचण्या सिद्ध। होतां आश्चर्य कोठचें! ४४

पतीस तिचिया कोणी। वृत्त हें कथिलें तदा
वदे 'सच्छील तो त्याची। संगती तिस सौख्यदा.' ४५

व्यसनें पशु तो झाला। मानव्य तरि मूळचें
आठवे मधुनी त्याला। सुविचार तदा सुचे ४६

बायकोची दुर्दशा ती। घरीं दारीं न पाहवे;
स्त्री वा पुरूष, मायेचें। माणूस तिजला हवें ४७

आळी ओळींत मैत्रीण। तिजला न मिळे कुणी
म्हणोनी मजला त्यानें। आसरा निश्चिलें मनीं ४८

अपवादातीत माझी । सर्वा मान्य सुशीलता
चारित्र्यीं माझिया होता । त्याचा विश्वास सर्वथा ४९

म्हणे त्या मी तरुण मी । भार्याहि तरुणी तव
स्नेहा उत्तेजिसी केवी । शंका न धरितां लव ५०

'अधमाधम मी माझे । संगतीं शील राखिते
जाईल तुझिया संगें । तिचें चारित्र्य पूर्णते ५१

रहावें मजपासोनी । दूर त्या सतिनें परी
मान्य तें न तिला, गेह । नरकाची जरी झरी! ५२

कोणाशीं बोलणें नाहीं । गेलें गोठोनि तन्मन
बोलणें तुझिया संगें । वाटेल तिज जीवन ५३

स्वीकारी स्वीय भगिनी । निःशंक करुनी मन'
वच हें ऐकतां त्याचें । आनंदें मी मनांतुन ५४

उत्तेजन मिळे ऐसें; । आमुचें मुक्त मानसें
भेटणें बोलणें चालें । अन्यांचें फोल हो हंसें. ५५

× × ×

भेटतां बोलतां मैत्री । अमुची दृढ जाहली
देहांच्या भिन्नतेंतूनी । चित्तें एकत्व पावलीं ५६

होते भेट पुन्हां केव्हां । ऐसें दोघांस जाहलें
कर्तव्य अनिवार्यत्वें । ठेवी दोघां विभागलें ५७

कर्तव्याचरणीं आम्ही । न्यूनत्व न पडूं दिलें
नीतिनिर्बंध केव्हांही । शिथिलत्व न पावले ५८

× × ×

पावित्र्य राखितां आम्ही । तो रस्त्यांतुनि ओरडे
'व्यभिचारी तुम्हां दोघां । धाडितों मी यमाकडे,' ५९

शब्द ते पडतां कानीं । दोघें संतापलों किती !
धांवतां ती धांवलों मी । सजे ती करण्या कृति ६०

कृती ती तिचिया ध्यानीं । आली कांहीं न बोलली
मिळे शासन साजेसें । पाहुनी ती सुखावली ६१

दारुडा दारुनें मेला । सर्वां विश्वास वाटला
पोलीस येउनी त्यांनीं । पंचनामाहि थाटला ६२

झिंगला, पडला, मेला । ऐसा निर्णय लागुनी
अग्निसंस्कार अंतींचा । आप्तांनीं दिधला झणीं ६३

× × ×

संकेत करुनी संधी । साधुनी गांव सोडिलें
दूर या स्थलिं येऊन । गेह नूतन थाटिलें ६४

प्रेमाची पूर्तता झाली । भूवरी स्वर्ग भेटला
होय संसार सौख्याचा । आनंदा पूर लोटला ६५

प्रेमवल्ली तुझ्या रूपें । फुलली, खुलली खरी
संसारा आमुच्या बाळा । जगतीं न दिसे सरी ६६

× × ×

सौख्यानें गांठिली सीमा । उत्कर्षें तेवि माझिया
अपकर्ष उदेला कीं । मजसी न्यावया लया ६७

जन्म देई तुझी माता । भावास तव नूतन
गेह तों पेटलें झालें । अग्नीला सर्व अर्पण ६८

माणसा न कुणा झाला । अपाय इतुका परी
बाळबाळंतिणीला मी । न्यावें आतां कुणा घरी ६९

गेली ती वेळ, मित्रांच्या । साह्यें सर्व निभावलें
परि माउलिचे चित्तीं । भीतीनें गेह घेतलें ७०

नोवरा पहिला तीतें । वाटे कीं भूत होउनी
छळाया सिद्ध झालेला । नाहीं सांभाळितां कुणी ७१

पुरातन कहाणी ती । सांगे सर्वांस निर्भयें
घाबरे जीव माझा कीं । वाच्यता दुष्कृतीस ये ७२

× × ×

दुष्कृती आमुची, आणी । त्याची ती सत्कृती असे?
सजीव सतिभोंती जो । आग पेटवितां हसे ७३

आमरण वधस्तंभा । ज्यानें बांधियलें तिला
धिक्कार त्या विवाहाला । संस्कृती–धर्म–नीतिला ७४

व्यसनांचा अनीतीचा । पुतळा बनला पति
त्याचेशीं एकनिष्ठा हें । मानव्य न, न सत्कृति ७५

अशाचा करणें खून । पुण्यात्म्याचेंच कृत्य तें
पश्चात्तप्तता मातें । बिंदुमात्र न वाटते ७६

माउली तव सच्छील । परी मूढमती पुरी
भूत, भूत म्हणोनी ती । स्वर्गी नरक आदरी ७७

कोठलें भूत वा सूड; । मेला, गेला जगांतूनी
भीतीनें त्याचिया साध्वी । आपणा जाइ टाकुनी ७८

× × ×

सत्यास फुटली वाचा । वदनें सतिच्या, परी
वाटे वेड तें; अमुच्या । शीलाची जगिं खातरी ७९

वेड तें म्हणतां वेडी । माउली जाहली खरी
सानशा बालकासंगें । जलांत घर ती करी ८०

जीव देई तडागीं ती । टाकुनी पतिला मुला
मेल्यावरीहि साध्वीचा । नीचें त्या प्राण घेतला ८१

× × ×

बाळा तूं जन्मुनी आम्हां । मातृ–तात–पदावरी
बैसवीलें तोंच फिरे । आईविण घरोघरीं ८२

तात-माता एकला मी । आतां झालों तुला मुला
गिळुनी दुःख भार्येचें । प्राप्त हो पाळणें तुला ८३

तिचा वियोग साहेना । करावें केवि पालन
तुझें तें नाकळे कांहीं । वाटे संकट दारुण ८४

मैत्रिणी तव मातेच्या । झाल्या माता तुला तदा
विस्मृती तरि मातेची । होईना तुजला कदा ८५

खेळवावें तुला त्यांनीं । बालकांनीं तयांचिया
काळें मातृ-स्मृती गेली । तुझी बाळा पुरी लया ८६

परी चित्र तिचें माझ्या । हृदयींचें गोड तें कधीं
होईना पळही दूर । पळ शांत न होत धी ८७

व्याधीनें ग्रासलों झालों । क्षयाचा बंदिवान मी
चित्त ठेवूं कसें आतां । बाळा मी सांग संयमीं ? ८८

कहाणी सांगतों कोणा? । कळावें केवि बालका
मूढ मी! सुत-तातांना । आतां सांभाळ अंतका ! ८९

× × ×

क्षयें तो जीर्ण झालेला । उमाळा तो न साहवे
गेला सोडोनि बाळा तो । अजूनी जग ज्या नवें ९०

तातास उठवूं पाहे । बाळ ज्या वर्षे पांचवें
चित्त तें केवि रेखावें । मनोगम्यचि तें कवे! ९१

× × ×

बालकें पोरकी लोकीं । फिरतां दिसतीं किती
अर्पितों त्यांस प्रेमें मी । अल्प ही कविताकृति. ९२

१७ ते २७ जून १९३८.]

# दुःखांतून सुखाकडे

( अनुष्टुभ )

रूपयौवनसंपन्न । अलंकारविवर्जिता
ललना भेटली कोणी । जी मूर्तिमति चारुता १

चालली एकली मार्गें । विचारीं रंगली सती
वनश्री मोंवतींची ती । 'नाहींच' जणुं तीप्रती २

जलाशय जलें पूर्ण । हिरवे वृक्ष, लता, तृण
बाल भानू उदेला तो । काळ्या कुट्ट ढगांतुन ३

विश्वा विसरली साऱ्या । विरली स्वीय चिंतनीं
यंत्रसे चालतां पाय । घसरे ती तपस्विनी ४

× × ×

सती ती दृक्पथीं येतां । वाटे परिचिता पुरी
स्मृती निश्चित पूर्वीची होई न परि अंतरीं ५

तिच्या मागें, परी तीतें । दिसावें न, अशा रितीं
चाललों शांत चित्तें तों । चालली खालती सती ६

धावुनी धरितां तीतें । लाजली हांसली, परी
नामें हांकारुनी नेई । परकेपण ती दुरी ७

× × ×

तेधवां रक्षिण्या मातें । धांवलां, धांवलां अतां
स्मरतां काल तेव्हांचा । रंगलें विस्मरे स्वतां ८

बोलणें ऐकतां तेवी । निकटीं ठाकतां तिचे
स्मरतां वृत्त पूर्वीचें । मोदा बंधन कोठचें ९

तेव्हांचें भगिनी-बंधू । नातें आतांहि जोडिलें
सकोच मावळे सारा । कीं झालें मन मोकळें १०

बोलें मी, भगिनी जाऊं । तटाकतटिं ये बसूं
गोष्टी सांगूनि पूर्वीच्या । आतांच्या, चल ये हंसूं ११

× × ×

बैसतां बोलली, 'नाहीं । तेव्हांची विस्मृती कधीं;
प्रत्यहीं, काळ मी वेची । तुझिया स्मरणामधीं १२

निमाले तात-माता ते । त्यांना मी विस्मरे पुरी
बंधो स्मृतीची तुझिया । परंतु स्मरणी करीं १३

कसें झालें? काय झालें? । सर्व ये दृष्टिचे पुढें
बंधो! कां न हो माझे । प्रसूति-समयीं मढें? १४

भगिनी मम पवित्रा ती । बाळा दे जन्म कीं मरे
अविवाहित माता मी । हा काल सजिवा उरे.' १५

× × ×

'आत्मनिंदन हें चाले । अश्रेयस्कर सर्वथा
पुण्य पाप न व्यक्तीचें । समाजाचेंच मुख्यतां १६

नारी नीच ठरे, साथी । नर तीचा पुरा सुटे
अविवेकी समाजा या । विवेकी कोण ना विटे? १८

पाहतां सूक्ष्म दृष्टीनें । ठरसी दूष्य तूं कशी?
मातृ-तातादिकीं तूंतें । पाडिलें बालिके फशी १८

दारिद्र्यें पीडतां राहे । सारासार विचार ना
क्षुत्शांति लाभते कैंवी । एकाकी ही विवंचना १९

कष्टतां न दिसे मार्ग । उदरंभरणा दुजा
तात कीं आपुली नेई । व्यभिचारपथीं प्रजा २०

व्यसनांचीं घरें होतीं । नाना नारी तसे नर
फुटे माथीं समाजाच्या, । व्यक्तीच्या हें न, खापर २१

वैयक्तिक कळे स्वार्थ । सामुदायिक ना कळे
मानव्यहित पाहाया । धजे का जग आंधळें?' २२

× × ×

'व्यभिचारनिमग्ना मी । वेश्येचें घर आमुचें
तरुणा तेंवि वृद्धांना । मम वर्तन हें रुचे २३

आळीचे शिष्टही येती । तेव्हां लाज न आठवे
संकटीं सांपडें मी कीं । नीतीला पीक ये नवें २४

संकटीं पाडिलें ज्यांनीं । जे माझेसम नीचही
नीच ते करिती मातें । बोटें दावूनि प्रत्यहीं. २५

× × ×

'भाउराया बाळ माझें । होतें गोंडस सुंदर
आनंदला जीव माझा । कोसळे परि अंबर २६

नरडीला नख दिलें । मारिलें रम्य बालका'
रडाया लागली तीतें । नावरे क्षण हुंदका २७

× × ×

पस्तावलों कशाला ती । काढिली पूर्विंची स्मृती
जीयोगें बापुडी झाली । दुःखाची जणुं मूर्ति ती २८

सांत्वना सजतों कैसा ? । दिङ्मूढ बनलों पुरा !
विचारी ती परी बाला । आवरी स्वीय अंतरा २९

बोले, 'हीं आंसवें माझीं । औषधी दग्ध अंतरा
जळें त्या शमुनी आग । हायसें वाटतें जरा ३०

मी न दुष्टा, परी केलें । घोर तें कर्म तैं कसें !
समाजा लाजलें, भ्यालें । आतां त्याचेंच ये हंसें' ३१

× × ×

कथा ती कथण्या लागे । पुढची शांत मानसें
माउलीचा मनीं माझ्या । अलौकिकपणा ठसे ३२

'गोड तें बाळ या हातें । कचरापेटींत टाकिलें
वाटलें, सुटलें आतां । सतीत्व जणुं लाभलें ३३

तात माता अतां झाले । जणूं कीं परलोकचे
काय झालें ! कसें झालें ! । वृत्त ठावें न पुत्रिचें ३४

× × ×

'प्रसूत मज होऊनी । घटिका जों न जाहली
तों काम रोजचें बंधो । भगिनी करूं लागली ३५

विशेष न घरीं कांहीं । घडलें दाविण्या जना
नित्याचा मी करूं लागें । विनोद मनरंजना ३६

अंधारीं कृत्य तें काळें । घडलें नष्टलें तसें
प्रसन्नता प्रभातींची । आणाया मुखिं मी हंसें ! ३७

पाप ते झांकण्या तात, । माता, मी झटलों किती
फुटलें सर्व तें बंधो । परि ये ना मला मृति ३८

× × ×

'गवसे प्रेत बाळाचें, । तपास करितां मम
पाप तें कळतां, थेई । पोलीस जणु तो यम! ३९

आद्य प्रसूति आनंद-। स्थान सर्वां, मला परी
अमंगल अकीर्तीची । जाहली घोर निर्झरी ४०

बोलणें पोलिसांचें तें । आविर्भाव तसाच तो
विस्मरेना प्रयत्नेंही, । आजही कंप आणितो ४१

स्वीकार स्वीय पापाचा । केला तात्काळ मीं तदा
वरात काढिली माझी । बंधो! ती खरि आपदा ४२

तात त्या बालकाचा तो । मज पाहोनि हांसला!
मनाचा तोल तेव्हां मीं । दीर्घ यत्नेंचि राखिला ४३

केवढें मजला लाहे । मनाचें बळ तेधवां
शारीरिक तसें बंधो! । प्रसंगें जोम ये नवा ४४

मुद्रा धैर्यवती माझी । चाले निश्चल पाउलीं
लज्जाहीन दुराचारी । वाटे निर्ढावली पुरी ४५

वृत्ती ती जाहली ढाल । मजला उत्तमोत्तम
जिव्हेला पोलिसांच्या कीं । पडला पूर्ण संयम ४६

× × ×

'इस्पिताळीं मला भेटे । भिषग्वर महर्षिसा
मन्मनीं त्या महात्म्याचा । उठे कायमचा ठसा ४७

पाठीवरूनि तो हात । फिरवी धीर दे मला
त्याचिया रसनेंतूनी । अमृतौघचि चालला ४८

पिता सार्थ मला भेटे । वाटे आलें जणूं घरीं
धैर्य कृत्रिम तें लोपे । अश्रूंची चालली झरी ४९

× × ×

'बाळ तें मृत जन्मा ये' । दिला निर्णय डाक्टरें
रूप भीषण पूर्वीचें । अपराधा अतां नुरे ५०

दहाव्या दिवशीं रातीं । प्रेमानें उपदेशुनी
धाडिलें गेहिं; खाटीक- । खाना तो; शिरतांक्षणीं ५१

तातानें पिटिलें मातें । मी कीं मूर्ति अनीतिची !
घेतां न सदनीं दावी । वाट तो जार-गेहिची ! ५२

शिरें मी त्या गृहीं बंधो । आलासी तोंच तूं तिथें
देव तैं दुरुनी पाहें । अतां सन्निध बैसतें' ५३

× × ×

'देव मी भगिनी ! कैंवी ? । नर जें पाप आचरी
नर मी क्षालनीं त्याच्या । सजलों गोष्ट ही खरी ५४

परी संबोधिसी मातें । 'देव', दुर्दैव आमुचें
कर्तव्य कीं सुचे कोणा ? । रुचे कोणा ? कुणा पचे ? ५५

मारिलें पिटिलें तूतें । पडे वार्ता श्रुतीवरी
धांवलों कीं बैसवेना । पळ एक मला घरीं ५६

देखें दारीं तुझा तात । हांकारोनी तयास मी
पूसिली ऐकिली वार्ता । तो माझीं पाउलें नमी ५७

म्हणे, 'हा भेटला देव, । आम्हांला आपुलेपणा
हा काळ दाविना कोणी । जो तो दूरूनि शाहणा ५८

पुत्रिका मम या गेहीं । चला, भेटवितों तिला'
दिसे तेथें तुझे भोंतीं । नीचांचा संच बैसला ५९

देखतां मज आश्चर्यें । नटले, संकोचले पुरे,
घेउनी तुज, तातासी । निघालों तेथुनी त्वरें ६०

× × ×

'अनाथांचे तुम्ही वाली । ठाउके पूर्वींचे मला
तुम्हांला पाहतां तेथें । जीवा आधार लाधला ६१

नीचांनीं नाडिलें मातें । पुन्हां त्यांच्यांत सांपडे;
घाबरा जीव झालेला, । केवढ्या संकटीं पडे ! ६२

डाक्टरें वांचवीलें त्या, । नीचांनीं परि घेरिलें
जीव झाला नको; देवा । भेटो विहिर वा तळें ! ६३

दुश्चित्तता अशी जाची । तों त्वद्दर्शन जाहलें
आनंदलें किती बंधो, । आशांकुर उफाळले' ६४

× × ×

'तात, माता तुझी, तूं, मी । बसलों सदनीं तसे
झालीस तूं स्वसा माझी । तसे ते मातृताससे. ६५

शिक्षणाची विवाहाची । जोखीम तव स्वीकरीं
तत्क्षणीं तुज तातानें, । अर्पिलें माझिये करीं ६६

बोले तदा तुझा तात । 'स्वसा तव नको इथें
नेई ईस तुझ्यासंगें,' । भ्यालों ह्या घोर संकटें ६७

'प्रभातीं स्वगृहीं माझी । स्वसा जाईल' सांगुनी
गेलों प्रसन्न चित्तें मी । लाहे कीं भगिनी गुणी' ६८

× × ×

'गुणी मी? म्हणसी काय? । दुर्गुणांचीच मी खनी;
दुष्कीर्ति ही शिरोभागीं । घेसी तूं केवि होउनी?' ६९

'तूं कैंवि दुर्गुणी बाले । अनिवार्य परिस्थिति
नेई खेंचूनि त्या मार्गी । दूष्या सामाजिकी स्थिति' ७०

'फिरे पाठ तुझी कीं मत्– । तातीं उद्गार काढिला
'दुज्या हातीं कसा द्यावा । स्वतां पिकविला मळा?' ७१

'गेलें गांभीर्य पावित्र्य । स्फुरे स्वार्थांधता जुनी;
कळे स्वानुभवें माझी । दशा, न प्रतिभागुणीं ७२

× × ×

'म्हणूनीच तुला बाळे । म्हणे गुणवती, सती!
नीच–श्रेष्ठ तुझा तात । कळलें मज संप्रती ७३
पश्चात्तापी पुरा वाटे । तो नराधम त्या घटीं
तुझी प्रसन्न मूर्ती ती । स्थिरे मन्नेत्र–संपुटीं ७४
विचारीं रात्र ती वेंचीं । पळ झोंप न लागली
पहांट फुटतां आलों । दर्शना तव माउली' ७५

× × ×

'बंधो! मूर्ती तुझी रातीं । पळ एक न विस्मरे,
सारखी ईश्वरा प्रार्थी; । 'येवो भाऊ मम त्वरें ७६

एकाकी तूं न आलासी । आणिल्या मैत्रिणी सर्वे
आनंदलें किती बंधो । येता बांधव हे नवे ७७

तूं, मी, त्या भगिनीसंगें । चाललों तुझिया गृहीं
खरोखर मला वाटे । कीं हा स्वर्ग न ही मही ७८

पापिणी व्यभिचारी मी । समाजा रोग दुर्धर
त्या मला लाभले स्नेही । थोर नारी तसे नर ७९

स्नेह तोही न गेहींच । रस्त्यांतूनीहि संचरे
आनंदा न उरे सीमा । दुःखातें पूर्ण विस्मरें ८०

× × ×

'प्रवेशतां तुझ्या गेहीं । बंधो जें वाटलें मला
अवर्ण्य तें; गमे माझा । पुनर्जन्मचि जाहला ८१

वृद्ध सात्विक मूर्ती ती । ताताची तव पाहुनी
स्मरे माझा तात मातें । कन्या त्याची तशी गुणी! ८२

तुझी ती भगिनी, भाऊ । भ्रातृ–जाया पवित्र ती,
देखतां योग्य वाटे मी । कां या याया गृहाप्रती ८३

स्वागता माझिया केलें । सर्वांनीं हृष्ट मानसें
मावळे मनिची भीति । वाटे कीं स्वगृहीं असें' ८४

'म्हणे तात, 'तुझा बाळे । म्हण आतां मला पिता
मुली ह्या तेवि तूं मातें । नात्यानें होशि तत्वतां ८५

पूर्वींचा काळ तो गेला, । भविष्य अपुल्या करीं,
कर्णमाता जरी कुंती । पूज्य हो भारतांतरीं ८६

विश्वासें वाग, कल्याण । होणार तव निश्चयें,
चुकीनें शाहणे झाले । त्या मान्यत्व जगांत ये' ८७

× × ×

'पाठीवरोनियां हात। फिरवूनी स्वसन्निधीं
घेती ते, पटलें तेव्हां। स्वसा मी तव धाकुटी ८८

आश्वासिती मला सारे। देवासन्निध नेउनी;
निश्चिलें भूषवावें कीं। मला विद्याविभूषणीं ८९

निघालों फिरुनी जाया। जनकाचे गृहीं तदा
वाटे कीं बालिका नेती। मात्रकावरुनी वधा ९०

'थकलीस किती? जाई। देतों औषध आणुनी'
सांगुनी जाशि तूं; मीही। गेलें गेहीं अभागिनी ९१

× × ×

'गृहीं जातांच नीचांचा। मेळावा जमला दिसे
पश्चात्ताप न कोणाच्या। ताताच्याही मुखीं दिसे ९२

वदे तात, 'तुला बाले। वर हा योग्य निश्चिला
डोलारा मन्मनींचा कीं। तो तात्काल गडाडला! ९३

विषण्णवदना दुःखीं। शिरे मी एकदां तदा
हा काळ सारखी माझ्या। लागे मागुतिं आपदा' ९४

× × ×

कथा ती सांगतां श्रांत,। दुःखें विव्हल जाहली,
अश्रूंची सरिता वेगें। नयनांतूनि चालली ९५

गद्गदे कंठ माझाही। उलें मच्चित्त तेधवां
कुणा सांगूं, कळेनाच। या आणि हिस शांतवा ९६

परी शूर खरी तीच। स्वतः आवरुनी मना
म्हणे, 'तात निघे माझा। भेटण्या तुज त्या क्षणां ९७

काय तो तुजसी बोले?। वागला तुजसी कसा?
भांडणें प्राप्त झालें ना। राक्षसाशींच माणसा?' ९८

× × ×

'भेटला बोलला भाषा । अमानुष अमंगल
'करार कालचा मोडे' । सांगुनी जाइ निष्ठुर ९९

पडली शरिरीं वीज । किंवा भूकंप जाहला,
गेली जाणीव संपूर्ण । झालों मी पुरता लुला १००

कष्टें येऊनि गेहीं मी । पडे शुद्ध मृतापरी
कळतां वृत्त तें सारे । विटले मद्‌गृहांतरीं १०१

निराशा न परी राहे । फारसा काळ मन्मनीं
आशावाद दुणावे कीं । सजलों तव रक्षणीं १०२

× × ×

'व्यापारीच तुझा तात । सुता तूं माल सुंदर!
भाव येतो कसा त्याला, । व्हावें श्रीमंत त्यावर. १०३

हा ध्यास लागला त्याला । अनीती नीति पाहिना
कन्येचें हित होतें वा । नाहीं वा, त्या न कल्पना १०४

म्हणावें देव मातें वा । जोडावी नीचता मला
सर्व हें एक दृष्टीनें । यावा कीं भाव चांगला १०५

स्वसा तूं धाकटी माझी । व्हावें हित तुझें सदा
एक हा ध्यास भावाला । स्वतांचा हाच फायदा १०६

धाडिलीं तार वा पत्रें । निकटीं दूर वा किती
महात्मा एक भेटे जो । प्रणाम शत त्याप्रति.' १०७

× × ×

'महात्माच खरा बंधो, । सिद्ध जो वरण्या मला
लाथाडिती जिला सारे । शिरीं तो घेतसे तिला १०८

नसे माझी कुळाची वा । माहिती इतुकी तया
गुण एक कळे माझा । नीती कीं नेइ मी लया  १०९

बंधो स्मरत आतांही । येणें ताताकडे तव;
ताताची नीचता नाहीं । लक्षिली मद्धितास्तव  ११०

फसवी पूर्ण जो तूंतें । शिव्या देइ अनंत जो
तद्गृहीं जावया एक । जीव बंधो तुझा धजो!  १११

येसी तूं नम्रभावें मत् । तातानें वंदिलें तुला
आडुनी देखतां सारें । केली मीं मनिं वाहवा  ११२

' आणिला योग्य जामात । वयें जो तीस बत्तिस
शरीरें सुदृढ, तत्प्राप्ति । मासाची दोनशे तिस  ११३

बंगला सानसा त्याचा । समाजीं कीर्ति चांगली
दुसरें लग्न हें त्याचें । मत्स्वसा त्यास मानली'  ११४

तव हे ऐकतां बोल । मन्मानस सुखावलें
ताताचें वच ऐकाया । कान वेडेच जाहले  ११५

'सुता बिजवरा कोण । तात दे सांग सुंदर
श्रीमंत खास येतील । शोधीत मम हें घर  ११६

सुता गुणवती माझी । रूपें अनुपमाच ती
द्यावी बिजवरा, केंवी । बोलते तव भारती?'  ११७

वचें या थिजसी बंधो । मी मेलेंच जणूं तदा
ठरला मृत्युचा तेंव्हां । माझ्या निश्चित वायदा  ११८

तुला गेहांतुनी तातें । जणूं हांकोनि दीधलें
भेटीचें तव नैराश्य । मन्मनीं पूर्ण बिंबलें.'  ११९

× × ×

'जातों परत मी गेहीं । महात्मा येइ तों स्वयें!
दर्शनीं त्याचिया माझ्या । आनंदाश्रूंस पूर ये १२०

आला धांवून कोठून । अबला–रक्षणीं नर!
समाजीं थोर ऐसे ज्या । आशेचा त्या असे वर १२१

म्हणे तो 'धांवलों एक । ध्यानीं इंगित घेउनी
अनाथ अबला ऐशा । परधर्मा खरी खनी १२२

परधर्मी म्हणी देती । साह्य आपण होउनी
शोधांत अबलांच्या या । असती ते निशींदिनीं १२३

मिळे आधार आस्थेनें, । अन्नाची होय निश्चिती
संकटग्रस्त सामान्य । जना कीं धर्मविस्मृती १२४

समाज आपुला भाषा । बोले थोर किती तरी
आचारें तितका नीच । नीच झाला खरोखरी १२५

स्वतांची वाहती चिंता । तीही मर्यादिता पुरी
स्वतां सम्राट होईन । ईर्षा कां एकही नरीं! १२६

कसें तरि जगावें मीं । ध्यास हा एक लागला
आपुल्या भाकरीसाठीं । जीव सारा हपापला १२७

शेजाऱ्यास मिळे खाया । कां उपाशीच राहतो
पुसे तो न कधींकाळीं । पुसे त्या मूर्ख मानि तो १२८

सामाजिक न त्या दृष्टि । सामाजिक न जीवन
जो तो आपुल्यासाठीं । त्या समाज न, राष्ट्र न १२९

प्रमाद घडतां हातीं । त्याला कारण एक तो
सामाजिक न आम्ही तो । ऱ्हास केव्हांच वाटतो १३०

समाजीं या प्रमादाचें । बीज जें रूढ जाहलें
फळ केवळ हें दृश्य । समाजा हें न आकळे १३१

ते आमचे राम, कृष्ण, । शिवाजी, रामदास ते
म्हणतां राष्ट्र जाईल । वैभवा त्यास वाटतें १३२

विचारीं करितां क्रांति । सर्वांगीण समाजिं या
वाटते कांहिंशी आशा । ना तरी पावणें लया १३३

विचारें करि या काम । निश्य मी शक्य तोंवरी
संकटग्रस्त नारींच्या । साह्या या येत मी पुरीं.' १३४

× × ×

'ऐकतां वच हें त्यांचें । आनंदोर्मी मनीं उठे
स्मरतां तव ताताचें । वच चित्त जणूं वठे ! १३५

उत्साहें धांवला त्याला । तोषवूं काय सांगुनी
प्रफुल्लता राखण्याला । सांगूं मी काय काहणी ? १३६

संकटीं पडलों, बोलें, । 'उद्यां कोर्टांत जाउनी
भेट घेऊं तिची तिथें । पोर ती फार शाहणी १३७

तात राक्षस तो साचा । पशूच नरदेहिं तो
कृत्य त्याचें, बोल त्याचे । ऐकतां क्रूर कोपतो १३८

जन्मे ती त्याचिया पोटीं । खडकांतूनि निर्झरी
समीप तिचिया बैसे । त्या त्या पावन ती करी.' १३९

× × ×

'स्वतां दुष्ट कशी सुष्ट । इतरां करि ना कळे !
कोर्टानें परि दुष्टेच्या । नेत्रीं अंजन घातलें १४०

पाप माझें मुखांतूनी । ऐकिलें माझिया जगें
शिक्षा तीच खरी मातें । दुजें शासन वाउगें १४१

भीतिग्रस्त मृगीला या । तूंच शीतल साउली
महात्मा आणि तो वाटे । कोर्टाच्या त्या मरुस्थलीं १४२

संपतां काम तूं तेथें । एकाकी गांठुनी मला
पृच्छा केली विवाहाची । थोर तो वर योजिला १४३

होकार न दिला तूंतें । भ्यालें मी पितया किती
पित्याच्या भीतिचें दुष्ट । भोगितें फळ संप्रति. १४४

' पिता शत्रू तुझा बाळे । त्याशीं संबंध तोडुनी
वागतां सुख होईल । न तरी होशि दुःखिनी १४५

इषारा तव हा कानीं । पडला, बिंबला मनीं,
आचार न परी झाला । तेधवां त्यास लक्षुनी १४६

तूंतें दुखवुनी गेलें, । स्मरते सारखी परी
लालसा तीव्र ती माझी । आज भाग्येंच हो पुरी.' १४७

× × ×

'क्षीणता ही शरीराची । तेजोहीनत्व हें तव
सुचवीते सुखाची कीं । प्राप्ती न तुला लव १४८

पाहतांच तुझी मातें । ओळखी न पटे मुळी
भिन्नता केवढी आली । पडली मजला भुली १४९

संकटें काढिलीं वाटे । मज अज्ञात जीं पुरीं
कळलें न मला कांहीं । तरि साह्य कसें करी ?' १५०

× × ×

'कोर्टातुनीच गेलासी । प्रवासा गांव सोडुनी
केला शोध किती तूझा । हो निराश पुरी मनीं १५१

जामीन घेतला माझा । सदाचारविशीं पुढें
सुटलें वाटलें सर्वां, । परि मी अंतरीं कुढें १५२

निपुत्रिक कुणी वृद्ध । आलेला वधु-शोधनीं
कळतां धांवला तात । कीं होता तो अती धनी १५३

ताताची द्रव्यवांछा ती । पूर्णत्वें तर्पिली तयें
माझी प्राप्ती तशी होतां । दुष्ट तो तुष्टला स्वयें १५४

तुरुंग-बदली झाली ! मन संतोषलें जरा !
वाड्याची स्वामिनी झालें । वाण नाहींच चाकरा १५५

शब्द उच्चारितां राहे । पदार्थ पुढती उभा
केवढ्या वैभवा आलें, । बहिःसुख चढें नभा १५६

नियोगसाधनीं मातें । लोटण्या पाहि नोवरा
क्रोधाग्नी भडके माझा । शब्दें कीं नीच जाळिला १५७

नकोसा जीव होऊनी । आत्महत्या पती करी
उजाडे मम सौभाग्य । स्फुरलें ज्ञान अंतरीं १५८

तात मातादिकां साऱ्या । दिलें घालवुनी दुरी
तपस्विनी खरी झालें । मज ये मान्यता पुरी १५९

आस अंतरिंची होती । आज ती तृप्त जाहली
तुझिया सहवासाची । वासना एक राहिली !' १६०

× × ×

'तपस्विनी न वृत्तीनें । तूं परिस्थितिनें खरी
यौवनीं वृद्धता येतां । दुःख होय मदंतरीं. १६१

आशेचा दीप लावोनी । फुलवीतों त्वदंतर
तपाची सोड ही भाषा । कर्तृत्वा अपुल्या स्मर १६२
सोबती तुज साजेसा । वाट पाहत बैसला
सोड दुश्चित्तता, तोष । दे स्वतांसह त्याजला.' १६३

× × ×

'विनोद कोठला बंधो! । चेष्टा ही शोभते तुला?
दग्ध झाल्या वल्लरीला । जीवदाता न भेटला!' १६४

× × ×

'महात्मा तो स्मरें तूंतें । विवाहित न जाहला
चल जाऊं त्वरें तेथें । सुखाची खाण तो तुला!' १६५

× × ×

( शार्दूलविक्रीडित )

केला मी न विलंब एक पळही गेलों तिथें सत्वरीं!
त्यांचा होय विवाह; युग्म पुरतें आनंदलें अंतरीं!
योग्या योग्य मिळे तरी न कमती सौख्यासि या भूवरीं
तें साधे सहसा न; हीच विपदा संत्रस्त सर्वां करी. १६६

ता. २ ते ६ जुलै १९३८ ]

## श्रीधर गोपाळ देशपांडे, दर्यासारंग

श्री श्रीरामपदीं सदैव रमते कीं साहसी तो खरा
गेला शैशविं यौवनीं रणिं वनीं निर्धास्त जेंवी घरां
सोडी सर्व विलास, वास उटजीं, आच्छादना वल्कलें
खाई कंद–मुळें परी रिपु–दळें निर्दाळि बाहू–बळें  १

ध र्म–ध्वंसक कंस–अंतक जणूं वीरोत्तमां वाटला
सिद्धी तद्वननीं परी शिशुपणीं हा खेळ कृष्णा खरा
कालेया यमुना–जळांत निरवी जो मृत्यु–हातीं सुखें
केव्हांही यश साहस–प्रिय न हो कृष्णासि त्या पारखें  २

र क्षाया प्रिय आर्यधर्म यवन–ग्रासांतुनी श्रीशिवें
स्वातंत्र्य–प्रतिमा निशाण भगवें बाल्यींच बालासवें
धैर्यें उंच उभारितां अनुरता जी तैं यशोदेवता
ती त्या सेवि पतिव्रतेपरि सदा सोडोनि दुःशीलता  ३

गो पालात्मज बालका प्रियकरा तूं श्रीधरा शैशवीं
केलें साहस, चेतना निपजवी या भारतीं तें नवी
वाटे सागर शृंखला अजवरी जो भारतामोंवती
आतां दिग्विजयासि साधन गमे ही पाहतां त्वत्कृति  ४

पा यीं सागर ज्याचिया शरण ये त्या राघवाच्या सुतां
आम्हां दुस्तर होय तोच, परक्यां दावी परी नम्रता
त्यांचें होत विलास–वाहन, जगीं सौख्यांत त्या नेतसे
अस्मद्दास परांस हो वश, करी हा भारताचें हसें ५

ल क्ष्मी–सागरकन्यका –स्वपितया मागोनि तत्सेवनीं
झाली दंग करूनि निर्धन पुरे आम्हां अरी लेखुनी
आर्यांची अवहेलना उलटुनी कार्यासि नाशासि नें
येतां श्रीशिव–भूप भारत–रिपु–प्राबल्य होई सुनें ६

है शा रक्षण तो करी कृपणसा राजा शिवाजी सदा
स्वातंत्र्यावरि कोठुनी न कधिही तो येउं दे आपदा
सेना राखुनि सज्ज भूचर रिपू तो नष्ट–नामा करी
नौकांचें दल निर्मुनी निपटितो तो सागरींचा अरी ७

श त्रू इंग्रज पोर्तुगीज जलिंचे त्याच्या भयें कांपती
वाटे सागर–राज सार्थ पदवी तो एकला भूपति
त्याचे दृष्टिपथीं अगाध उदधी झाला गृह–प्रांगण
कीं तत्संमित संचरे, न दुसरी निर्वेध नौका क्षण ८

पां थस्थां प्रिय माउली, परि असे चांच्यां प्रदीप्तानल
विश्वासाश्रय वाणियां, परि मदोन्मत्तांसि हालाहल
नौका आंग्ल 'रिव्हेंज' नामक नवी उध्वस्त केली शिवें
तेव्हां कोंकण–सागरास तुळिती आंग्ल स्मशानासवें ९

डे रा रोवुनि सुप्रसन्न नभिंचा सीमा नसे ज्याप्रति
विस्तीर्णासन घालुनी जलधिचें कान्होजि नौकापति
भोंतीं नौदल दुर्निवार, वदला शत्रूंसि दापावया
'सांभाळा, मिरवा न गर्व, जलधीमाजी मराठ्यांचिया' १०

दर्पोद्रेक नसानसांत शिरुनी लांबूनि या भारती
आले इंग्रज, पोर्तुगीज, डच, त्या साम्राज्य काया रति
आंग्र्यांच्या परि दर्शनें गलबतें त्यांचीं तळीं गांठिती
झालें नष्ट 'ससेक्स' तत्क्षणिं तशी ये 'प्रेसिडेंटा' मृति ११

या साऱ्या इतिहास-लीन सुकथा ध्यानांत तूं ठेवुनी
भावी भारतचित्र निश्चित असें बाळा चितारी मनीं
केले थोर किती पराक्रम तुझ्या सत्पूर्वजीं भारतीं
ऐसे विक्रम तूं करीं, पळभरी होवो न कीं तत्स्मृति १२

साध्यीं निश्चल ठेवुनी नयन तूं साधा खलाशी बने
ईषद्दीप्त विधू समस्त-तनु कां दृश्य-स्वरूपासि ने!
सांगे तो 'जरि मत्प्रभा लव अजी, होईल ती एवढी'
तैंवी निश्चित साध्य तूं ठरविं जें लावील भावी गुढी १३

रंभा जेविं ऋषी पुराण भुलवी सेवा पराची तशी
स्वत्वा नष्ट करोनि मोहिनिबळें खेळे असद्वृत्तिशीं
सांगे तो 'कच' कोण जो स्वकरिं ती घेऊनि संजीवनी
राष्ट्रातें परतंत्रतावश करी स्वातंत्र्यशाली क्षणी १४

गर्जोनी वदला वच प्रखर जें आंग्रे तदा, तें अतां
कान्होजी नव बोलतो कवण ही राष्ट्रास सोत्कंठता
'सांभाळा मिरवा न गर्व लवही या सागरीं आमुचे'
विश्वा भारत-पुत्र कोण नमवी या अर्थपूर्णें वचें? १५

(अनुष्टुभ)

'ईश्वरा' स्मरुनी भावें साध्या निश्चल राखुनी
कर्तव्यीं दक्ष तूं राहे संकटा मित्र मानुनी १६

शब्दशूर असंख्यात, सेवीं तूं कर्म-शूरता
कर्म-शूर यशा जिंकी, कर्म-शौर्य यशस्विता १७

श्री त्याची होतसे छाया धाडसी वीर जो खरा
साहसें सार्थ-नामा तूं श्रीचा श्रीधर आसरा. १८

५ जानेवारी १९२९ ]

| विभाग | विषय |
| --- | --- |
| १ | चतुर संवाद |
| २ | रशिया व लोकक्रांति |
| ३ | समाजदृश्यें |
| ४ | ग्रामीण जीवन |
| ५ | निसर्गदृश्यें |
| ६ | देव-धर्म, वर्ण-जाति, नीति-संस्कृति |
| ७ | जीविततत्वें व व्यवहार |

## विभाग पहिला

# चतुर संवाद

### १ माझीं कवनें

‘वाची न कवन कोणी निरलस तरि लेखणी तुझी चाले
कां काल हा अमोलिक वेचिसि करण्यांत कागदा काळे!’ १

‘जगता अज्ञात अशीं रत्नें उदरांत निर्मिते अवनी
पुष्पें प्रसवे वेली सुगंधयुत अमित निर्जनीं रानीं २

आकाशींच्या तरि कां तारा दिसती समस्त तुजलागीं!
सागरतळीं प्रभायुत मोतीं वसतीं कितीतरि अभागी ३

कवनें मम हीं जन्मा येतीं तैंवीच सृष्टिच्या नियमें
सत्कार न, धिक्कार न, सुसेव्य अज्ञातवास एक गमे!’ ४

१ जानेवारी १९२९ ]

### २ बुद्धीचें श्रेष्ठ ओज

‘स्वातंत्र्यीं लालसा ही बघुनि तव गमे पारतंत्र्यांत आयू !
केवीं तूं वेचिसी हें! यमसदनिं न कां जासि कोंडोनि वायू!’
‘नैराश्यें आत्मघात प्रिय न लव मला, यत्न भावें करून
स्वातंत्र्या याच जन्मीं मिळविन जनता–जागृती शस्त्र जाण’ १

'शस्त्राची धार राष्ट्रोद्धरण करि असा सत्य सिद्धांत लोकीं
निःशस्त्रा तूं कसें तें करिशि सतत हें राहणें राष्ट्र पंकीं
'शस्त्रास्त्रें रूढ आम्हां सुलभ न जरि तीं, बुद्धि आहे सतेज
एकांगी अर्क-कांती बहुविध परि हें बुद्धिचें श्रेष्ठ ओज.' २

१५ मे १९२८ ]

## ३ स्वप्नांतही रुष्टच

'याया विलंब मज लागत अल्पसा तों
ये झोंप का प्रियकरा? मज कोप येतो.'
'स्वप्नांत दर्शन तुझें घडतें म्हणून
घे झोंप तों उठत रुष्ट तुला बघून.'

१९ मे १९२८ ]

## ४ वेश्या नव्हे, गुरु

'कांते' 'कांता नसे मी' 'कवण असशि तूं?' 'मी असें हीनयाती'
'प्रेमक्रीता परी तूं!' 'अधम अकुलिना आपुली प्रेमवृत्ति'
'ती केवी?' 'रूपशाली मजहुनि दुसरी भेटतां आवडे ती.'
'केवीं वारांगना मी म्हणुं तुज, तव मी शिष्य, तूं उच्चवृत्ति'

१९ मे १९२८ ]

## ५ तें निर्धना सांकडें

'कांतेला प्रिय कांत का, प्रिय तशी कांता स्वकांतासि का?'
'आहेसी प्रथमाश्रमीं अजुनि तूं?'– 'मी ब्रह्मचारी निका'
'गार्हस्थ्यीं रुचतो प्रवेश तुज कां?' 'शंका परी ही नडे.'
'हा पाणिग्रहणेंच संशय नुरे'–'तें निर्धना सांकडें!'

२० मे १९२८ ]

## ६ प्लेगामुळें !

'निर्द्रव्यत्व म्हणोनि वास उटजीं आराम तुम्हास दे'
'जो अज्ञान, अलोचन व्यथितधी तो एक ऐसें वदे.'
'सांगा कारण सत्य या कवण तें दुर्बुद्धि आम्ही खरे'
'प्लेगानें परतंत्रता–भिष अम्हां हीं सेव्य झालीं घरें !'

२२ मे १९२८ ]

## ७ संकुचित स्वार्थ

'मी क्षुद्र मानव मला लघु कार्य व्हावें
आकाश खेंचित निरर्थक कां मरावें ?
माझेंच दुष्कर मला जगणें जहालें;
हे विश्वरक्षण पुरें फिरतात डोळे.'

'चिंता वाहुनि आपुलीच अचुका सामर्थ्य निष्कारण
कां संकूचित जाणुनी करिसि तूं राष्ट्रासि जें तारण ?
पुष्पाचें जरि होत रक्षण तरी लाहे दला राखण.
राखावें परि एक हेंच दल कीं हो शक्य पुष्पावन.

२१ डिसेंबर १९२८ ]

## ८ भूमिगत चंद्रसूर्य

'आकाशीं उगवे शशी अजवरी प्रत्यक्ष हें पाहिलें
येतो भूतलिं तो असें प्रथम हें दृक्प्रत्यया पातलें.'
बोले हांसत कांत तोंच वदते कांता विनोदें तया
'आला भास्करही तयासह तसें भिन्नत्व गेलें लया.'

७ जानेवारी १९२९ ]

## ९ कवितारूपी सवत

‘कांते मी असतां समीप कुठुनी ये खिन्नता त्वन्मुखीं?
‘काया सन्निकटीं न मानस,’ ‘मना तूं माझिया पारखी.’
‘आहे सिद्धचि हें’ ‘कसें?’ ‘मजसवें होतात ज्या ज्या कथा
सांगोनी कवितेस त्या करितसां माहात्म्य माझें वृथा!’

७ जानेवारी १९२९ ]

## १० पतीची निवड

‘वृत्ति प्रेमल, बोल मंजुल तुझे, लावण्य चेतोहर
मातेची तनया खरीच दिससी चारित्र्यही सुंदर’
बालेला वदला पिता त्वरित तों माता वदे कौतुकें
‘त्वत्तातासम कांत शोधुनि करीं हे शब्द बाले निके!’

७ जानेवारी १९२९ ]

## ११ पांडव व राम कोठें आहेत?

‘विद्या–भूषण–भूषिता न ललना आसक्त कांतावरी
अज्ञानी अबला जशी, गमत ही कांते खरी वैखरी
‘विद्याशून्य निरक्षराच अबला स्वप्राण नाथा गणी
विद्यापारग जानकी पतिसवें कीं जात रानींवनीं’
‘सीता द्रौपदि मानिती स्वगृहसें कांतार कांतासह
विद्याभूषित अंगना अभिनवा कष्टा गणी दुर्वह’
‘नाहीं भारतिं जेविं एकही अतां श्रीराम वा पांडव,
तेवीं द्रौपदि जानकी न दिसती या आर्य देशीं तव.’

११ जानेवारी १९२९ ]

### १२ स्त्री आणि चंद्र

'इंदू अक्षयिंचा क्षयी, तदुपमा केवी कवी स्त्रीमुखा
देती? दूष्य न ती? गमे न तुज वा सन्मान कांते सखा?'
'नाथा तो असला क्षयार्त अमृत–स्पंदी परी अक्षय
तेवीं स्त्री बलहीन निर्भय करीं वीरा निराशामय.'

११ जानेवारी १९२९ ]

### १३ कातरता कां?

'अप्रीती तुझियाविशीं मनिं जिच्या तत्प्रीति लाभो अशी
वांछा तीव्र तरी, न ये मरण तों नैराश्य त्वन्मानसीं
ठाणें देउनि राहणार, सखया, तन्नाम सोडी तरी'
'स्वातंत्र्याविशिं तूं निराश न, इथें त्वद्वृत्ति कां कातरी?'

१ जुलै १९३८ ]

### १४ मी न सम्राट कोणी!

'जासी रत्नागिरीला असतिं सततचीं तेथ रत्नें अमूप!
आणी जिंकूनि सारीं, कवनिं करिन मी अक्षयी तत्प्रताप.'
'आणाया रत्नराशी गमन न करिं मी, मी न सम्राट कोणी;
सामर्थ्यें सज्ज होतां परधनहरणीं मी न आनंद मानी.'

३० जुलै १९३८ ]

### १५ ही कां मानवता?

'स्त्रीला धिक्करिसी परी तिजविना चाले न एक क्षण
ही कां मानवता, असे रसिकता, वा प्रीतिचें लक्षण?'
'नारी ही उपभोग्य वस्तु, न तिचें माहात्म्य तूं वाढवी
झाली सुंदर चेपली म्हणुनि कां डोईवरी वागवी?'

१४ एप्रिल १९४१ ]

### १६ स्त्री देतसे संस्कृति

'बाबा, तूं अविवाहित, प्रिय गमे नारी तुला त्यामुळें
नारीचा सहवास नाहिं तुजला, कावा न तीचा कळे;'
'माता, मैत्रिण वा स्वसा मज असे यांची सदा संगति,
देई स्त्री मज जन्म तेंवि मजला स्त्री देतसे संस्कृति.'

१४ एप्रिल १९४१ ]

### १७ खरा साहाय्यक

'लांड्यासंगतिं ती घरांतुनि कशी गेली निघूनी पहा
'नाहीं धर्म, न शील, ना कुल तिला, ना अब्रुची वा चहा;'
'हा अन्याय खरा, तिला न महिना खाया समाजें दिलें;
तें जो दे तिज त्याचिया सह सुखें गेलीं तिचीं पाउलें!'

२२ मार्च १९४२ ]

### १८ तत्वपालनाचा आनंद

'जोडीदार नसे, हंसे तुज परी जो तो, पळे संपदा
नांवानेंहि न ठाउकें यश तुला, ठेंचा परी सर्वदा
सारें सोसुनि लाभ काय तुजला? सोडूनि दे हट्ट तो,
'तत्त्वाच्या परिपालनीं नरमणी निर्मळ आनंदतो.'

२३ मार्च १९४२ ]

### १९ समाजाला संपन्न पाहण्यासाठीं

'झालें जीर्ण शरीर, शक्ति नुरली, वार्धक्य आलें पुरें
आशेचा करपे न अंकुर परी, हें गूढ आहे खरें.'
'नाहीं गूढ, भविष्यकाल मज ना, आहे समाजा परी
तो संपन्न बघून ये मृति तरी वाटे खरी माधुरी.'

४ एप्रील १९४२ ]

## २० मी कृष्ण ते अर्जुन

'रोगी तूं तुजला न शोभति कथा वीरास ज्या शोभती
साऱ्या या तव वल्गनाच ठरती कीं नाहिं कांहीं कृती;'
'भ्याडांनो! तरुणा तुम्ही भिववितां, मी देइं संजीवन;
वीरांच्या करितील खास कृति ते, मी कृष्ण ते अर्जुन.'

५ एप्रिल १९४२ ]

## २१ भीती ही मानभावी

'दाराशीं शत्रु आला, गृहकलह तरी चालले हे अजून
दोघांही खाउनी तो सहज पचविण्या शक्त हें सत्य जाण,'
'भीती ही मानभावी अनुदिन तुजला दावि साम्राज्यवादी
त्याला ह्यालाहि खाया कमर कसुनि तूं सिद्ध हो ऊठ आर्षी.'

९ एप्रिल १९४२ ]

## २२ भावी यशाचा शिक्षक

'नाहीं काय उपाय कांहिं पुसण्या संस्कार ते पूर्विचे?
पूर्वींच्या स्मृति होउनी सुख लया हें जातसें आमुचें;'
'वेड्या हें वदतोस काय? न जुन्या कालापरी शिक्षक
तत्साह्यें पथ नीटसा उमगतो भावी यशोदायक!'

१० एप्रिल १९४२ ]

## २३ हें नाहीं तर तें!

'समाजाची सेवा तिळ न करितां ये तुज जरी
तुवां खावें, ल्यावें, अनुचित दिसे हें मज तरी.'
'समाजें मारावें अगर करणें आत्महनन,
न हीं होतीं दोन्ही तरि मज हवें अन्नवसन'

१० एप्रिल १९४२ ]

## २४ अशांना शंभर नमस्कार!

'रुचे मातें सत्तेभंवति फिरणें, स्वार्थ करणें
नको तें तत्वाचा जप करित नि:स्वार्थि फिरणें
तुझी सत्ता होतां तुजजवळि येईन फिरुनी,'
'नमस्काराचें हें शतक तुज बा, जाइ निघुनी'

११ एप्रिल १९४२ ]

## २५ मनुष्यजीवन विक्रमासाठीं

'बघून इतरां सुखी मन खरेंच लाचावतें
अशक्य अपणांस तें स्मरुनि पावतें खिन्नते'
'तरी हसत आपुला करित राहि कार्यक्रम
मनुष्य रडण्या जगे न परि साधण्या विक्रम'

११ एप्रिल १९४२ ]

## २६ शिष्टाचारार्थ

'देवा कां वंदिलें तेव्हां? । घेतला तत्प्रसाद कां?'
'मानिलें मीं न देवाला! । परि देउळ–मालका!'

१५ एप्रिल १९४२ ]

## २७ कष्टाशिवाय भोगूं कसा?

'फळें तूं पडलीं खाशी । तोडिशी न कधींच कां?'
'कष्टतों मी न केव्हांही; । भोगूं का भर मी फुकां?'

१६ एप्रिल १९४२ ]

## २८ आशा मनीं दाटली

'रोगानें थकलें, शरीर नुरलें कांहीं जगीं वांछित
मृत्यूची दिनरात वाट बघसी, हें काय त्वज्जीवित?'
'वाटे मौज परंतु एक मजला कीं आत्महत्या मुळी
केव्हांही रुचते न, अंधुक अशी आशा मनीं दाटली.'

१७ एप्रिल १९४२]

## २९ कर्तृत्वाला वाव नाहीं !

'निकामी झालासी परि न पळही स्वस्थ बससी
मुखें हातें कांहीं करिसि, पडसी मागुनि फशी.'
'निकामी मातें तूं म्हणसि परि तो शब्द भलता,
न माझ्या कर्तृत्वा जगतिं मिळतो वाव पुरता !'

१७ एप्रिल १९४२ ]

## ३० लगाम कीं चाबूक ?

'पोरींना शेपट्याचा गमत रचियला हा निसर्गें लगाम
धांवाया लागल्या त्या, परिमिति नुरली, ह्या लगामास काम;'
'काळाची हांक कानीं नव पडुनि अम्ही साथ द्यायास सिद्ध
झालों तों आड ये त्या हतबल करण्या सृष्टि हा दे प्रतोद !'

१८ एप्रिल १९४२ ]

## ३१ पुरुषांमागून स्त्रिया !

'कांसोटा दिसतो फिरून कुठला? वेणी दडोनी बसे
चोळी आढळते कुठें? लवकरी जाणार कुंकू तसें
आशा लेश नसे, स्त्रिया बिघडतां सर्वस्व गेलें लया !'
'आधीं भ्रष्ट तुम्ही पुरुष; तुमच्या शिष्या अम्ही या स्त्रिया !'

१९ एप्रिल १९४२ ]

## २३ मी चंद्रमा लाडका

'तूं माझी प्रिय चंद्रिका, तव असें मी चंद्रमा लाडका'
'नातें मानवतें न हें मजसि, मी आहे पराधीन कां?'
'वेडी तूं! शिकलीस हेंच? रविची दीप्ती असे चंद्रिका;
ती तूं; मी विधु कांतिहीन, चमके कीं मी तुझा लाडका!
१९ एप्रिल १९४२ ]

## ३३ सचैल स्नानाचें सुख !

'केसांनीं तर रूप सुंदर खुले ते कां तुवां काढिले?
घेवोनी अशुभत्व डोइवरि हें त्वां काय गे साधिलें?'
'केसांच्या किती यातना! सततची सेवा तयांना हवी;
डोईस्नान अतां मिळे प्रतिदिनीं सौंदर्य तें वाढवी!'
१९ एप्रिल १९४२ ]

## ३४ मोह केसांचा नको !

'गुलाब तुज आवडे म्हणुनि आणिला लांबुनी
अधीर बघण्या किती तव शिरीं स्वतां खोवुनी;
स्वकेश सखये तुवां स्वकरिं टाकिले कापुनी!'
'न केश मम, मत्पराक्रम करो तुला मोहिनी!'
२० एप्रिल १९४२ ]

## ३५ अज्ञानामुळें दुबळ्या

'कांखें पुस्तक शोभतें न, खुलते ती बालकानें परी
शोभे शिक्षण हें मुलांस, मुलिंना मातृत्व दे माधुरी.'
'आम्हां बालक, पुस्तक प्रिय तसें, आजी, तुम्हीं पुस्तका
केला स्पर्श न; हीन, दीन, दुबळ्या त्यानें तुम्ही बायका!'
२० एप्रिल १९४२ ]

## ३६ विरह नको तर

'नयन शिणले, केव्हांची ही बघें तव वाट मी,
कुठवर असें साहूं, आहे जरी अति संयमी;'
'प्रिय मजसि तूं, तीं कर्तव्यें तशींच मला प्रिय;
विरह विरण्या त्या कर्तव्यां मिळो तव आश्रय!'

२० एप्रिल १९४२ ]

## ३७ नवें जग

'तनय तनया कोणा हातीं समर्पण मी करूं?
दलित–जनता–सेवेसाठीं मुलें मुलि संहरूं?'
'सदन तिकडे नेतां सारे जमेल सुखें सखे!
नव जग तिथें; त्याचेसाठीं जुनें करुं पारखें.'

२१ एप्रिल १९४२ ]

## ३८ निराशावादाला मारा

'समाधाना कोठें अवसर दिसेना तिळभरी
निराशेची छाया तरुण–तरुणींना वश करी
'जगावें आ–मृत्यू 'हुनि न उरलें ध्येय अपणा,
'निराशावाद्यांचें हनन करण्या ऊठ तरुणा!'

२२ एप्रिल १९४२ ]

## ३९ याहून आत्महत्या भली

'दया दावीं मातें शरण चरणां मी तव असे
निवारा देणारा तुजविण मला अन्य न दिसे,'
'अशी दीना वाणी वदुनि जगण्या यत्न करसी
गळा कापोनी तूं स्वकरिं सुजना कां न मरसी?'

२२ एप्रिल १९४२ ]

## ४० तरुणांचें स्फूर्तिस्थान

'स्नेही गेले जुने ते, नव तरुण कसे मित्र होतील माझे?
माझें त्यांशीं जमाया मजजवळि असे काय त्यां पाहिजे तें?
'साजेना ही निराशा, गलित अवयवीं पूर्ण तारुण्य नांदे
आम्हांला लाजवी तें तरुण जरि अम्ही स्फूर्ति आम्हांस तूं दे.'
२३ एप्रिल १९४२ ]

## ४१ कामुक नव्हे कर्तृत्ववान

'तुझ्या नादीं लागें म्हणुनि म्हणती कामुक मला'
'विचारा त्या कामीं कवण? म्हणती केंवि तुजला?
तुझ्या माझ्या स्नेहें अगणित तुला पंख फुटले;
फुले त्वत्कर्तृत्वें नगर, म्हणती कामुक खुळे!'
२४ एप्रिल १९४२ ]

## ४२ संकटींची सांगाती

'शहाणी वा ज्ञानी, प्रणयवति, लावण्यलतिका,
नसे मी कांहींही तरि मजवरी प्रेम तव कां?'
'विचारीना कोणी मजसि समयीं ज्या तिळभरी
दया त्वां कां केली? कटुवच सहूनी मजवरी?'
२५ एप्रिल १९४२ ]

## ४३ बेडी तुटली!

'ये आलीस कधीं? स्मृती मम असे? आनंद झाला अती!'
'येतें हीच, इथेंच राहिन सदा; जावी कशी त्वत्स्मृति?'
'येथें तूं वसणार?' 'मी तुज नको?' 'त्वत्कांत?' 'तूं', 'हा भ्रम.'
'बेडी ती तुटली,' 'तुझा तर अतां मी, लाडके तूं मम.'
२६ एप्रिल १९४२ ]

### ४४ द्वैत गेलें लयाला

'एकाकी तूं फिरशि अशि कां? शोधिसी कां कुणाला?'
'जा तूं मार्गें, शिणविसि मला, आणि तूं कां स्वतांला?'
'कोपाविष्टा दिससि परि तूं शोधिसी या जनाला,'
'तूंही मातें' म्हणुनि हंसली, द्वैत गेलें लयाला.

२६ एप्रिल १९४२ ]

### ४५ लोककार्यार्थ

'आहे वृद्ध' 'असो; असे धन किती?' 'सोपें न तें मोजणें.'
'व्हावें तें मज,' 'सौख्य त्यांत तुजला?' 'कार्यास सिद्धी घनें,'
'कांताचा उपयोग हाच तुज कां?' 'मी लोक-कार्यीं रमे'
'पोरी तूं चुकतेस,' 'पोर चुकली, वेडी म्हणा जें जमे!'

२७ एप्रिल १९४२ ]

### ४६ सहवास-रोग!

'सचिंत बसलीस, बोलसि न, हास्य कां मावळे?'
'विचार अपुल्या मना, न प्रतिबिंब हो वेगळें!'
'न बिंब-प्रतिबिंब खास पति-पत्नि मी तूं तरी!'
'असेल सहवास-रोग जणुं सांथिचा या घरीं!'

२८ एप्रिल १९४२ ]

### ४७ जाऊं आतां लढाया

'येसी रस्त्यांतुनी तूं खिदळत, इतका काय आनंद झाला?'
'वाची हें पत्र, कां रे चढविसि भिंवया? केवि हा योग आला!'
'तूं स्त्रीवर्गी तसा मी अनुपम पुरुषीं शक्तिचे सामन्यांत
जाऊं आतां लढाया, परत फिरुं गडे गात स्वातंत्र्य-गीत'

२८ एप्रिल १९४२ ]

## ४८ विषण्ण विनोद!

'केव्हां होशिल तूं बरी जिवलगे चिंता अती वाटते'
'वेडा तूं, ललना नवीन तुजला लाभेल, सद्भाग्य तें'
'या तापांत तुला विनोद सुचतो, मी भाग्यशाली खरा!'
'भाग्याचा दिन ये तरी रडसि तूं, वेडा खुळा रे खुळा!'
२८ एप्रिल १९४२]

## ४९ दोन बाळें!

'देवी मातृपदाभिरूढ दयिते दासास दावी दया'
होतो प्रौढ पुरूष तात बनतां, तो बोल गेला लया'
देवी बाल तुझा, तसा पति तुझा, तोही भुकेला अती'
बाळाला समजाविशी तरि तुझ्या अर्जा मिळे संमति!'
२८ एप्रिल १९४२]

## ५० महान ज्ञानी!

'अहोरात्रीं साऱ्या तव करिति या मैत्रिणि मजा
तया वस्त्रां–खाद्याविण विषय माहीत न दुजा;'
'असें त्वन्मित्रांना विविधविषयज्ञान, पटलें–
कुणाची स्त्री कैशी श्रवण करितां कान किटले!'
२८ एप्रिल १९४२ ]

## ५१ आळशाची कैफियत

'आलें मी फिरुनी, प्रसन्न बनुनी, कामा असे सिद्ध मी
निद्रेच्या निकटीं तुझ्या खटपटी, हा कां गृहस्थाश्रमी?'
'स्वार्थाला भुलती सदैव खपती लोकीं तुझ्यासारखे
निःस्वार्थी निजती तयां भगविती स्वार्थी स्वतां ते सखे.'
२९ एप्रिल १९४२ ]

## ५२ तूं मित्र मी मैत्रिण!

'आह्मीं आपण मित्र, काम करितां एकात्मता लाभली
आतां होउं विवाहबद्ध, सहजी हो वास एक स्थळीं.'
'अर्धांगी तव झालिया न इतुकें वाटेल आकर्षण
नातें हें अपुलें असे सततचें, तूं मित्र मी मैत्रिण.'

२९ एप्रिल १९४२ ]

## ५३ बाहेरचा राव!

'लोकांशीं वागतांना अघटित घटना साधणारा दिसावा
गेहीं तो वीर येतां किरकिर करण्या नाहिं त्याच्या विसांवा'
'कांते कोडें न कांहीं, वणवण करुनी त्रस्त हा होय जीव
येतों त्वत्सन्निधानीं, तळमळ निवतां जात बाहेर राव!'

२९ एप्रिल १९४२ ]

## ५४ घरची कामधेनू!

'आलों देणें देउनी पूज्य झालें;
झोपूं आतां स्वस्थ, तें पाप गेलें'
'साह्या आहे, नोकरी स्वीकरीं मी'
'भाग्यें लाभे कामधेनू स्वधामीं.'

३० एप्रिल १९४२ ]

## ५५ मला पकडला!

'कळे गुपित तें तुझें प्रणय ताइशीं मांडला
न मूढ, अबला न मी, सहज डाव तो मोडिला;
प्रभातसमयीं उद्यां बघ प्रसिद्ध हें होतसे'
'क्षमा कर, सुधारण्या अवधि दे मला, राजसे.'

३० एप्रिल १९४२ ]

## ५६ विषारी सुरी !

‘कर्जाचें भय वाटतें न, मजला उत्कृष्ट वस्त्रें हवीं
थोरांची वरिली कशास तनया, प्राप्ती स्वतां वाढवी,’
‘बाई जोडुनि हात हें विनवितों, वाटेल तें तूं करी
कर्जाचें परि नांव घे न कधिं, ती आहे विषारी सुरी.’

३० एप्रिल १९४२ ]

## ५७ वाईट कोण ठरतो ?

‘गांवांत तुझेविषयीं मत आहे फार फार वाईट,’
‘वाईट कोण ठरतो ? जन जो आहे खरा खरा धीट.’

३० एप्रिल १९४२ ]

## ५८ गुलाम !

‘न मातृपद मानवे मजसि सत्य हें लांछन’
‘तुझाच अपराध हा, तव खरें गुलामी मन’
‘गुलाम म्हणसी मला, तव असत्य संशोधन’
‘न घालिसि गडे कधीं विषयलंपटा बंधन.’

१ मे १९४२ ]

## ५९ न करत्याचा वार !

‘घड्याळ चुकलें तुझें, उगवला नभीं शुक्र हा
कधीं न चुकणार तो, उठ तुला हवा ना चहा ?’
‘चहा मज हवा, परी अचुक शुक्र मानूं कसा ?’
‘निजून तरि तूं रहा, उबवितें स्वतांचा घसा.’

१ मे १९४२ ]

## ६० पुरुषांचा पोटशूळ

‘ तुझे विविध सोहळे सतत चालले सुंदरी
विचारि न मला कुणी, मति न पक्षपाती बरी’
‘ नरा निवळ सौख्य, ये वजन वाहणें स्त्रीवरी
तिला मिळत मान, तो सलतसे नराभ्यंतरीं !’

१ मे १९४२ ]

## ६१ पहिली रात्र

‘ पुराण जरि प्रेम तें, परि निशा नवी कालची
विशेष पतिपत्निता परिचयास आणी रूचि !’
‘विलक्षण निसर्गिंची कृति किती ! परी मामुली
तिला गणितसूं अम्ही; म्हणूनि लग्नसंस्था लुली !’

१ मे १९४२ ]

## ६२ मला कीर्ति तुला खडे !

‘ स्वराज्य-स्वातंत्र्या तन-मन-धनें अर्पित तुवा
न ये हातीं कांहीं, स्वहित न, नसे राष्ट्रहित वा;’
‘ सदाचा तूं स्वार्थी निगडित तरी स्वार्थ न घडे
मला हे कीर्तीचे कलश, तुजला केवळ खडे.’

२ मे १९४२ ]

## ६३ तूं कशी अप्रबुद्ध !

‘ चित्रें युद्धांतलीं हीं, तुडवुनि करुणा टाकणारीं, बघून
गेलें मी गांगरोनी, सदनिं न असलीं आण नाथा फिरून.’
चित्रें पाहून होशी विगलित, करणें स्त्रीस शस्त्रास्त्रसिद्ध
व्हावें हें ध्येय माझें सफल मग कसें ? तूं कशी अप्रबुद्ध !’

६ मे १९४२ ]

## ६४ भीती न शोभे

'झालासि तूं सामिल सैनिकांत। ही मात मातें करि फार भीत'
'भीती न शोभे सखि वीरवृत्ति। स्फूर्ति स्फुरो जी स्फुरवील कीर्ति.'
७ मे १९४२ ]

## ६५ उपाय

'पुष्पांचा गुच्छ केला, परतुनि सदनीं येसि द्याया तदा, मीं
झाला माझा परंतू विरस, अडकसी दूर बाहेर कामीं;'
'माझी होतां यथार्थें सहचरि न कधीं व्हायची ही निराशा,
खेडेगांवी सभा त्या पुरवितिल तुझी आदराची मनीषा!'
७ मे १९४२ ]

## ६६ तुझें भय !

'मृत्यूला सखि पक्षपात अगदीं ठावा नसे, तूं तर
त्याला होऊनि हांक मारिसि, अशी झालीस कां आतुर?'
'मृत्यूचें भय वाटतें न मज, तें वाटे तुझें, तूं सर्वें
माझे नेशिल केश हे, तरि मला आधीं तुझ्या तें हवे!'
८ मे १९४२ ]

## ६७ निष्णात !

'कांते मृत्यु तुझा भयंकर मला वाटे, नको गोष्ट ती'
'प्रीतीची सखि मी तुझी, तव ग्वरी होणार रे दुःस्थिति;'
'मृत्यूनें मम कोणिही न रडणें, दे त्रास सर्वांस मी,
जीतां मी रडशील तूं, असासि त्या निष्णात कार्यक्रमीं.'
८ मे १९४२ ]

## ६८ जुनें आणि नवें

'शोभे पातळ गोल हें न तुजला, रीती न ही आपुली
सोडावी न परंपरा उगिच तूं ही गोष्ट नाहीं भली;'
'गेलें धोतर, ही विजार चढली, ही काय आहे जुनी!
स्वातंत्र्य–प्रिय सज्जन प्रियजन–स्वातंत्र्य घे काढुनी!'
८ मे १९४२ ]

## ६९ वार्धक्य कोणा सहे?

'नातू नात तुझ्या कडेवर तरी गांभीर्य कांहीं धरी
वार्धक्यांतहि बाळकांपरि सदा त्वच्चित्त खेळावरी!'
'घे माळ स्वकरीं, करी जप, धरी गांभीर्य, दुर्भाग्य हें
मी खेळेन अशी सदैव, मृत हें वार्धक्य कोणा सहे!'
९ मे १९४२ ]

## ७० नित्याचा अज्ञात!

'उंचवटा उदराचा दर्शन अज्ञात दे तुझ्या पतिचें'
'अज्ञात सदा राहिल झाला युद्धांत खाद्य मृत्यूचें!'
१० मे १९४२ ]

## ७१ तो हवा!

'गुलाब मम दे' 'कसा तव!' 'पथीं तुला सांपडे'
'तरी तव कसा!' 'पथांत मम वेणिंतूनी पडे;
तुवा उचलिला असे मम म्हणून ना तेधवा!'
'नको, पतित हा, तुझ्या फुलत गालिं जो तो हवा!'
१२ मे १९४२ ]

### ७२ परस्परपूरक

‘ अशिक्षित घरांत तूं शिरासि, तीच आतां मला
सखे शिकवितेस, हा फरक केवढा जाहला !
तदा असत एक तें मन घरीं अतां दों परी ’
‘ न भिन्न जरि दोन तीं करितिं एकमेका पुरी ’
‘ गुलाम मज मानिशी असशि एकटा मालक
मिटे फरक तो अतां असति येथ दो चालक ’
‘ मनुष्यपण तेधवां विकृत सत्य माझे तुझें
मनुष्य असु दो अतां समसमानधर्मीच जे ’

१२ मे १९४२ ]

### ७३ विश्वासाला अपात्र !

‘अंबाड्याहुन शेपटाच तुजला शोभे खरा साजणी ’
‘ ओढोनी परि सारखा अरसिका देसी मला जाचणी ’
‘झाला खेळ खलास तो, तुज जरी हो त्रास त्यानें सखी ’
‘ विश्वासास अपात्र तूं, रडवुनी अन्यास होसी सुखी !’

१३ मे १९४२ ]

### ७४ भांडण मिटविण्यासाठीं

‘पुष्पानीं न सुवासिनी, परि खरी ती बालकें शोभते ’
‘बाळाची परि शुश्रुषा न रुचते ताता सजा वाटते ’
‘ मीं ‘ विश्वास ’ न मारिला, विसर तें, निष्काळजी मी नसें ’
‘ चेष्टाही तुज बोचते, करुनि कां घेसी स्वतांचें हसें ?’
‘नाहीं हा सखये विनोद, करिसी आरोप हा नेहमीं ’
‘जोडी हात, करी क्षमा, फिरुनि हें केव्हां न बोलेन मीं ’
‘ वेडी तूं कसली क्षमा, कसलि वा केली प्रतिज्ञा तुवां ’
‘आतां भांडण हें हवा मिटविण्या ‘ विश्वास ’ नाथा नवा !’

१३ मे १९४२ ]

## ७५ 'कमा'चें कर्तृत्व

'उगा न हंससी कधीं, हंससि आज कां तूं अशी?'
'स्वतांच हंसु दाबुनी हंसवितोस तूं कां मशी?'
'मिशा उडविल्या न मी, परि कमा खुळी पोर ती!'
'करीत 'अबला' तुला अबल पोर ही संप्रती!'
१४ मे १९४२ ]

## ७६ ध्येयाला भुलून !

'दारिद्र्यानें गुणिजन दिसे दुर्गुणी थोर नीच
याचा आला अनुभव पुरा, आणिला तोहि तूंच!'
'श्रीमंतीला भुलुनि तुजला मी न देई नकार
ध्येयाला मी अपुरि तुझिया हा करीं मी विचार.'
१५ मे १९४२ ]

## ७७ जखमेंत मीठ !

'गेले खोल कपोल, नेत्र दिसती निस्तेज हे पांढरे
झाले केश, शरीर शुष्क, नव हें तारुण्य कां संचरे?'
'आहे हें जखमेंत मीठ, अथवा डोळ्यांत बोटें खरीं
प्रेमाचा मम भंग तूं करुनि ही पृच्छा दिसे कां बरी!'
१५ मे १९४२ ]

## ७८ खेळणें !

'मी श्रीमंत तरी तुला न रुचलों त्या हीनदीनापरी
तूं प्रेमें वरिलें अपार दिधलें सौंदर्य त्याचे करीं'
'माझ्याशीं धरि लीन भाव, करितो माझी स्तुती सर्वदा
क्रीडासाधन तें रुचीपरि मिळे हा नाहिं कां फायदा!'
१५ मे १९४२ ]

## ७९ सूड

‘हें मी पातळ आणिलें तुज रुचे कां? रंग हा आवडे?’
‘मातें रंग रुचे न, पातळ मला हें लागलें वावडें;’
‘वृत्तीनें तव या प्रपंच अपुला व्हावा सुखाचा कसा?’
‘सक्तीनें वरिलें मला, विसर तो होणें न मन्मानसा.’

१५ मे १९४२ ]

## ८० नैराश्य मरणप्रायच

‘एकाकी मी जगतिं फिरतों’ ‘कां तुला मित्र नाहीं?’
‘गेले सारे सुहृद’ ‘न नवे लाभती कां कुणी ही?’
‘नैराश्यानें मन मम पिचे’ ‘छान तूं मुक्त पूर्ण’
‘मुक्ती देतें मरण’ ‘मरणप्राय नैराश्य जाण.’

१६ मे १९४२ ]

## ८१ जशास तसें!

‘हुंडा घेउनि केवढा मम पित्या दारिद्य तूं आणिलें’
‘आतां आपण कर्ज देउं सगळें, होईल हें का भलें?’
‘केलें जाणुनि पाप, निष्कृति जगीं नाहीं कधीं त्याजला;’
‘पुत्राचा विकरा करी श्वशुर त्या जामातृ हा चांगला.’

१६ मे १९४२ ]

## ८२ चितेवर चपाती

‘हवालदिल जाहले सकल लोक कालांत या
प्रशांत दिसशी अशी कुठुनि एकली तूं बया?’
‘तुला मिळत फायदा विकुनि दारुगोळा किती
कशास करुं काळजी? सुख असें खरें संप्रती!’

१७ मे १९४२ ]

## ८३ अन्तर्ज्ञानी पुरुष !

'मार्गे तूं चाललासी हळुं हळुं, जलदी जाय मोटारिनें मी
पाहोनी ओळखीलें तुज, परि असती सारथी बेलगामी
थांबेना तो; तुला मी हुडकित फिरलें, जीव उद्विग्न झाला!'
'अन्तर्ज्ञानी परी हा पुरुष बघ कसा नेमका येथ आला.'

१७ मे १९४२ ]

## ८४ तुझीच शिकवण

'काचा खोवुनि कांठि घेउनि करीं जातेस तूं डोंगरीं
वेगानें चढण्यांत खास करिसी तूं मावळ्यांशीं सरी
पोहायास जलांत तूं उतारसी मासा जणूं भासशी;'
'सारें हें शिकलें तुझ्याकडुनि, तूं भानू तुझा मी शशी.'

१७ मे १९४२ ]

## ८५ ऐतखाऊ

'गालीं गुलाब फुलले तव हे सदाचे
सौंदर्य मार्दव तयांत अतीव साचे
माझे कपोल जणुं खोल तलाव जीर्ण
हे राठ केश तयिं शैवल होय शीर्ण!'
मी ऐतखाउ रस शोषितसें तुझाच
दृश्यें विरुद्ध म्हणुनी अशि उच्च नीच
गालीं गुलाब मम तूंच परंतु भोक्ता
माझे मला न; तव नाहिंच, मी विरक्ता.'

१८ मे १९४२ ]

## ८६ तिथेंच बरा

'जाईचा गजरा मनोहर तुझ्यासाठीं सखे आणिला
घालाया बुचड्यांत सत्वर तुझ्या सोत्कंठ हा जाहला;'
'शोभे तो तुझिया करांत तिथुनी आनंद लाभे मना
जातां तो बुचड्यावरी न दिसणें केंव्हांहि मल्लोचना.'

२० मे १९४२ ]

## ८७ बोलणें पुरे, कार्य हवें

'रस्ते झाडुनि येथची मलिनता नाशा न जाणार ही
या येथील जनांचिया तिळभरी मानव्य ना संग्रहीं
हीं आहेत जनावरें तनु असे त्या मानवाची जरी
आहे मानव मी स्फुरो प्रथम ही जाणीव नारी-नरीं.' १

'गांधींची धरुनी विचारसरणी हा काल मी वागलें
आतां तूं कम्युनिस्ट मित्र मिळशी, भाग्येंच हें साधलें
दोघे आपण एकजीव बनण्या एकत्र आलों असूं
उक्तीचा कृतिचा मिलाफ करण्या भांडूं, फिरूनी हसूं. २

मी लोकप्रिय मास्तरीण बनते कां झाडुवाली अशी?
जो तो प्रश्न विचारि, मी न करितें चर्चा कधीं फारशी
लोकांच्या उपयोगिं नित्य पडतें, नाहीं कधीं तापदा
केला मी दुसरा विवाह न तरी हें रूप हा फायदा.' ३

'चर्चा तूं करिसी न, मी करित ती त्यांच्यासवें सारखी,
हें दुःखांत सदैव कां? जवळचे ते कां सदाचे सुखी?
हा सारा इतिहास सांगुनि जुना, तेवी पुरावा नवा
देऊनी झटणार मी पटविण्या जो मार्ग मातें हवा. ४

श्रद्धेचें विष हें जलाल भिनलें जें रोमरोमांतुनी
ज्ञानें शास्त्रिय आधिभौतिक नव्या संपूर्ण तें नाशुनी
विश्वव्यापक कार्यकारणतती दावून त्या नेहमीं
ते नारी नर तर्कनिष्ठ करणें हें मानिं कर्तव्य मी,' ५

'बोलेल तो करिल काय वदे कुणी हें'
'कार्यें करूनि कम्युनिस्ट दुजांस बाहे'
'कार्यांत दंग चल होउं अतां न बोले
बोलांत रंगति न जे असती भुकेले!' ६

२१ मे १९४२ ]

## ८८ लागे रोज नवी प्रिया

'चंद्राचा लहरी स्वभाव सकलां ठांवा तरी सत्कवी
देती कां उपमा स्त्रियेस विधुची? कां स्त्रीस वाटे हवी?'
'चंद्राचा लहरी स्वभाव पुरुषी आहे पुरा ओतला
लागे रोज नवी प्रिया—परि पहा तो स्त्रीवरी लादला.'

२२ मे १९४२ ]

## ८९ शुश्रूषेचें प्रेम

'आजारी मी जरि सततचा तूं न अव्हेर केला
माझेसाठीं सुखरत तुझा जीव कष्टीं बुडाला'
'शुश्रूषेचें घरिंच मिळतें काम जें आवडीचें
या दृष्टीनें तुजवरि करी प्रेम मी बायकोचें.'

११ मे १९४२ ]

## ९० उत्साहाचें वचन

'गात्रें झालीं शिथिल, नुरला जोम, विश्वास गेला
कां जाईना अजुनि उडुनी वाळला झाडपाला?'
'या बोलांनीं हित न लवही, वाढतो त्रास भारी
उत्साहाचें वचन इतरां, आपणां लाभकारी.'
२३ मे १९४२ ]

## ९१ अति परिचयात्!

'सौंदर्याची खनि म्हणुनि जी गाजते सर्व देशीं
माझी भार्या गमत मजला कां न सौंदर्यराशी?'
'होतें जें जें परिचित गमे सर्व तें मामुलीच
दृष्टी फांके, रसिक म्हणतो, पाहिजे उच्च, उच्च!'
२३ मे १९४२ ]

## ९२ वेड नव्हे निराशा!

'एकाकी फिरशी, उगाच बघशी, वाटेल तें बोलशी
हें कां वेड? तुझें भ्रमिष्टपण कां? हें सोंग कां दाविशी?'
'नाहीं वेड, न सोंग, वा भ्रम न वा, नैराश्य खेळे परी
आयुष्यीं न मजा, न ये मरण वा, हें सर्व कांहीं तरी.'
२४ मे १९४२ ]

## ९३ एवढ्यासाठींच

'तूं आहेस सुरूप, शिक्षित, तुझें कर्तृत्व गाजे किती!
एकाकी परि कैंवि? आमरण वा कौमार्य–भावी रती?'
'तूं पृच्छा करतांच होईन तुझी, होती प्रतिज्ञा मम
ती हो आज पुरी, पुरा मम अतां हा ब्रह्मचर्याश्रम.'
२४ मे १९४२ ]

## ९४ त्वदाश्रय मिळे तरी

'रुचे न, परि वाटतो तुजसि जो नकोसा पुरा
नको वरुं तया कधींच, चल माझिया तूं घरा!
न तो जनक, ती नसे जननि, वागती जे असे;'
'त्वदाश्रय मिळे तरी, त्याजिन ते महारोगसे.'

२४ मे १९४२ ]

## ९५ गरीब किती पोसतील !

'तुवां मधुर भाषणें भुलविलें मह्रा मी भुले
परिस्थिति परि खरी बघुनि मोह तो मावळे
घरांतुनि कशि तुझ्या सुटत काळजी लागली
हंसोनि मम घेसि तूं सकल कल्पनांचा बळी' १

'करूनि घर दान हें धनहि राहुं माळावरी
भिकार बनुनी भरूं उदर मागुनी भाकरी,'
'रुचे मजसि हें, जरी बनसि तूं भिकारी खरा
गरीब किति पोसती मिळुनियां धनाचा झरा' २

२४ मे १९४२ ]

## ९६ माझें मला ये हंसें

'डोकें तापत, पाय भाजत, तनू घामेजली, तूं अशी
कोठें जाशि उन्हांत या कडक तूं, वेगें पुढें धावशी;'
'भावाला समराहुनी परतल्या आणावया जातसें
नाहीं वाहन, धावतें म्हणुन ही, माझें मला ये हंसें.'

२५ मे १९४२ ]

## ९७ थोरांचें मन

'झालों मी दुबळा, तरी तुजमुळें कीर्ती न माझी बुजे'
'झालासी दुबळा, बलद्वय तुझें, तूं एक मी हो दुजें'
'प्रत्युत्पन्नमतित्व दावि विनयी वृत्ती तुझी साजणी'
'मोठा जो हृदयें तयास गमती सारेच मोठे गुणी.'
२७ मे १९४२ ]

## ९८ विकच्छ बनलें अतां

'किकच्छ बनुनी तुवा रमविलें विलासी मना'
'विलास–ललना विकच्छ रुचते तुला सजना'
'विलास–ललना रुचे तशि न धर्मदारा परी'
'विकच्छ बनलें अतां करि विलास धर्मं घरीं.'
२७ मे १९४२ ]

## ९९ ही गोष्ट आहे खरी !

'विद्वत्तेंत, सुरूपतेंत समता, श्रीमंत आह्मों सम
शक्तींनेंहि समान, कीर्तिंत असे तुल्यत्व त्याचें मम
त्याचा स्नेह नवा, जुना मम जरी, त्वत्प्रेम त्याचेवरी!'
'तो आकर्षक वाटतो तुजहुनी ही गोष्ट आहे खरी!'
२८ मे १९४२ ]

## १०० स्वार्थप्रेम !

'केला खून तिचा तुझ्यास्तव गडे, श्रीमंत झालों किती'
'श्रीमंती लखलाभ ती तुज असो, माझी मला ही स्थिति!'
'त्वत्प्रेमास्तव कृष्ण कृत्य करि तें, आतां करूं हें दुजें!'
'स्वार्थ–प्रेम अतीव कृष्णतम कीं कृत्यें करूं तें धजे!'
२८ मे १९४२ ]

## १०१ म्हणूनच तर !

'तूं स्त्री नाजुक नार तूं, न टिकसी खाईंत या दारुण
चित्ताची सुकुमार तेंवि तनुची, तूं सोडि हें धोरण;'
'पोलादी तनु चित्त खास पुरुषी, त्यानेंच हा भारत
नांदे वैभव-पर्वतीं सततचा, आदर्श हा अद्भुत!'

२८ मे १९४२ ]

## १०२ तरीही स्त्रीच आळशी

'अजून घरचें सरे न तव काम तूं चेंगट
घड्याळ बघ, हें तुला सतत वाटतें संकट;'
'मजा करुनि मोकळा पुरुष, आडके स्त्री परी
मुलांत मुरुनीहि मी ठरत आळशी त्वत्करीं !'

३१ मे १९४२ ]

## १०३ रस्सीखेंच

'सुट्टीचा दिन आजचा, तुजसवें हा सर्व जावा दिन,
मोठी आस मला, पुरे न कधिं ती, राहे भुकेली पण;'
'माझी हो चिरफाड, पाहि इकडे तूं ओढिसी एकटी
मित्रांचा परिवार खेंचि तिकडे, मी हिंपुटी शेवटीं!'

३१ मे १९४२ ]

## १०४ धंदेवाईक !

'धर्में तूं यवनी असूनि दिससी कन्या जणूं हिंदुची'
'धंदेवाइक मी, गिऱ्हाइक म्हणे ती तीच माझी रुची
व्यापाऱ्या अपुली न आवड, तशी वारांगनांना नसे,
गांधीवादि विकीतसे गिरणीचे गठ्ठे दुकानीं कसे?'

३१ मे १९४२ ]

## १०५ हास्याचे तुषार !

‘चाले नित्य तुझी मुलांसह मजा हास्यें विनोदें किती
वाऱ्याला मम राहती न पळही, तेथून तीं बोलतीं.’
‘जिव्हाग्रीं न विनोद, हास्य न मुखीं तत्वज्ञ तूं गंभिर,
हास्याचे उडवी तुषार परि मी येतांच त्यांचेवर.’

३१ मे १९४२ ]

## १०६ होतां स्त्री सहकारिणी

‘बाळाची अमुच्या अम्हां लव निगा घेतां न येते जरी
त्या निर्माण तरी कशास करितों हा प्रश्न माझे शिरीं
धिंगाणा बघ घालितों सततचा; आम्ही घडीच्या सुखें
त्या देतो हत जन्म, जन्मभर त्या कल्याण हो पारखें !’ १

‘कां चिंता करिसी उगाच तुझिया डोक्यांतले हे किडे
खाऊनी तुज टाकतील, सुटणें हा प्रश्न नाहीं गडे;
मारूं आपण ये मजा परिणती होणार ती होउं दे
ह्या सार्वत्रिक संकटा न पुरती कोणीहि एकेकटे. २

एकाकी न करूं शके; न उठती सारे मिळूनी कधीं;
कोडें हें सुटणार कां? मरुनि वा जाऊं निराशेमधीं?’
‘ऐकोनी तव बोल हे न उरते सीमा प्रमोदा मम
होतां स्त्री सहकारिणी न अमुचे होतील माती श्रम.’ ३

२ जून १९४२ ]

## १०७ प्रेमार्थी

'तीं चित्रें बघ दोन, तो पति पुढें, ये पत्नि ती मागुनी
हीं दोघें परि चाललीं चिकटुनी, हीं आजचीं, तीं जुनीं.'
'आहे हें तिसरें, कसें विसरशी? तू कोण? मी कोण रे?'
'तूं मी नाहिं विवाह–मूढ दुबळे, प्रेमार्थि आहों खरे!'

२ जून १९४२ ]

## १०८ चित्रकारामुळें चित्राला महत्व

'पत्नीला जन मानिती पतिमुळें हा न्याय विश्वांतरीं
पत्नी थोर पराक्रमी कधिं कधीं विख्यात कांता करी;
तें सद्भाग्य मला, सखे तुजमुळे मातें प्रसिद्धी मिळे'
'चित्राला महती स्वतंत्र न परी ती चित्रकारामुळें!'

२ जून १९४२ ]

## १०९ स्फूर्ति!

'त्याच्याशीं मन मोकळें करिसी तूं संकोच कां ह्याजशीं?
नीती मूर्तिमती सुहृद्वय तरी ही भिन्नता कां अशी?'
'प्रश्ना उत्तर, यास कारण नसे, माझी असे स्फूर्ति ती
संकोचे मन येथ, तेथ सहजीं धावे मनाची गती.'

२ जून १९४२ ]

## ११० तरि कशास व्हावा टिळा?

'कपाळ तव पांढरें बघुन फार मी घाबरे
बघून परि पाठिशीं पति; हंसू न हें आवरे;'
'सर्वेचि फिरतो पती तरि कशास व्हावा टिळा?
टिळ्यावरुन तर्क जो करि गमे मला तो खुळा.'

३ जून १९४२ ]

## १११ प्रेममूल्य !

'माझ्याशीं करुं पाहशी लगट तूं, मातेंहि ती आवडे
होकारा परि माझिया तुज वडें हें मूल्य देणें पडे;
हें चालेल न धूम्रपान मजला, आहे तुझी संमती?'
'लाभे हें तव ओष्टपान, न तरी ही धूम्रपानीं रती.'

३ जून १९४२ ]

## ११२ पुष्पें प्रफुल्ल मज तीं

'कारागृहांतुनि घरीं सुखरूप येशी
त्वत्स्वागतार्थ जिलबी करण्या असोशी
केली परी बिघडली मनिं दुःख दाटे,'
'पुष्पें प्रफुल्ल मज तीं तुज जे सराटे.'

३ जून १९४२ ]

## ११३ वनिता असे माउली

'थकून घरिं येइ मी, असिसि दंग तूं क्रीडनीं
तुला उठवितां तशांतुनि विषाद वाटे मनीं;'
'तुला रिझविणें मला प्रिय अतीव खेळाहुनी
करीं न कधिं आपुले उरिंच हाल संकोचुनी १
विवाह तुजशी करीं तव अखंड सेवार्थ मी
तरी न मन मोकळें करिसि राहसी संयमीं!'
'करूं बघसि बाळ हें, बनुनि माय माझी भली,'
'अशक्त पतिची खरी सति सशक्त हो माउली.' २

५ जून १९४२ ]

## ११४ टोमणा

'सर्पा दुष्ट, मनुष्य सुष्ट म्हणणें सत्या असे लांछन
तो चावे न उगा, उगा वधितसूं त्याला अम्ही सज्जन;'
'शोभे हें वच तीस जी सततची कांतास संतापवी'
'सर्प, स्त्री, म्हणती समान पुरुषी अन्यायवादी कवी!'

५ जून १९४२ ]

## ११५ कार्याला कोण टिकतो?

'कार्याची तुज हौस फार म्हणुनी मी माळ घालीं तुला
कार्यों द्रव्य मिळून ये यश करीं, सिद्धांत मीं मांडिला
श्रीमंती परि पोचतांच घरि तूं सौख्यास लाचावसी
कार्य–व्यापृत तेधवा परि, अतां होशी पुरा आळशी.' १
'श्रीमंती, रूपवती, भार्या मिळतां न कोण बावरतो?
कार्याला टिकतो तो, नर जो अन्नाविना फुका मरतो!' २

५ जून १९४२ ]

## ११६ नाथा मीं चुकलें—

'कांते कोमल तूं तुझ्यावर कसे वाग्बाण सोडीन मी?
अर्थाचा करुनी अनर्थ सखये होऊं नको तूं श्रमी.'
'केव्हां बोचक बोल बोलसि न तूं; पूर्वस्मृती ताप दे
वाक्यें हींच–अनर्थ गर्भित परी, सावत्र आई वदे;' १
'ती चांडाळिण बोलली हृदयिं तें गेलें तुझ्या कोरलें
तें सारें पटलें, परंतु रडणें हें कां तुला शोभलें?
आलें पाप मनीं तुझ्या, मम मनीं तें शल्यसें बोचलें,'
'नाथा मी चुकलें, फिरून पदरीं घे मी जरी बाटलें.' १

५ जून १९४२ ]

## ११७ मर्मभेद !

'मारी सांजसकाळ निर्दयपणें कांतेस निष्कारण
पाही निष्ठुर तोच हा करि तिचें आतां असें वर्णन !'
' अज्ञानांत सदैव पत्निस कुणी डांबून लोकां परी
सांगे 'ही आमुची सुशिक्षित अती' ती सत्य कां वैखरी ?

५ जून १९४२ ]

## ११८ निवड चुकली म्हणून

'चंद्राचे ग्रहणीं विषण्ण मुख का ? विश्रांति कां विभ्रमा ?
वाटे 'इंदुमुखी'स भीति अपणां येणार ही काळिमा ?'
'तूं शास्त्रज्ञ तरी जपांत रमसी चंद्राचिये मोचना
लावी लांछन धर्म-वृत्ति तव ही मन्नाथसंशोधना. !'

६ जून १९४२ ]

## विभाग दुसरा

# रशिया व लोकक्रांति

### १ जागृत स्फुलिंग

तूं क्षुद्र आज, तरि उच्च खरा उद्यांचा
तो रामकृष्ण, शिव तूंच समर्थ साचा
दावानला निपजवी ठिणगी लहान
ब्रह्मत्व निश्चित असे सकलांस जाण.

२३ डिसेंबर १९२८]

### २ पिळलेला पिळणारा

अभंग

जुनें झालें जरी जीर्ण । त्याजा त्याचा अभिमान
प्राण जातां जळो माया । नको तेथ दया माया.
जेणें गुलामी पैदास । त्याचा करा पुरा नाश
सर्वां स्वातंत्र्याचा लाभ । आम्हां हाच एक लोभ १

स्वतंत्र या विशेषणें । स्वीय देशा भूषविणें
ध्येय-पूर्णत्व हें नोहे । बव्हंशीं तें दूर राहे
स्वातंत्र्याचा लाभ कोणा । करि मित्र विचारणा
नको विशेषणीं मोह । जरी विशेष्यीं तद्द्रोह २

स्वातंत्र्याचा सर्वांहुनीं । ध्यास केला आंग्ल जनीं
देशीं त्यांच्या जाई पाहीं । उक्ती तैशी कृती नाहीं
पारतंत्र्या ठाईं ठाईं । पाहुनीया वीट येई
नको स्वातंत्र्य आंग्लांचें । बोल सर्वांचे स्फूर्तीचे ३

बहिरंग–दर्पणांत । दिसे अंतरंगी ज्योत
करी अन्या परतंत्र । कैसा राहे तो स्वतंत्र?
स्वतंत्र तो भयहीन । नुरे चिंतेचें त्या भान.
आंग्ल सदा चिंता करी । शत्रूची ये कधीं स्वारी ४

गेह पाहतां आंग्लांचें। दृश्य दिसें तेथें कैचें!
अल्पा हातीं सत्ता मत्ता। असंख्यांचे माथीं लत्ता
हाल काढिती अनेक। मूठभरां झोकनोक
बंड करीतां बेकार। भारताचा त्या आधार ५

होता भारत स्वतंत्र। आंग्लनाकीं धरा सूत्र
तत्व कळूनी चूकलें। तपशीलीं अडथळे
कोणी म्हणे, 'आम्ही हिंदू। हिंदूंच्याच हिता वंदू'
भारताचें पाकस्थान। करूं पाहे मुसलमान ६

म्हणे कोणी, आंग्ल जना। शुद्ध सुचोनी वासना
भारताचे सत्ता हातीं। क्रमें देतील निश्चितीं
सान थोर भाऊ भाऊ। म्हणे कोणी, एक होऊं
ऐक्य अभेद्य साधूनी। देऊं आंग्ला घालवूनी ७

तरुणांनो सत्य ऐका। गोड शब्दें भुलूं नका
ऐक्य सर्वांचें साधेना। जगीं कोठें यत्नें नाना
पिळलेला पिळणारा। जगीं द्वैताचा पसारा.
एकमेकां सिद्ध खाया। ऐक्य त्यांचें शुद्ध माया ८

७ सप्टेंबर १९३८]

## ३ रशिया

श्वासोच्छ्वाससमान जेथ गमतो उद्योग साऱ्या जनां
उद्योगीच, न अन्य, पात्र ठरतो जेथें जगीं जीवना
जेथें राबविता कुणी न दिसतो शोधोनिही पाहतां
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता १

'सत्ताधीश समाजवाद बनला कीं ती गुलामी प्रजा
आनंदें हंसली, सुखांत रुळली, शास्ता नुरे कीं दुजा
झालें जागृत, सुप्त जें अजवरी मानव्य त्याचें अतां
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता २

जो साऱ्या जगतांत देश पुरता मागासलेला दिसे
विद्या-शास्त्र-कलादिकीं बहरला अभ्यास आतां हंसे
बुद्धीला उरलें न बंधन दिसे पिंगा सदा घालितां
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ३

जेथें स्त्रीपुरुषा समस्त विषयीं स्वातंत्र्य लाभे पुरें
स्त्रीचें दास्य सरे, तशीच पुरुषी उद्दामता संहरे
दोघे येति समान भूमिवरती स्थापावया उच्चता
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ४

बुद्धीचा, तनुचा विरोध सरला लाहे समान स्थिती
सामर्थ्यें नटली दिसे तनु तशी नारीनरांची मती
जो तो कार्य पडेल तें करितसे नाहीं कुठें न्यूनता
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ५

व्यक्तीचें हित साधतां न नियमें सर्वांस होतें सुख
सर्वांचे हितसाधनीं परि घडे कल्याण वैयक्तिक
जेथें व्यक्ति समाजकारणिं दिसे रात्रंदिसा राबतां
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ६

साना थोर पिळी, समर्थ दुबळ्या, द्रव्यें विहीना धनी
चाले संतत वर्गविग्रह असा फारां दिसांपासुनि
वर्गांचा परि संपला कलह तो वर्गैक्य घे पूर्णता
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ७

चाले सृष्टिविकास नित्य, निपजे निश्चेतनीं चेतना
क्रान्तीचा क्षण तो अपूर्व मनुजा ज्या जन्म लाहे क्षणा!
जो सांगे 'नर निर्मि संस्कृति जगीं सृष्टीसवें झुंजतां'
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ८

अज्ञानोदरिं जन्मल्या बुरसल्या त्या देवधर्मा दिवा
शास्त्राचा शिलगावुनी प्रखरसा लागे परीक्षावया
तों सारें दिसतां असत्य सजला त्या नाशण्या सर्वथा
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता ९

अध्यात्मा उखडी, नियोजि मनुजा देवाचिया आसनीं
धर्मध्वंसन साधुनी नियमिता जो अर्थशास्त्रा गणी
प्रत्यक्षाश्रित शास्त्र सांगत तसा क्रांतीस जो साधिता
आशास्थान जगांत एक रशिया तो होय या भारता १०

संस्कृतीचा नव्या भव्य । यशस्वी जो प्रचारक
रशिया भारता एक । विश्वासू मार्गदर्शक ११

२१ व २२ मार्च १९४० ]

## ४ जीर्ण तें जाळा

गाभा पुरातन काळींचा काढून । घ्यावा, द्या फेकून फोलकट;
आम्रफलरस चाखोनि झालिया । कुठें साल कोया ठेवितसां !
मढ्याला जतन करूं पाहे कोणी । तरी त्यातें ह्याणी शाहाणा जो
रशियानें जीर्ण जाळोनि टाकिलें । जगीं त्या लाभलें अग्रस्थान
२४ फेब्रुवारी १९४१ ]

## ५ मजुराचा स्वामी

याचना न करी कधीं कोणापाशीं । राहोनी उपाशी अमर हो
उपाशी राहोनी भरी मिशीं पीळ । त्याच्या सदा खीळ अपमाना
उपाशी असतां ताठ ज्याची मान । त्याचे पायीं लीन होई जग
उपाशी पोटीं जो तंडत राहीला । मजूर तो झाला स्वामी तेथें
२४ फेब्रुवारी १९४१ ]

## ६ समाजाच्या दोन व्याधी

दुर्धर या दोन व्याधी समाजासी । आधाशी–उपाशी नामें त्यांची
आधाशी अजीर्णासाठीं समाजाला । मृत्यूचे पंथाला लाविताती
उपाशी जे जन पोटासाठीं त्यांचे । घाव समाजाचे मर्मस्थानीं
व्याधी निवाराया सिद्ध कम्युनिस्ट । त्यांचे यशीं पुष्ट सर्वजण
६ मार्च १९४१ ]

## ७ क्रांतीचा शुभ क्षण

ज्याची मार्गप्रतीक्षा अजवरि करुनी श्रांत झालास पूर्ण
तो हा आला मूहूर्त प्रतिदिन जवळी पाहि ही पाहि खूण !
शत्रूची सर्व ठायीं सतत उडतसे रोज ही धूळधाण
हो सिध्द स्वागता तूं कमर कसुनि कीं तो न जावो निघून !
८ मार्च १९४१ ]

## ८ क्रांतिदर्शन आम्हांला कधीं ?

अमावास्येची ती सरुनि रजनी सूर्य उगवे
दिशा साऱ्या झाल्या मुदित जग हें भारुन नवें !
अम्हां नाहीं ऐसा अनुभव परस्वाधिन जनां
कधीं तें क्रांतीचें अभिनव दिसे रूप नयनां ?

१९ एप्रिल १९४१ ]

## ९ क्रांतीचें कार्य

कण लोहाचे जसे विखुरले करितो चुंबक एक
एकत्र तसे क्रांती आणी पीडित सारे लोक.

२० एप्रिल १९४१ ]

## १० परंपरागत अन्यायाचा नाश

धर्माधिष्ठित समाज अर्थाधिष्ठित करणें पूर्ण
क्रांतीनें या परंपरागत हो अन्याय विशीर्ण.

२० एप्रिल १९४१ ]

## ११ क्रांतीच्या दर्शनासाठीं

मित्रांनीं मज सोडलें न उरले कोणी सगेसोयरे
नाहीं द्रव्य, न गेह, शेत न मला, कीर्ती न माझी उरे
ना शारीरिक, बुद्धिचें बल मला रोगी सदाचा पुरा
क्रांतीच्या परि दर्शनार्थ जगणें हा लागला घोसरा.

२० एप्रिल १९४१ ]

## १२ कळून वळत नाहीं

जगीं सत्ताधारी दलित जनता होइल तरी
समाजाचें साऱ्या हित परम ती निश्चित करी
वरिष्ठांची सत्ता अहितकर सामान्य जनते
जगा ये केव्हांचा अनुभव तरी तें न शिकतें!

२१ एप्रिल १९४१ ]

## १३ स्वातंत्र्यें नटणार भारत

रोगांनीं पिडलों, समस्त थकलीं गात्रें, न शक्ती उरे
उत्साहें त्यजिलें, कधीं मरण ये ऐसें मला जाहलें!
तों बोले कुणि कीं ' जगा'त जलदी क्रांती घडोनी महा
स्वातंत्र्यें नटणार भारत, उगा तो सोहळा तूं पहा!'

२६ मार्च १९४२ ]

## १४ सामर्थ्याचें गुपित

दरिद्र्यांचा आतां खचित उदया भाग्य रवि ये
निरिच्छातत्वें कीं रहित बनले तेंवि विनयें
तयां सामर्थ्याचें गुपित कळलें संघटितशा
धन्यांशीं झुंजोनी मिळवितिल निःशंकित यशा.

२६ मार्च १९४२ ]

## १५ नवी लोकसंस्कृति

स्वातंत्र्यांत असंख्य कष्ट करिते घेतील सत्ता करीं
ते दृष्टि स्थिर राखितील जनतावस्त्रान्नगेहांवरी
व्यक्तीचें सुख साधणार सहजीं होतां समस्तां सुख
पाहूं आपण लोक-संस्कृति नवी मानव्य-संरक्षक.

३ एप्रिल १९४२ ]

## १६ क्रांतीच्या मागून अहिंसा !

ज्याच्या राहती हातीं । धनोत्पादन–साधनें
तत्सत्ता त्यावरी चाले । जो कष्टे निर्मितो धनें १

कष्टतो तो फुका कष्टे । धनी पुष्ट बने अती !
झगडा चालतो त्यांचा । त्याला न उरते मिति. २

झगडा चालुनी जेव्हां । सर्व उत्पत्तिसाधनें
होतीं सर्व समाजाचीं । मग सौख्या नसे उणें ३

कष्टतो तो फळा भोगी । कष्टहीनां उपोषण
नीती ही झालिया मान्य । कष्टती सगळेजण ४

कष्टता सगळे न्यून । नाहीं कांहीं कुणासही
मजूर न धनी वा न । कुणी, न उरते दुही ५

स्पर्धेला न उरे जागा । समृद्धी फुलली दिसे
राहीं हिंसेस ना वाव । अहिंसा एकली वसे ६

अहिंसा येतसे ऐशी । क्रांतीच्या मागुनी जगीं
अहिंसा आज ये केवी । सुधा कां प्राप्य पन्नगीं ! ७

१६ एप्रिल १९४२ ]

## १७ शत्रूचे शस्त्रधारी

राष्ट्राला व्यक्तिला वा स्तिमित करि कसा, काळ ये क्रांतिकारी
जेव्हां ते नेहमींचे अनुभव ठरती शत्रूचे शस्त्रधारी !
शस्त्रें शास्त्रें जुनीं जो त्यजुनि नव करीं घेइ सामर्थ्यशाली
होऊनी तो यशस्वी, अभिनव जगता हो जणूं अंशुमाली.

१७ एप्रिल १९४२ ]

### १८ सर्वगत क्रांती

स्त्रीस्वातंत्र्य न पूर्ण हो जरि नसे पाया तया आर्थिक,
पाया आर्थिक साध्य देइ करुनी क्रांतीच सार्वत्रिक;
क्रांती सर्वगता न हो चिकटुनी प्राचीन काळाप्रती
सोडा जीर्ण जुनाट सत्वर तरी लाभे खरी सद्गति.

१९ एप्रिल १९४२ ]

### १९ गाती अतां तद्गुणा!

फॅसिस्टांस पुरून एक रशिया आहे उभा राहिला
सर्वा चारियले खडे हिटलरें येथें परी थांबला
झोंबी चालत आज आठ महिने कोणी न जिंकी कुणा
प्रारंभीं म्हणती पुचाट रशिया, गाती अतां तद्गुणां!

२२ एप्रिल १९४२ ]

### २० आतां अजिंक्य ठरला

झाली एक पिढी अफाट रशिया होता तदा बावळा
त्याचा झार मदांध, दीन जनता, राष्ट्रा नसे त्या कळा
सत्ता तेथिल कामगारकरिं ये कीं सर्व तें पालटे
आतां तो ठरला अजिंक्य; म्हणणें त्याचें समस्तां पटे.

२२ एप्रिल १९४२ ]

### २१ क्रांतींत सद्गति

आधीं आंबट, गोड मागुन बने आंबा, तसें क्रांतिचें
प्रारंभीं भलतें स्वरूप दिसतें, मागून सर्वा रुचे!
अज्ञानी जन वर्तमान बघती, क्रांतीस धिक्कारिती
ज्ञानी आदरितो भविष्य, दिसते क्रांतींत त्या सद्गति.

२३ एप्रिल १९४२ ]

## २२ संकोच

सन्मानें मज रेडियोनिकट तो नेऊनियां बैसवी
मातें तें न कळे मुळीं, संवय कीं तें ऐकण्याची हवी!
तेवी क्रांतिविवेचनीं नवशिका होतो जरा मूढधी
त्याला तें कळुं लागतां म्हणतसे 'ऐकेन सारें कधीं?'
२३ एप्रिल १९४२ ]

## २३ विकासाचें माप

सृष्टीशीं मानवाचा अविरत झगडा चालतो, त्यांत त्याला
सिद्धी जी हो यशाची त्वरित विदित ती यंत्ररूपें जगाला
मानव्याचें कळाया विकसन जगता माप विश्वास्य यंत्र
तन्नाशा सिद्ध जो त्या अधम अरि गणा संस्कृतीचा, न मित्र.
२४ एप्रिल १९४२ ]

## २४ यंत्रापोटीं जनतासंस्कृति

यंत्राची स्वामिनी त्या अगणित जनता होय कीं सुप्रभात
सौख्याची हो समस्तां, तळमळ निवते, नाहिं आनंद मात,
उत्साहा पूर येई, अजवरि निजल्या शक्तितें सद्गुणातें
लाभोनी वाव लोकीं अभिनव जनता-संस्कृती जन्म घेते.
२४ एप्रिल १९४२ ]

## २५ क्रांतीची देवता

आतां स्त्री रशियांतली, पुरुष वा तेथील कारागिरी
हो आदर्श; समाजपद्धति तशी वाटे समस्तां बरी
शक्ती आणि यशस्विता मिळवितां तात्काळ ये मान्यता
तल्लाभा अनुकूल लागत परी ती क्रांतिची देवता.
२५ एप्रिल १९४२ ]

## २६ क्रांती म्हणोनी हवी

गेली मृत्युमुखांत ती, तुजवरी जोखीम आली महा
बाळे तीन लहान, काय करणें त्याचें, असें प्रश्न हा!
गेली संघटना जुनी, न उदया आली अजूनी नवी
त्या योगें अनिवार्य या अडचणी, क्रांती म्हणोनी हवी.

२५ एप्रिल १९४२]

## २७ आजचे तपस्वी

पूर्वीचे मित्र, आतां परिचय पुरता होउनी कांत कांता,
जोडीनें लोक-कार्यें करित अनुभवूं स्नेह उत्साहदाता
लेनीनें क्रूप्सकाया सह सतत जसें कार्य केलें यशस्वी
त्याचें थोडें तरी ये अनुकरण करूं, आजचे ते तपस्वी.

२७ एप्रिल १९४२]

## २८ क्रांतीनेंच सुटका

झालें लग्न, खरोखरीच सुटलों मी आणि माता पिता
चिंता वाटतसे किती तरि तिघां आम्हांस ती हो व्यथा;
'आहे हा मुलगा' कळे त्वरित कीं बाबा मला घेऊनी
जाती, येइ नकार कीं हिरमुसे आम्ही तिघे त्या दिनीं. १

आहे तें 'मुलि पाहणें' तरि कसें? छीथूच ती सांप्रति
बाजारीं विकण्यास मालक गुरें नेतो दशा तीच ती!
आम्हांला सजवून ने जनक, ते वाटेल तें पूसती
आम्ही वाईट चांगल्या ठरतसे एक्या घटीं निश्चिती. २

आम्हांला मत ना, विचार न, नसूं माणूस आम्ही कुणी
गाईंना पद चार, दोनच अम्हां, भिन्नत्व ना याहुनी
क्रांती क्रांति म्हणून कोण म्हणती, होणार ती केधवां!
स्त्रीचा जन्म नको मला फिरुन हा, स्त्री काळिमा मानवा. ३

४ मे १९४२ ]

## २९ स्वीकारा अभंग क्रांतिध्येय

अस्पृश्याचें घर । घाणीचें आगर
दुर्गंधी अपार । नांदे तेथें १

नांदे तेथें धर्म । अधम परम
त्यावरी निःसीम । प्रेम त्याचें २

प्रेम त्याचें भारी । भिक्षा–चोरीवरी
कष्टोनी उदरीं । अन्न नाहीं ३

अन्न नाहीं त्यास । पारखा विद्येस
आणि मानव्यास । नोळखतो ४

नोळखतो नीट । चांगलें वाईट
नरदेहीं थाट । पशुत्वाचा ५

पशुत्वाचा फेर । पाय दोन चार
पूर्णत्वें लाचार । मानव हा ६

मानव हा कैचा ? । केवळ नांवाचा
तेथें मानव्याचा । गंध नाहीं ७

गंध नाहीं त्याला । दुर्गंध तो त्याला
सुगंध यायाला । मार्ग नोहे ! ८

मार्ग आहे एक । क्रांतीला द्या हांक
क्रांती येतां खाक । दूषणीय ९

दूषणीय जाई । क्रांती येतां गेहीं
सुधारणा नाहीं । समर्थ त्या १०

समर्थ त्या केवी । सुधारणा व्हावी
पायांत दुर्दैवी । समाज हा ११

समाज हा नवा । पायांतून व्हावा
तरीच हा गोवा । सुटायाचा १२

सुटायाचा मार्ग । क्रांतीचा सुभग
स्वीकारा अभग । क्रांतिध्येय. १३

५ मे १९४२ ]

## ३० क्रांती होतां–

क्रांती होतां तटाटा तुटतिल नसतीं बंधनें मानवाचीं,
जे जाती–जन्म–धर्मीं जखडुनि पिचले त्या तदा कोण जाची!
कोणी कोणां न तेव्हां रखडविल, गमे प्रेम कामांत गाढ
व्यक्ती जाती समाजीं रमुनि अनुदिनीं होत मानव्य-वाढ.

५ मे १९४२ ]

## ३१ अमूलाग्र नवी समाजरचना

लोकां संघटना सशस्त्र शिकवा, चाले न त्या भावना
पोटाची न विवंचना उरतसे ऐशी करा योजना;
नाहीं रूढ समाजपद्धति पुरी तें कार्य साधावया
आमूलाग्र नवी समाज–रचना कार्या हवी आज या.

१० मे १९४२ ]

## ३२ क्रांती कोण करी ?

क्रांती कोण करी ? समाज न करी पर्वा जयाची मुळी;
क्रांती कोण करी ? समाज बुडवी ज्याला नुरे सावली;
क्राती कोण करी ? समाज उरवी आशा न ज्याचे घरा
क्राती तो करुनी स्वतांसह दुजा उद्धारणारा खरा.

११ मे १९४२ ]

## ३३ क्रांतीचे विरोधक

कर्तृत्वा भरपूर वाव मिळतो ज्याच्या समाजांत या
तो यत्नें हरएक सिद्ध असतो क्रांतीस मारावया
त्या प्राचीन न पूर्ण वाटत कधीं टाकाउ नाशाउ वा
कांहीं कांहिं सुधारणा करुनि त्या तो काळ वाटे हवा.

११ मे १९४२ ]

## ३४ क्रांतीचा विरोधक

हा पाहे नरवीर नित्य जपतां क्रांती, तिचा हो अरी
कां ? लाभे भरपूर त्यास मिळण्या कीं क्रांति सारी दुरी !
मानी वेडच आपुल्या प्रथमच्या त्या भाषणां लेखना
झाला क्रांतिविरोधि पूर्ण, बडवी तो क्रांतिकारी जनां !

११ मे १९४२ ]

## ३५ क्रांतिकारक लढत

समुद्रीं आकाशीं धरणिवर चाले लढत ही
तशी चाले रात्रीं दिवसभर साऱ्या ऋतुंतही
न सीमा नाशाला मनुज मरती देश बुडती
जगाच्या क्रांतीनें लढत असली होय पुरती.

११ मे १९४२ ]

## ३६ क्रांतीची घडामोड

चंद्राची कोर होते प्रतिदिन कमती मावळे पूर्ण अंतीं
लाभोनी त्यांस कांती फिरुनि मिळवितो पौर्णिमेची प्रशस्ती;
नाशा जातें पुराणें हळुहळु पुढती क्रांति चालूनि येते
क्रांतींतूनी निघे तें जग अभिनव जें हांसतें, हांसवीतें.

१२ मे १९४२ ]

## ३७ क्रांतीनें जनता सुखी

तूं श्रीमंत अफाट, मी पण तशी, द्रव्या नसे न्यूनता
ये तें आपण सत्कृतींत उडवूं, आहे तुझी मान्यता!
क्रांतीनें जनता सुखी बनतसे सिद्धांत हा मान्य ना!
क्रांतीला करुं साह्य बोल अपुले होवोत ते फोल ना.

१५ मे १९४२ ]

## ३८ क्रांतीचें फल

समाजाचा झाला स्मृतिगत जुना जीवनरस
नवीं रोपें नेत्रां दिसतिं निघतां तेथ सकस
हवा पाणी त्यातें तरुण बल याया पुरविती
तयांच्या यत्नांचें मधुर फल ती क्रांति बघ ती. १

विनाशा गेले ते विविध जन होते प्रबल जे
अतां सत्ता घ्याया श्रम करित तो केवल धजे
तयाचे कल्याणीं सकल जनकल्याण भरलें
श्रमा सत्ता देणें सुकृत करि हें क्रांति पहिलें. २

विनायत्नें भोगीं विहरति समाजीं सधन जे
तया क्रांती सत्ता–रहित करण्या तत्क्षणिं सजे
अतां सत्ता येते श्रमिककरिं, होतें जग नवें
श्रमा आरामाचें मिळत सहचारित्व बरवें. ३

अतां लोकीं होते उदित जनता–संस्कृति नवी
नवी भूषा अंगीं जग सकल सर्वत्र मिरवी
प्रयोगा–शोधांचें अमित फुटलें पेंवच खरें
घडे मानव्याची प्रगति नसतें बंधन नुरे. ४

नरांना नारींना सदन–वसनें अन्न पुरतें
कवाडें ज्ञानाचीं सतत उघडीं सर्व जनते
विकासीं व्यक्तीच्या अडचण न येतां तिळभरी
समाजाची साऱ्या प्रगति घडते निश्चित खरी. ५

१६ मे १९४२ ]

## ३९ चारदोघांची चैन

असंख्य जन कष्टुनी धन अपार हे निर्मिती
न मालक परंतु ते, न धन भोग वा त्यांप्रती
धनी असति चार दो नृवर, भोग त्यां उद्यम
विशंक म्हणती बळी बनुनि, 'कोण सत्ता श्रम!'

१७ मे १९४२ ]

## ४० क्रांतीची शिकवणूक

शरीर झिजवी, असे जनक एकली जी धना
असंख्य जनता दिसे उघडि नागडी लोचना!
स्वतांच धनि ती बनो शिकविते अम्हा क्रांति हें
अजाण जनतेस तें स्वहितकारिही ना सहे. १

जनास कटु तत्व हें शिकविणें सदा कष्टुनी
तुम्ही तरुण जाणते, सतत वागवा हें मनीं!
तुम्हांस जनता, तिला तुम्हिच तेवि सौख्यप्रद
हितार्थ अपुल्याच हा उतरवा धनाचा मद. २

१७ मे १९४२ ]

## ४१ भय संपलें कीं

उपाशी तापाशी विविध जन अन्नार्थ जमले
वृथा का भुंकोनी अटविशि असें रक्त अपुलें
तयांना हें श्वाना! गय भय न कांहींच उरलें
तुझ्या स्वामीला हे चिरुनि बघ खायास सजले.

२० मे १९४२ ]

## ४२ लढाल तर जगाल

कोण कुठला हा, भोग परी नाना
मालकाला, ना अन्न पाणि दीना!
बलिष्ठांशीं व्हा झुंजण्या बलिष्ठ
न तरि कष्ट, पुढें भ्रष्ट, पुढें नष्ट.

२२ मे १९४२ ]

## ४२ तरी कां पटत नाहीं?

कितीक जन घागरी कितिक या नळाभोंवती
करीत जप बैसती, जल तयास लाभे किती?
परिस्थिति परी न ही धनिक थोर लोकांप्रती
तरी गरिब मानिती न हितकारि कां क्रांति ती!

३१ मे १९४२ ]

## ४४ मोठा अन्याय

'पुरुष सगळे मायावी हे तुम्ही, हित आपुलें
बघुनि करितां सारीं कार्ये, रहस्य अतां कळे!
शिकुनि ललना हो द्रव्याची झरी घरच्या घरीं
तरि न तिजला ये केव्हांही घरीं पतिची सरी.' १

'पुरुष ठरला नेता न्यायें समाजिं इथें तिथें
म्हणुनि ललना त्या मान्यत्वा चढ न कधीं इथें;
अनय पुरता नाशाचा हा असे पथ निश्चित
अनुसरुनि त्या क्रांतीपंथा करा अपुलें हित.' २

३ जून १९४२]

## ४५ गुलामी मन

'क्रांतीची जरि लालसा तरि वरी वृत्तींत तूं भिन्नता
माझ्याशीं समता धरूनी करणें कामें अतां तूं स्वतां'
'हे सारें पटतें परी अजवरी नांदे गुलामी मनीं
तेणें क्रांति गमे जणूं भटकणें अज्ञान रानीं वनीं.'

३ जून १९४२]

# विभाग तिसरा

# समाजदृश्यें

## १ वीरांची खाण

काया गौर, नितांत शुभ्र वसनें, कंठांत मुक्तावली
हस्तीं मौक्तिक कंकणद्वय, कुडीं मुक्ता-कृता घातलीं,
भाळीं उच्च विशाल कुंकुम-चिरी, लावण्यखाणी कुणी
कांता-संगतिं चालली विहरण्या चंद्रासवें रोहिणी १

सौंदर्यें अनुरूप नाथ तुज हा, फेटा मिशा वा गति
दावी क्षत्रिय हा पराक्रम-पटू, या युद्धकार्यीं रति
व्हावी ती परि आस तृप्त कुठुनी, दुर्भाग्य या भारतीं!
पोषाखांत मनांत जागृत तरी, राहो सदा वृत्ति ती २

याचें दर्शन मानसीं मम किती, सत्कल्पना निर्मिते
स्वातंत्र्य-प्रियता मुखीं झळकते, कोणा न ती मोहिते!
आनंदें हसतीं, विनोद करितीं, बालीशता दाविती
ही उच्छृंखल वृत्ति वाटत परी द्वेष्या नसे खास ती ३

अंगीं यौवन ज्यांचिया मुसमुसे त्यां वृत्ति ही शोभते
तारुण्या अविचार अक्षय सखा, अन्योन्य साक्षीच ते;
ज्यांचें यौवन पूर्ण जात उदया-पूर्वीच अस्ताप्रती
त्यांचा स्वैर विलास तापद परी मन्मानसा हो अती ४

पंकीं पंकज उद्‍भवे, परि नसे पाण्याविना पंक तो
हे निर्जीव तरूण वीर उदरीं यांच्या कसा जन्मतो ?
हें दांपत्य परंतु शोभत खरी वीरां खनी निर्मल
या पाहोनि मना तसाच नयनां आनंद हो दुर्भिळ ५

आशीर्वाद तुम्हांस देऊं, तरि ना वाणी अमोघा मम
इच्छा कीं तुमच्या सर्वे मम खरा, हो स्नेह भावोद्गम;
आनंदांत कशास खंड तुमच्या पाडूं मधें येउनी ?
देवाची स्मृति, मातृभूस्मृति तशी लावो तुम्हां कारणीं. ६

६ मे १९२८ ]

## २ वेश्याजीवन !

लोकीं कोण न मोहतो बघुनि हें तारुण्य लावण्य हें
हें हालाहल मानसा; कवण तो सामर्थ्य ह्याचें सहे
हें दूरस्थ बरें, नको क्षणभरी संपर्क याचा कुणा
ने नीतीस लयास दर्शनमिषें पापी करीं पावना १

जी पावित्र्य–खनी सुनीति–जननी पापास संहारिणी
जी धर्माश्रय अक्षय प्रबल जी, जी जन्मदात्री जनीं
ती स्त्री–जाति तुवां कुशील गणिके केली कलंकांकिता
सौंदर्या नव यौवना फसविलें आलीस जन्मा वृथा २

जाळी दर्शन कामिनी तव तरी चंद्रानना तूं कशी ?
नेत्रीं पंकज हें न आग जळते जी लाजवी वन्हिसी,
काया ही लतिका न कोमल परी हा शूल कामी जना,
बांधाया दृढ रज्जु विक्रम तुझा, हो दृश्य मह्लोचना ! ३

कां पापप्रसरार्थ सुंदर तनू ईशें तुला दीधली?
कां पोटास्तव काय पातक–पथीं तूं पापिणी लाविली?
कां हा चालविशी कुळक्रम मुली, हें पापही ना गमे?
राहो सत्य तुझें तुझ्याच जवळी त्वद्दर्शनें मी भ्रमें! ४

१७ मे १९२८ ]

## ३ रडत नाहीं तोंपर्यंत

बाळे बोलुनि शोबडें रिझिविसी तूं तप्त मन्मानसा,
मातेची परि शांतता तुजमुळें संताप पावे कसा?
ऐसें बोलत कांत तोंच लहरी बाला रडूं लागली,
कांतेच्या करिं कीं, तिला निरविलें कांता तशी हांसली!

७ जानेवारी १९२९ ]

## ४ दोन लोभी

कोणे एक दिनीं प्रवास करितां मी आगगाडींतुनी
हें आश्चर्य घडे, तदा किति हंसें; मी हांसवीं सांगुनी
मित्रांना कितिदां! अतां कवनिं तें गुंफावया सिद्ध मी
आश्चर्यें भरल्या जगीं अनुभवा कीं तें न ये नेहमी! १

× × ×

किती कोंबलीं माणसें होय दाटी!
गरीब प्रवासी सदा हाल कंठी!
शिरे एक तों आंत बाई सुरूप
तिचा वेष त्यां मोहिनी हो अमूप २

बाई आणि सुरूप, सुंदर तसा पोशाख सामानही
जागा देति तिला समस्त जन ते कीं मोहिनी संग्रहीं
बोले ती न कुणासवें तिजशिं ना बोले कुणी होउनी
सारे ते परि पाहती तिजकडे कांहीं भिषा काढुनी ३

× × ×

कुण्या स्टेशनीं थांबली गाडि तों कीं
त्वरें खालती ये; शिटी गार्ड फुंकी
न ये मागुती ती, निघालीहि गाडी
समस्तांचिया एक ती गोष्ट तोंडीं ४

गाडी धांवे, स्टेशनीं थांबतां ती
कोणी येथें तेथ वा कोणि जाती;
आतां आम्ही तीन सारे डब्यांत
त्या दोघांची चालली एक बात ५

बाई गेली, नाहिं आली फिरून
गाडीमध्यें येत नाहीं दिसून
दो वेळां मी पाहिली सर्व नाडी,
गेली तीची ट्रंक जातां वराडी ६

बोले त्यांतें तैं दुजा तो प्रवासी
'जातां तीमें ट्रंक नेली न कैसी?
नाहीं नेली ती वराडी जनांनीं
आहे तीची ट्रंकही ह्या ठिकाणीं' ७

'माझी आहे ट्रंक ही मी नवीन
घेई रातीं देउनी रोख तीन;'
ऐकें पाहें मी मजा ती दुरून
आतां बोळे तो दुजा लोभपूर्ण ८

'आहे माझी ट्रंक, केवी तुझी ही?
जातांना मी घेउनी जात पाही!'
आतां आला रंग त्या भांडणाला
गाडी थांबे कीं मजा थोर झाला ९

× × ×

उतरुं पाहे तो ट्रंक घेउनी ती
दुजानें ती धरियली घट्ट हातीं
अल्प कालीं जमलेहि तेथ लोक;
ट्रंक तीची; भांडती हे विशंक! १०

अतां येई पोलीस म्हणे दोघां
'माल आंतिल दोघेहि तुम्ही सांगा'
ट्रंक बाईची ऐटबाज, ऐशा
कल्पनेनें सांगती वस्तु खाशा. ११

पंच नेमुनि ती ट्रंक फोडियेली
आंत दिसली त्यां वस्तु तों निराळी!
प्रेत बाळाचें पाहुनी थक्क सारे
आणि मेले हे लोभि जणुं बिचारे! १२

११ जुलै १९३८ ]

## ५ परिस्थिती हा भेद करी

( चालः—भला जन्म हा— )

'आवड नावड असे अधिष्ठित परिस्थितीवर खरी
सत्य मम सत्य हीच वैखरी !

ही दाढी या जटा किती मी आस्थेनें पाळितों
काळ किति त्या पायीं वेचितों !

वेणीफणि तव होउनि जाई, केशाची मम परी
चालली अजुनी ही चाकरी

तलम रेशमासम केश तुझे, माझेही त्यासम
परि तुझा निष्ठुर कोटिक्रम

केश तुझे हे पाहुनि होई दृष्टी मम हांसरी
परि तुझ्या नयनीची ही सुरी

हा शीख पहा हा केसांनीं झांकला
हा काय नकोसा कांतेला जाहला ?
परि तुझ्या आंचवे काते ! हा प्रीतिला !'

'परिस्थिती हा भेद करी, ती शीख, नसें मी परी
झडकरी आण सख्या ! कातरी.'

५ आगस्ट १९३८ ]

## ६ पापाचें प्रायश्चित्त

'सांगें नित्य तुला मी आवडती तव मिशा मला भारी
सृष्टीच्या चुकिच्या परि परिमार्जनिं दृष्टि तव खिळे सारी १
पति दर्पण पत्नीला पत्नीमुख आरसा पतीलागीं
दर्पण निर्मल लाहे प्रतिबिंब तरी प्रसन्नता भोगी २

अन्योन्यातें देखुनि हांसति दोघे प्रसन्न चित्तानें
सुंदर साचे तरि ते, सौंदर्या न तरि खास कांहिं उणें ३

जन्माची मी मैत्रिण अक्षय सहवास आपुला ठरला
त्वत्सौंदर्यपरीक्षक नेमियलें नीतिनेंच एक मला ४

वैभव मिशा असे तव वैभव माझें तसेंच तें होतें
पाहुनि मिशा तुझ्यावरि होती आसक्त कामिनीचित्तें ५

म्हणती मज भाग्याची मार्मिक ललना तुझ्या मिशांवरुनी
स्मरते ना तुज? मी कीं गोंजारी त्या सदैव अंगुलिनीं ६

निष्ठुर तूं, निष्कारण वैभवहीना तुवां मला केलें
प्रायश्चित तुला या पापाचें योग्य एक ठरवीलें ! ७

आवडत्या माझ्या त्या हारविल्या लीलया तुवां स्व–मिशा
स्वकरें भूषविसी तूं प्रेमानें नित्य माझिया केशा ८

सुख तें सदैव लाभो इच्छा तव ही असेल जरि चित्तीं
पूर्वी ऐशा स्व–मिशा झाल्या कीं बोलवी स्वपत्निप्रती ९

पत्नीचें पत्र येतां हें, वाढवूं लागला मिशा
कापील केश ती खास । त्याच्याही भीति मानसा १०

६ आगस्ट १९३८ ]

## ७ तेव्हां आणि आतां !

'वेगें जाउनि त्या म्हशी धरुनि तूं त्या कोंडवाड्यांत ने'
माझे ऐकुनि बोल जाय जलदी तो कुंपणाबाजुनें
त्यानें त्या धरिल्या म्हशी बघुनि हें धांवे वडारीण ती
'कोणाच्या धरिशी म्हशी, हंससि कां' रागें म्हणे त्याप्रती १

काठीनें अडवी म्हशी, कर तिनें दाव्यासही घातला
देखोनी अति तापलों, द्रुतगती मी पातलों त्या स्थला;
काळा वर्ण, तरी सतेज तनु ती, बांधा तिचा सुंदर,
धैर्याची जणुं मूर्ति, तीस बघुनी संतोषलें अंतर २

आलेला बघुनी मला, सरकली मागें, स्वकांतास ती
हांका मारि म्हणे, 'पहा म्हशि कशा नेतें स्वगेहाप्रती;
माझा मालक शंभरास निजवी, आहांत दोघे इथें;
त्याची लाठि बघोनि जाति पळुनी, दाही दिशाना भुतें.' ३

रागें कंपित ती तनू, स्वर तसा, डोळे तसे लाल ते,
तें धारिष्ट, तिचा पतीविषयिंचा विश्वास, औत्सुक्य तें
देखोनी नुकसान मी विसरुनी बागेंतलें, तोषलों
सारें दृश्य पहात तें स्थिरमती तेथें उभा राहिलों ४

आला कांत तिचा न तो तिजपरी घोड्यावरी बैसला,
झाला लीन म्हणे, 'क्षमा करुनि या सोडा म्हशी आजला;
आल्या त्या फिरुनी तरी न पुसतां त्यां कोंडवाडा करा;
पाया मी पडतों, अम्हांस तुमच्यावांचोनि ना आसरा;' ५

सोडोनी दिधल्या म्हशी धरुनि ते गेले निघोनी घरीं
बागेचें नुकसान ना, परि ठसे ती गोष्ट चित्तावरी
थोड्याशा फरकें बनाव बनला तो कांहिं काळें पुन्हां
त्याचा तो पगडा मनावरि बसे, हा काळ हालेच ना ६

पूर्वीच्या परि पातल्या पुनरपी बागेमधें त्या म्हशी
आम्ही बांधुनि न्यावयास सजलों त्या कोंडवाड्यापशीं
तों ये खिन्नमुखी समीप ललना ती हात जोडोनियां
बोले 'मी विधवा, अनाथ अबला, ही वेळ दावा दया!' ७

१० मार्च १९४१ ]

## ८ साह्य कीं अविनय !

वेणी फणी करुनि पातळ शुभ्र नेसे
त्यांतूनि ब्लाउझ तिचा अति रम्य हांसे
डाव्या तिच्या मनगटीं विलसे घड्याळ
बोले 'करूं सहल ये चल जों सकाळ' १

आंबा मोहरला परी न तिचिया येई करा डाहळी
मारोनी कितिदां उड्या कशितरी खांदी तिनें ओढिली
घेई तोडुनि मंजिरी पदर तों घेऊनि ढाळी वरी
गेली, काय करूं अतां म्हणुनि ती कोपे अती अंतरीं २

धामेजली, लाल मुखीं जहाली
मारी उड्या खालिं न ये डहाळी
अशांत जाऊन हळूच तेथें
उंचावलें मागुनि मी सखीतें ३

सुटला पदर परी ती खिन्न मनीं लाजली सखी भारी
सहल कराया न धजे फिरली तेथुनि तशीच माघारी ! ४
१८ एप्रिल १९४१ ]

## ९ प्रेमासाठीं देहविक्रय

केला मीं व्यभिचार तो परि असे साचा सदाचार कीं
नाथा वाचविण्या नुरे पथ दुजा तेव्हांच देहा विकीं !
देहातें विकुनी पतीस जगवी ती प्रेमला निश्चयें
स्वत्वा नाशुनि कांत–रक्षणिं सजे हातीं तिच्या पुण्य ये.
१८ एप्रिल १९४१ ]

## १० खोड मोडली!

नेसे रंगित गोल पातळ, रुळे पाठीवरी शेपटा
पायीं चप्पल, चालली भरभरा, मागोनि तो कारटा
ओढी केस कुणी, वळूनि तरुणी केशाळ कीं चाबुक
गेली त्या तडकावुनी तडक ती; हें दृश्य आल्हादक.

१९ एप्रिल १९४१ ]

## ११ नाज़ूक शंका

या दोघी बहिणी जुळ्या घडविल्या एकाच छापांतल्या
नाकीं, डोळिं, शरीरयष्टिंत तशा, या जोडिनें चालल्या,
दोघींचीं लुगडीं समान, पडतीं त्यांचीं पदें सारखीं
शंका ये पतिंना 'खरी कवण ती यांतील माझी सखी?'

१९ एप्रिल १९४१ ]

## १२ सहवासासाठीं

खोटा आणुनि ताप घेउनि रजा राहे निजूनी घरीं;
राहें मी घरिं कीं सखी दिनभरी राहे गृहाभ्यंतरीं;
माझे संनिधि बैसतां कळुनि ये वृत्तांत साचा तिला
बोलें मी 'सहवास लाभत तुझा आजार येतां मला!'

१९ एप्रिल १९४१ ]

## १३ आसुरी वृत्ति!

काळा हा वर, गौरकाय वधु ही; ही निर्धना, हा धनी;
हा निर्बुद्ध पुरा, सुबुद्धिमति ही; हा भूत ही भास्विनी;
ह्याचा रुक्षपणा, हिची रसिकता सर्वांस ठावी जरी
सुज्ञां मान्य विवाह हा! अहह ही वृत्ती खरी आसुरी!

२१ एप्रिल १९४१ ]

## १४ सुंदर पण अनित्य

बाळा! हांस, तुझें प्रसन्न हंसणें आनंदमूर्तीच ती!
बाळा! खेळ तुझे किती रमविती वेडावते मन्मति!
घ्यायाला टपती तुला तरुण हे, हे वृद्ध, हीं बालकें
ही आकर्षकता तुझी सततची कोण्या उपायें टिके!

७ एप्रिल १९४२ ]

## १५ बेजबाबदार

खालीं मस्तक पाउलें वर अशी म्हातारबाई पडे
टाळाया उतरंड हात झुडपां आधारुनी ओरडे
भोंतीं ते जमले कुणी, परि दुरी राहोनि ते पाहती
मी पंगू, परि काढिलें वर तिला तों ते मला हांसती!

१० एप्रिल १९४२ ]

## १६ बाळाचा आजार

दिवस तापाचा आज हा उदेला
बाळ तापें तापूनि लाल झाला
होय दुखणें काढणें बाळ–लीला
अशा यातें बाळसें कसें बाला? १

बाळ–तापें उगवलीं गेह–पापें
रडे किंवा आरडे हृदय कांपे
सानथोरां आजार बाळ झाला
असे आधीं आनंद जो अम्हांला २

१२ एप्रिल १९४२ ]

## १७ शेवटचा आसरा !

वणवण करी देशोदेशीं न तीं परि भेटलीं
जनक–जननी कोठें गेलीं न त्यास कळे मुळीं
रडत बसला गंगातीरीं, म्हणे मग तो जन
'जगतिं जगणें कोणासाठीं?' करी जल–मज्जन !

१२ एप्रिल १९४२ ]

## १८ कीर्तिरूपें उरावें

निरलसपणें चाले त्याचें सदोदित काम तें
कधि न कवणा निंदी वंदी उगाच कुढया मनें
सुहृद सकलां वाटावा तो, कुठें न तया भय
हंसत जन तो गेला मेला, उरे स्मृतिसंचय !

१५ एप्रिल १९४२ ]

## १९ उगीच अडगळ कां ?

पुरे म्हाताऱ्या तुझी हौस आतां
बालकांना या होइं साह्यदाता
रोपडीं हीं दररोज वाढणारीं
तुझ्या गेल्या गोवऱ्या नदीतीरीं !

१५ एप्रिल १९४२ ]

## २० दुराग्रह

जाते वेगें कुठेंशी, अवचित उठला तो ध्वनी संकटाचा
धांवे जो तो निवारा त्वरित मिळविण्या आसरा हीस कैचा?
भोंतीं वेश्यागृहें तीं बघुनि थबकली, क्रुद्ध पोलीस झाला,
हालेना ती तरीही, तदवन करण्या येतसे बॉंबगोळा !

१८ एप्रिल १९४२ ]

## २१ प्रलयच तारक?

सारें हें वितळेल विश्व रविच्या तीव्र प्रकाशें जरी
किंवा पाउस कोपुनी महितलीं पाणीच पाणी करी
थंडी टाकिल गोठुनी सकल वा पृथ्वी तरी चांगलें!
तेव्हां हे सुटतील सर्व दुबळे! हें भाग्य त्या कोठलें!

१९ एप्रिल १९४२ ]

## २२ केस कां कांपले?

केसा लावुनि रोज तेल फणिनें दो वेळ ते विंचरा,
घाला त्या गजरा, सुवासिक फुलें, सत्कार त्यांचा करा!
न्हायाचा दिन गाजवा, कधि न ऊ व्हाया सदाच्या झिजा!
डोईस्नानसुखा न वाव, म्हणुनी केशांस देते रजा.

२० एप्रिल १९४२ ]

## २३ शाश्वत विनाशसाधन

मृत्यूच्या पकडींत पूर्ण गवसे ही पोर निःसंशय
एखादाच उठे प्रयत्न करितां होतां अभाग्यें क्षय!
कांता—कांत सुमार ठेविति न जे त्यां ही दशा निश्चित
कामांधत्व विनाश—साधन असे या लोकिचें शाश्वत!

२१ एप्रिल १९४२ ]

## २४ मोडेल पण वांकणार नाहीं

रिपु प्रबल, जिंकिलें नगर, देइं त्या मान्यता,
अपाय न करी, दुराग्रह धरून तूं जीविता,
वदे सुहृद तों घरामधिं शिरे रिपू—सैनिक
लढून पडला परी न नमवी तया मस्तक!

२४ एप्रिल १९४२ ]

## २५ वीरश्री !

होतो हा विजयी जपान अथवा होणार ऑस्ट्रेलिया
तूं मॅकार्थर होइं मी रिपु तुझा टोजो, लढूं पाहुं या
ऐसे बोलुन दोन भाउ लढले घेऊन लाठ्या करीं
वीरश्री चढली, न थांबति कुणा, मृत्यूच त्यां आवरी.

२५ एप्रिल १९४२ ]

## २६ अभागी विधवा

'माझी मैत्रिण, मित्रपत्नि अससी, हें काय तूं बोलसी?'
'हें अन्याय्य न, यांत पाप कसलें? ही भूक आहे मशी;'
'क्षुच्छांतीसदनें अनेक असतीं;' हें हेंच मातें रुचे;'
तो राहे स्थिर, ती अभागि विधवा, दुःखांत साध्वी खचे!

२५ एप्रिल १९४२ ]

## २७ आत्मविश्वास

'अपत्या मी माझ्या जगविन, न त्या देइन बळी!
तयाच्या ताता! तूं म्हणसि चढवूं आत्मज सुळी!
नको दृष्टीलाही तव वदन जा येथुन कसा!
कुमारी एकाकी, तरि मजसि माझा भरंवसा!

२५ एप्रिल १९४२ ]

## २८ भाग्यहीन

आजारी पडलें, विकार फुलले, आरूढ मृत्यूशिरीं
त्यांचे यत्न अफाट, ये यश तयां आनंद दाटे घरीं;
शुश्रूषा करि त्या अपाय, धरिली शय्या, निमाले तसे!
भाग्यें हीन खरी; असें अजुनि मी, हा काल चालें, हसें!

२७ एप्रिल १९४२ ]

## २९ आव्हान !

अर्धांगी मी न दासी, तुजसम मजला हक्क संपूर्ण येथें
घेई तें शांततेचें व्रत अजवरि मी फायदा त्या न पथें
येथें ती प्रेममूर्ती फिरुनि फिरकतां मृत्यु दोघांस खास !
गेहाची स्वामिनी मी, अनय न शिवणें माझिया या गृहास !
२७ एप्रिल १९४२ ]

## ३० सुखही दूरच !

सहचर न तुझा कां संगतीं ये कधींही
सहवसति तयाची न्याय्य कां फक्त गेहीं !
अलग अलग ऐसे वागती कांत–कांता
म्हणुनि कधिं कुटुंबीं सौख्य साचें न हाता.
२८ एप्रिल १९४२ ]

## ३१ सन्मित्र

होती सुंदर ती, न मादक तिचें सौंदर्य आल्हादक;
बोले गोड, न मानभावि परि तें, विश्वास–संपादक,
देई साह्य परी सहेतुक न तें सन्मित्रता–साधक;
होती बाल वयें तरी मन तिचें वृद्धास साहाय्यक.
२९ एप्रिल १९४२ ]

## ३२ आचरणाचें मूळ

भोंगा झाला संकटाचा तसा मी
धांवे वेगें आश्रया एक धामीं
वेश्येचें तें गेह, हो मौज भारी
संकोचें मी आणि तीही बिचारी ! १

भेटे तेथें मित्र माझा पुराणा
त्या पाहोनी मी पुरा हो दिवाणा!
होता बेटा पट्टिचा तो शहाणा
राखी माझा आपुला तेंवि बाणा २

'साधूची ही बायको जाण मित्रा'
हें ऐकोनी माझिया घाम गात्रां!
जाऊं पाहें युक्तिनें मी तिथून
त्यानें मातें बैसवीलें धरून ३

'साधू गेला, आश्रया नाहिं कोणी
येथें तेथें हिंडली दीनवाणी
पोटासाठीं–' बोलुनी थांबला हें
बाईच्या तों नेत्रिंचा पूर वाहे ४

'वहिनि! सदनीं जाऊं गेहीं तुझा पतिबन्धु मी'
वचन मम हें ऐकोनी ती हंसे, शिरसा नमी;
'पतित अबला मी मद्योगें तुम्हांस कमीपणा'
'वद न असलें येई गेहीं, करूं नव योजना' ५

होतां भोंगा शांततेचा वदे ती–
'आम्ही जातों, आमुचे व्हा न साथी'
जाई तैसा तो निघोनी त्वरेनें
प्रेमें गेहीं आपुल्या मी तिला नें ६

फिरोनी माणसीं आली, पतिता राहिली न ती
सद्गुणीं दुर्गुणी आम्हां करी प्राप्त परिस्थिती. ७

३० एप्रिल १९४२ ]

### ३३ तिकडच्या ओळखीची

वाजे भोंगा, विमानें घरघर करितीं होइ रस्त्यांत घाई
वेश्या कोणी निवाऱ्या पळत पळत ये तों वदे एक बाई–
'जाई, येथें न येई' श्रवण करुन हें कांत आंतून आला
आस्थेनें त्या स्त्रियेला परिचित बघुनी आंत घेऊन गेला !

३० एप्रिल १९४२]

### ३४ ती खरी योगनिद्रा

बाळाशीं खेळतां जें हंसतमुख तुझें, ती खरी प्रेममूर्ति
बाळाशीं बोलतांना स्रवत वच तुझें, ती खरी काव्यकीर्ति
बाळाला झोंप याया ध्वनि मधुर निघे, ती खरी गानमुद्रा
बाळा प्यायास घेतां अविचलन तुझें, ती खरी योगनिद्रा !

३० एप्रिल १९४२]

### ३५ न कळत विनोद

प्रवेश करि मागुनी कुणि घरांत हें पाहुनी,
तिनें जमविले कितीक जन आत्मसंरक्षणीं !
स्वकांत परि तो असें कळुनि फार ओशाळली !
परी अभयवृत्तिची करिति वाहवा मंडळी.

१ मे १९४२]

### ३६ पाप चव्हाट्यावर मांडा !

जनीं फिरत, वा वनीं सतत एकटी निर्भय,
तिला मनुज भेटला अधम एकदां निर्दय !
भिऊन बसली न ती, उघड सर्व केलें तिनें
सुरक्षित म्हणून हो कुलवती स्त्रियांचें जिणें.

१ मे १९४२]

### ३७ दुःखद स्मृति!

कांता गेली अवचित, मला काय झालें कळेना
प्रेताचें त्या दहन करण्या द्रव्य कोठें मिळेना!
आला जातो समय, रुततो तो परी अंतरांत
त्या काळाचें स्मरण न मला सह्य अद्याप होत!

२ मे १९४२

### ३८ वेडी!

महारोगी झाला प्रिय पति असे ज्ञानरवि जो
मुलें झालीं वेडीं तनमन म्हणे ज्यास्तव झिजो
निवारा द्रव्याचा मुळि न, न तिला 'ये' कुणि म्हणे
दिसेना आशेचा किरण, मग ती पागल बने.

३ मे १९४२ ]

### ३९ कसें जुळावें?

जयाचें माझ्याशीं पळभर जमेना अजवरी
मला पाहोनी ज्या हृदयिं उठती कोप–लहरी
मरो मी किंवा तो म्हणत असतो जो निशिदिनीं
कशी मी त्यासंगें सुख मिळवुं संसार करुनी!

३ मे १९४२ ]

### ४० मुलामा!

असूं दोघें नटनटी खरे छान
जोडपें ना जग वदे यासमान
शत्रु कट्टर आहोंत एकमेक
ठेवि आम्हां एकत्र परि विवेक

४ मे १९४२ ]

## ४१ सृष्टीशीं एकरूप

स्याली पातळ पांढरें झिरझिरी, ती पोलकें पांढरें
पायीं चप्पल पांढरी, सखि जणूं चंद्रप्रकाशीं विरे
मी टोपी सदरा, विजार चपला घालीं तशा पांढऱ्या
रात्रीं जाऊनि बैसलों गिरिशिखीं, गंभीर खालीं दऱ्या १
अन्तर्बाह्य समग्र उच्च बघुनी आनंद आनंदला
जीवा विस्मृति होय या जगतिंची काव्यांत तो रंगला
गोष्टी बोलत गोड गोड बसलों, तेथेंच तैं झोपलों !
सूर्याचे उदयीं प्रभातसमयीं गेहीं पुन्हां पातलों. २

४ मे १९४२ ]

## ४२ त्यांना दुःख – पण मला ?

मद्वैधव्यें किति तळमळे आइ, बाबाहि तेवी
मच्चित्ताचा परिचय तयां नाहिं, तो होइ केवीं !
वेश्येऐसें मजसि पतिनें वागवीलें सदाचें
मूर्ती त्याची नयनिं पडतां भीतिनें चित्त कांचे !

४ मे १९४१ ]

## ४३ कशाला आला !

आलों युद्धांतुनी मी परतुनि सदनीं मृत्युला डावलोनी
येथें भेटे न कोणी जनक जननि ते सर्व गेले मरोनी
पोटार्थी भाउ गेले सुहृदहि समरा जाति ते साधण्याला
त्यांची वार्ता न कांहीं, शिव शिव परतें व्यर्थ मी मातृभूला !

४ मे १९४२ ]

## ४४ जुनें गेलें, नवें आलें.

अंबाडा वेणिचा हो, बिलवर चढले बांगड्यांचे ठिकाणीं
चोळीला झंपरानें हुसकुनि दिधलें, कुंकु बिंदू न मानी
देखोनी पातळांतें लपविति लुगडीं आपुलें तोंड आतां
गेला जोडा पळोनी नव नव चपला स्थापिती स्वीय सत्ता.

८ मे १९४२ ]

## ४५ हितकर मला हेंच !

समाजा तूं माझा करिसि जरि धिक्कार पुरता
तरी सांगे पोटीं तव न असली अन्य दुहिता?
कुमारी मी माता बनुनि मम बाला जगविलें!
करीं वाटे तें तूं हितकर मला हेंच गमलें !

८ मे १९४२ ]

## ४६ हा जगाचा न्यायच कां ?

त्याला भाउ म्हणूनि मीं स्वसदनीं निःशंक बोलाविलें
त्याशीं बोलत मी अहेतुकपणें रात्रीं दिसां बैसलें
त्याचें वर्तन शेवटीं अधम तें, कोडेंच हें मानवी !
किंवा स्त्रीपुरुषा प्रसंग असले येणें असे वाजवी !

९ मे १९४२ ]

## ४७ नवे आले, पुढें गेले !

आकाशींच्या गभस्तीसम तळपतसे तेधवां तो जगांत
त्याच्याशीं सामन्याला कुणिहि न टिकला, हा करी पूर्ण मात !
सूर्याचा चंद्र झाला मग नव नव ते ख्यात झाले पुढारी,
आतां नेते नवे ते अवगणिति तया उंच त्यांची भरारी.

१२ मे १९४२ ]

## ४८ रागाची नांदी ?

रडुनि रडुनि डोळे लाल, दु:खा न सीमा
मधुकर गवसेना, नाथ येई न धामा;
सदनिं परतलों मी बाल घेऊनि खांदीं
हरखलि परि तें हो हास्य कोपास नांदी !

१२ मे १९४२ ]

## ४९ 'क' वर्गीय कैद्याची भेट

'दिसेना मातें मत्सुत, तुज दिसे कां पतिमुख ?'
'लुटावा आवाजें मम जननि ! तूं पत्नि ! हरिख !'
'मुला जातो येतो ध्वनि निमुट जाळीमधुनिया'
'विनोदें या कारागृहिं जन जगे, जाइ न लया.'

१४ मे १९४२ ]

## ५० अशा घरीं राहूं ?

कशी राहूं येथें स्वगृहिं दिसतां नाश पुढती ?
घरीं आली आतां प्रिय सखि तयांची अधम ती;
न तीं नीचा, नीच प्रिय पति, कशी त्या प्रिय गणूं ?
तदा त्याची प्राणेश्वरि अजि दया दावि न अणूं !

१४ मे १९४२ ]

## ५१ दृष्टिआड सृष्टि !

सखी अन्यासक्ता बघुनि न रुचे वास घरचा
करूं द्या त्या दोघां सफल पुरता हेतु मनिंचा
दुरी जावें व्हाया प्रशमन मनाचें इथुन मी
कशानें व्हायाची तगमग इथें राहुन कमी ?

१४ मे १९४२ ]

### ५२ तगमग !

सखीच्या जाराचें हनन करूं? हत्या हितकरी?
तयाच्या हत्येनें प्रणय सखिचा हो मजवरी?
करूं दुःखी तीतें? अगर करुं मी दूर गमन?
सुचेना कांहींही, मरण वरुं का आत्मदहन?

१४ मे १९४२ ]

### ५३ कैद्याची काहिली

कारागारीं नयनिं न पडे स्त्री कुणाच्या कदापी
आपत्ती ही असह ठरवी बंदि कीं पूर्ण पापी!
अंतर्भागीं अनल दिसतो त्याचिया पेटलेला
शांती नाहीं कधिंच तिथल्या सज्जना दुर्जनाला!

१५ मे १९४२ ]

### ५४ गोड फजीति !

सरित्तीरीं तेव्हां अवचित तुझा पाय घसरे
धराया मी पाहें परि न चिखलीं पाउल ठरे
तुझ्यासंगें मीही मलिन तनु पाण्यांत पडलों
मुलें तों आलीं, तें बघुनि हसलीं कीं विरमलों!

१७ मे १९४२ ]

### ५५ कर्तृत्वाचे पवाडे

आगीचा भडका उडे त्वरित कीं तूं घेउनी घागरी
आणाया जल चाललीस बघुनी सोत्कंठ नारी-नरीं
शाह्या येउनि आग ती विझविली हानी न होऊं दिली
आगीची विसरे कथा, स्तुति तुझी आहे तरी चालली.

१७ मे १९४२ ]

## ५६ साधेपणांतील सौंदर्य

साधें पातळ शुभ्र, केश सुटले पाठीवरी मोकळे
पुष्पांची परडी करांत उजव्या, हातांत डाव्या फळें
येसी मागुनि माझिया हंसत तूं, हो मंद माझी गती
साधा मोहक वेष, हास्य मधु तें, त्याची न हो विस्मृती.

१७ मे १९४२]

## ५७ दोन विलक्षण स्नेही

'विद्युद्वेगें तव निकट मी येइ येतां निरोप
हर्षोत्फुल्ला परि न दिससी दृष्टि येई प्रकोप!
भ्यालों भारी, भयगलित मी पाहुनी हांसलीस
कोठें केव्हां अभिनयकला सांग अभ्यासिलीस?' १

'दारिद्र्याची तव शपथ ही, वाढता हा प्रपंच
चाले केवीं घर सतत ही कल्पना देइ जाच
जाऊं कां मी? तुज रुचत कां मी सिनेमांत जातां?
द्रव्यप्राप्ती अभिनयपटू स्त्रीस निश्चित आतां' २

आतां माझी प्रियतम सखी जाहली 'स्टार' गाजे
देशोद्धारी कृति घनबळें पूर्ण माझी विराजे;
आम्ही दोघे करित रमतों आपुल्या भिन्न कामां
झाले स्नेही सदनिं अमुच्या देशसेवा सिनेमा. ३

१८ मे १९४२]

## ५८ प्रेमाचें बल

पहा हें प्रेमाचें बल, तुडवुनी नीति पुरती
घरीं मित्राच्या ही गमन करि सोत्साह युवती!
शहाणा हा ज्ञानी नरवर परस्त्री स्वसदनीं
मुदें सत्कारोनी हंसतमुख नांदे बुधजनीं.

२० मे १९४२ ]

## ५९ त्यांना त्याचें काय !

प्रभातीची लालिमा, गार वारा
मृता अंगींही आणितीं उबारा;
परी स्त्रीला मिळती न तीं कधींही
गुलामाला रसिकता मजा नाहीं!

२२ मे १९४२ ]

## ६० असें प्रेममीलन दुर्लभ

'बाजारीं हा मिळेना, त्वरित लिहुनि मी आणवीला दुरूनी
आला आंबा, तयाचा रसिक न परि कां पोंचला तो अजूनी
चिंता लागे मला ही, करिं मम पडलें पत्र, निस्तेज झालें,
आंबे घेऊन संगें तव रसिकवराकारणें येथ आलें!' १

'आंब्याची रसिकाची घालूनी गांठ तूंच देणारी
जाशी कशि एकाकी येइन तुज पोंचवीन माघारी.' २

प्रेमाला प्रेम भेटे कीं। आनंदा पार त्या नसे
परी दुर्लभ भारी तें। जो तो दुःखी सदा दिसे ३

२२ मे १९४२ ]

## ६१ निराशा !

मित्राला भेटण्याला त्वरितगति निघे, वृत्त तों येइ कानीं
कीं तो गेला निघोनी समरिं उतरण्या बैसुनीयां विमानीं;
आशेची हो निराशा, भय गमत मनीं भेट कैशी फिरूनी
गेला, मेला तसा तो नरवर समरीं नांव मोठें करोनी !
२२ मे १९४२ ]

## ६२ प्रेमाचा घाव

आला गेहीं परतुनि कळे, धावलों भेटलों कीं
सांगे वार्ता समरगत तो मी परी पाडिं शोकीं
माझी भार्या प्रिय भगिनि जी एकली त्यास होती
गेली आम्हां त्यजुनि कळतां, विव्हळे दुःखमूर्ती १

'मित्रा तेथें कितिक घडल्या गोष्टि त्या शांत चित्तें
केल्या साऱ्या सहन मज कीं सौख्य आहेच येथें;
मित्रा फाटे मजवरि खरें आज आभाळ सारें
गेलें गेलें सुख तिजसवें भोगिलें तें बिचारें' २

बोलला पडला माझे । अंकीं झुंजार वीर तो
प्रेमाचा घाव मर्माचें । नेमकें स्थान भेदतो ३
२३ मे १९४२ ]

## ६३ आधीं जाते बुद्धि, मग जातें भांडवल

धनांध बनलें पती जरठ मान्य केला स्वतां
न मानसिक कायिक क्षण न लाभली तृप्तता
अनीति मग भेटवी सुहृद जो सुखाचा झरा
विलास – विधवा जरी – करिं, न संयमी मी जरा. १

सुखें अमित भोगतें मन परी सदा बावरें
समाज म्हणतो मला अधम, तें असेही खरें
सुखार्थ पथ शोधिला प्रथम तो चुकीचा तस
म्हणोनि नुरली अधोगतिविना गती मानसा. २

२१ मे १९४२ ]

## ६४ बुवा!

उपास पडला घरीं, विरमला पुरा तो मनीं
निघे नगरिं राबण्या सहचरी सवें घेउनी;
नशीब उघडे तिथें धनिक जाहले हे किती!
धनीं उठति बैसती धनिं पहा कसे संप्रती १

तया प्रथम ना मिळे फिरुनिही तिथें नोकरी
उपाय नुरला दुजा बनति शुद्ध भिक्षेकरी
घरोघर फिरून ते पदरिं घेति ये जें करीं
कुठेंतरि निवास त्यां मिळत अन्न कांहींतरी २

अतां अनुभवें कलात्मक बनोनि भिक्षेकरी
पताक तिलकादिकीं सजुनि जाति दात्याघरीं
कुणी करित दान कीं वदनिं दिव्य आशी निघे
कधीं ठरुनि तो खरा, प्रकटभाव साधुत्व घे ३

निपुत्र धनवंतिला सहज पुत्रवंती म्हणे
प्रसाद तिस तो गमे, स्वगृहिं राहण्या त्यास ने
स्वतांच बनला पुढें जनक भावि पुत्राप्रती
घरांत सुत पाहुनी नुरतसे प्रमोदा मिती ४

प्रसिद्ध किति तो अतां म्हणति त्या महाराज ते
कमी न विभवा मुळीं, बघुनि लक्ष्मि तें लाजते
अजून अपणांस तो म्हणवि खास भिक्षेकरी
प्रभातसमयीं घरीं म्हणुनि रोज झोळी करीं ५

२९ मे १९४२ ]

## ६५ विसंगति !

उन्मादकारक खरोखर चांदणें हें
वार्धक्य यौवनदशा जणुं रम्य लाहे
भोतीं परिस्थिति परी उलटी बघून
तारुण्य जाय मनिंच्या मनिं तें जिरून !

२९ मे १९४२ ]

## ६६ उसना तंटा

हे बाप लेक बघ भांडुनि आपसांत
लोकां कसें फसवुनी हित साधतात
कुत्रे विटाळिति जसें दशम्या भटाच्या
खोटेंच भांडति हितार्थ शठ स्वतांच्या

३० मे १९४२ ]

## ६७ जो तो दुःखीच !

शोधोनी बघ ना इथें न दिसतें कोणी सुखी माणुस
जो तो मानव दुःखि कष्टि झटतो सौख्यार्थ सारा दिस !
तो श्रीमंत म्हणे 'मला न मुलगा,' 'त्याची स्नुषा रोगट'
दारिद्र्यें पिडिल्या जनांस जगणें झालें असें दुर्घट.

३० मे १९४२ ]

## ६८ सुखद अपघात

घेऊनी तो प्रियकरिणिला काढण्या पाड गेला
वेगें वृक्षीं चढुनि वरुनी पाड फेकी तियेला
ती खाई तों नव नव तसे टाकि चाले विनोद
तों ती फांदी तुटुनिच पडे वाढला कीं प्रमोद.

१ जून १९४२ ]

## ६९ महापूर कोण अडविणार?

ती हंसते, हा हंसतो, हास्याचा कैफ जणुं चढे दोघां
बांध कुणी घालावा दुथडी वाहूनि चालल्या ओघा!

१ जून १९४२ ]

## ७० बाळाचें वाचन!

आली झोंप तसा करांतुनि गळे तो ग्रंथ माझ्या तदा
आलें रांगत बाळ तेथ सहजी ग्रंथावरी हो फिदा
प्रेमें वाचत तें बसे मज ढका लागून ये जागृती
चिंध्या पाहुनि कोप ये न, परि ये तच्चुंबनाची रती.

२ जून १९४२ ]

## ७१ त्यांना मंगल–लोकांना अमंगल!

मित्राचे सदनीं अमंगल घडे अक्षम्य कांहीं तरी
वार्ता ये श्रवणीं अशी, अशुभ तें सांगे न कोणी परी
तेव्हां खर्च करोनि जाउन बघे तों आयके गोष्ट ही
मित्राची तनया 'सुशील' दिसते वेश्यासुताचे गृहीं १

होती पोर यथार्थ नाम, शिकण्या गेली पुण्याला, तिथें
भेटे तीस 'सुधीर' जो तिजपरी सच्छील सर्वांमतें
त्यांचा स्नेह जमे, सदैव असती ते एकमेकांसवें
त्यांचा निर्मल मित्रभाव परि तो एकास ना पाहवे   २

अभ्यासांत सुशीलतेंत सहजी ते मान्यता पावले
होता त्याविषयीं परंतु भरला तो दुष्ट हालाहलें
त्याचा लेख गलिच्छ एक धरिला मित्रद्वयें युक्तिनें
दोघांनीं पिटिलें तसा शरण ये 'सोडा मला' तो म्हणे   ३

माफीलेख लिहून घेउन तया सोडून त्यानीं दिलें
आतां शत्रु न, सानथोर म्हणती सारेच त्यां चांगले
सुट्टी घालविण्या घरोघर जसें जाया निघे तें द्वय
बोले तीस सुधीर 'भेट तुझिया गेहीं असो निश्चय'   ४

मित्राचें इतिवृत्त सांगुनि पित्या फोटो तसा दाखवी
फोटो पाहुनि जाहला स्तिमित तो मित्रा मृता आठवी
आला एक दिनीं सुधीर, हरिखे ताता सवें ती सुता
पूर्वीचा इतिहास पूर्ण कळुनी तो आप्त झाला अतां   ५

बोले तात, 'तुझा पिता मम सखा, माता सखी त्यापरी
त्यांशीं जें सहवास–सौख्य, जपुनी तें ठेविलें अंतरीं
झालें दर्शन आज हें तव गमे दोघे मला भेटले
पूर्वी निर्झर आटला, पुनरपी तो पूर्ण वाहे जलें   ६

होता सुंदर, उंच, गायनपटू, रंगेल वाटे जरा
पत्नीला मुकला जसा लवकरी हो कावराबावरा
माता सुंदर गायिका तव, तिचा त्याचा जमे स्नेह कीं
वृत्ती उल्लसिता फिरून बनली, दोघेहि झाले सुखी   ७

वेश्येची तनया परी कुलवती लाजेलसें वर्तन
स्नेहानें तिचिया न दूषण कुणा वाटे परी भूषण
त्वन्माता मम लाडकी भगिनि ती भाऊ पिता त्यापरी
जाई मी तुमच्या घरीं सतत ते येती तसे या घरीं ८

मातेला पितयास तूं सुखविलें जन्मोनि तेव्हां किती
केला उत्सव केवढा समजलों जन्मे जणूं भूपति
बाल्यांतील तुझे अतां स्मरति ते पोषाख, तें खेळणें
दोघांचा परि वास अल्प जगिं या, तें गेह झालें सुनें ९

नौकाक्रीडन आवडे अतिशयें, ते पौर्णिमेच्या दिनीं
घेऊनी प्रिय गानयंत्र जवळीं जाती स्वनौकेंतुनी
नौका ती उलटूनि जाति विलया, तूं राहसी एकला
तेव्हां हो अपुला वियोग, फिरुनी संयोग हा जाहला' १०

हें ऐकून सुधीर सद्गदितशा कंठें वदे तेधवां
'प्रेमाची बहुमोल ठेव नसती कीं हाल या मानवा
लाभे ही भगिनी तदा प्रियतमा, हा आज लाभे पिता
माझें गेह समीप हें मम पुन्हां हो जन्म हा तत्वतां ११

सांगे मी न सुशीलला मम कथा साद्यंत केव्हांच ही
भीती वाटत हीनजत्व मम हें निर्मील प्रेमीं तुही;
'माझें ज्ञान सुधीर हेंच तुजला' बोलून ती थांबली
अश्रुक्लिन्न मुखी सुशील दिसली कारुण्यमूर्ती खरी १२

तें देखून सुधीरही विरघळे, बोले क्षमा तूं करीं
ताई येउनि भेटलों तुज घरीं झाली प्रतिज्ञा पुरी;
ताई तात चला अतां मम गृहीं, जाती तसे ते तिथे
वेश्येचें घर आज तें उघडलें थांबून जो तो बघे १३

ये जा मग सुरू होई । प्रेमाची दो घरांतिल
सुधीरची कृती लोकां । ती अक्षम्य अमंगल. १४

३ जून १९४२ ]

## ७२ कुशंका!

जातों मैत्रिणिच्या घरीं म्हणत मीं, साशंक कीं पाहती
झालें काय म्हणून मीं पुसियलें, वेड्यापरी हांसती
गेलों मी तिचिया घरीं, बघति तों रोखून माझ्याकडे,
कोणीही नरनारि एक दिसणें त्या वावडें वांकडें!

९ जून १९४२ ]

## विभाग चवथा

# ग्रामीण जीवन

### १ उपाशी पोटीं ?

थंडी मी म्हणते तरीहि उघडा हा नित्य कामें करी
घों घों पाउस ये विवस्त्र खपतो तेव्हांहि शेतावरी
सूर्याच्या प्रखर प्रकाशिं दिसतो हा राबतांना असा
पोटीं भूक तरी खपे खपवितो साऱ्या मुलांमाणसां !

१२ एप्रिल १९४२ ]

### २ मधुर दृश्य

चाऱ्याचा उंच भारा शिरिं, करिं उजव्या बैल–दावें धरूनी
कुत्रा, शेळ्या सभोंतीं परत घरिं निघे संपतां काम रानीं
दारीं तत्स्वागता ये घरधनिण जिचे बाळ कांखेस सान
देखावा भेटिचा तो बघुन कवण तो जो न आनंद–लीन !

२ मे १९४२ ]

### ३ जोडीदारीण

मोटेचा तो करकर रिषे कानिं आवाज कीं मी
वेगें धावें, नयन भरूनी दृश्य तें पाहिं नामी
तोंडीं गाणें म्हणत नवरा मोट हांकी मजेत
पाणी देतां रमत चिखलीं गात पत्नीहि गीत !

२ मे १९४२ ]

### ४ भरल्या ताटावरून !

आला गेहीं थकुन बसला जेवण्या तो भुकेला
भार्या बैसे निकटिं फुलुनी देइ शेंगा तयाला !
आनंदी त्या अवचित गृहीं क्रूर आला पठाण–
ओढी पात्रावरुनि पतिला, ती पडे कीं मरून !

२ मे १९४२ ]

### ५ अभागी दृश्य !

दाराशीं बाल बाला बसति बसविती, जाति खिंडारिं थोर
पोटार्थी खालमुंडी विचरतिं डुकरें गाइ, म्हैशी, समोर
पाण्यासाठीं विहीरीभवतिं जमति ते झुंडिनें नारु–रोगी
खेडेगांवीं प्रभातीं प्रतिदिन दिसतें दृश्य नेत्रां अभागी

३ मे १९४२ ]

### ६ हिडिस जिणें !

नदीकांठीं गेलों सहल करण्यां तों हिडिस तें
प्रभातींचें दृश्य क्षण करि मना सुन्न पुरतें !
'नदीभोंतीं प्रातर्विधि करुनि पाण्यांतचि धुणें'
असें खेडेगांवीं जन पशुपरी वेचिति जिणें !

३ मे १९४२ ]

### ७ कसलें लग्न !

लग्नाची अति आस, खर्च करुनी कांतेस आणी घरीं
कीं कर्जास्तव शेतवाडि अपुली दे सावकारा–करीं
जातो पोट भरावया, गिरणिची त्या लागते नोकरी
होतो देह चिपाड, बाइल घरीं स्नेही दुजा स्वीकरी !

५ मे १९४२ ]

## ८ तिची चंगळ!

दोस्ती होत हळूहळू तरुणिची तेथील गुंडांसवें
ठेवी ती म्हशि पांचसात धन कीं हातीं सदाचें हवें
दुग्धाचें धन, शेतवाडि पतिची, ते गुंड, यांचेसह
गांवीं ती करिते मजा, अधन जे दे ताप त्या दुःसह!

६ मे १९४२]

## ९ गांवांतील प्लेग

गांवीं राहि इनामदार-सुत तो, चाखे मर्दे माधुरी
पोटार्थी नर दूर, येति ललना त्यांच्या, यदा त्या घरीं
कज्जे रोज उभारितो नव नवे पाटील त्या सामिल
मोठाले अधिकारि येति सदनीं, तो प्लेग गांवातिल!

६ मे १९४२]

## १० खेडेगांवीं 'वशिष्ठ'

हा येथील वशिष्ठ 'बामण' तया संज्ञा इथें लौकिकी
नाहीं शिक्षण, नाहिं चिंतन, नसे विद्या जुनी ठाउकी
घे पंचांग करीं, मुखें बडबडे कांहीं तरी मंत्रसें
लावी मुंज, विवाह, तर्पि पितरां, सर्वत्र होतें हसें!

६ मे १९४२]

## ११ पाटीलबुवा

हा पाटील, मुशाहिरा न पुरतो ह्या सालिना दो दिन
हातीं ये अधिकार फार म्हणुनी लांचावला हा जन
गांवीं जे व्यवहार रोज घडती हा सर्व ते चालवी
वस्तू निर्जिव वा सजीव मिळते जी जी तयाला हवी!

६ मे १९४२]

## १२ देव कां दानव?

हा येथील तलाठि लेखनपटू सर्वाधिकारी खरा
एकाचें दुसऱ्यास दान करणें हा त्या धनाचा झरा
पाणी, शेत, सुवर्ण, वृक्ष, सदनें, मेले जिते मानव
गांवीं हा बसवी व्यवस्थितपणें हा देव कीं दानव!

६ मे १९४२ ]

## १३ खेडेगांवीं स्वच्छता

'माझें एकच एक पातळ कसें हें घाण केलें तुवां!'
'व्हावें पातळ शुभ्र! सर्प अथवा तो चाललेला हवा!'
'युक्तीनें वर खेचिलेंस भरल्या हातें मला रक्षिलें'
'झालों शेतकरी अतां विसर तें स्वच्छत्व शाळेंतलें १

'झालें शेतकरी म्हणून शहरीं स्वच्छत्व सोडूं अतां!'
'येथें पातळ हें न शोभत, इथें मातींतली स्वच्छता!
तूं येशी जणुं मास्तरीण असतां जातेस शाळेमधें
पेशाला बरवा दिसेल असला पोशाख ल्यावा बुधें २

तूं तेथें उभि, साप तो मज दिसे आला तुला भेटण्या
मातीचे मम हात, ते न बघतां पाहें तुला खेंचण्या
नाहीं येथ हत्यार, ना तुजविना माणूस येथें कुणी
जाऊं निर्झरिणीसमीप, अपणां स्वच्छत्व ती दे झणीं. ३

१३ मे १९४२ ]

## १४ दैन्याचें सदन

खटाऱ्याची यात्रा प्रथम तुज ही आज घडते
प्रवासाची ऐशी दगदग तुला आज पडते;
असें हें दैन्याचें सदन जणुं खेडें महिवरी
वसें येथें, यत्नें शिकवुनि शहाणे जन करीं.

१३ मे १९४२ ]

## १५ स्वभावधर्मच

आजारी पडतांच शेतकरिणी भोतीं तुझ्या सारख्या
आहेती बघ बैसल्या स्वसदना झाल्या जणूं पारख्या
त्यांचे खेंचुनि चित्त घेसि इतुक्या अल्पावधीमाजिं कां?
किंवा सादर पाहुण्याप्रति अशा सर्वत्र या बायका!

१४ मे १९४२ ]

## १६ मनुष्य दिसण्या!

जागा लागत या कमी, कमि हवा, पाणी कमी या गृहीं
सूर्याचा कमती प्रकाश, कमती वस्त्रें, कमी अन्नही
घाणीची परि रेलचेल दिसते, दुर्गंधि मौजा करी
वाटे शेतकरी मनुष्य दिसण्या, साचा गुरांचे परी.

१४ मे १९४२ ]

## १७ उद्वेगजनक!

अज्ञानी, अधनी, अनीतिमय हे येथें सुखें नांदती
रोगांची वसती इथें सततची मृत्यू तयां सोबती
येथें वाव पुरा गुलामगिरिला, श्रद्धा इथें हांसते
धिंगाणा अधिकारि घालिति तया सत्ता समृद्धी इथें!

१४ मे १९४२ ]

## १८ दारुण निराशा

अहर्निश रमे श्रमें सहकुटुंब शेतावरी
पडे जल, पिकें अफाट पिकुनी हंसे अंतरीं
तशांत कबजा करी ऋणद त्या पिकाचा तसा
तया बघुनि तो स्वतांसह वधी मुलामाणसां !

१८ मे १९४२ ]

## १९ त्याचें वैभव

गाडी ही भरली शिगेवरि पुरी, जोडी खिलारी परी
लीलेनें पळवी, उगाच मधुनी चाबूक हा सांवरी
आतां सारथि हा जुवावरि उभा निर्धास्त राहे कसा
'माझें वैभव हें पहा' म्हणतसे तो भोंतिंच्या माणसा.

२० मे १९४२ ]

## २० एकच आश्रयस्थान

'हें माझें घर, ही जमीन भंवतीं, ती आंबराई तशीं
गेलें सर्वच सावकारकरिं हें, माझी दशा ही अशी
मायेचें उरलें कुणी न फिरतों एकाकि मी सारखा
शांती देइल ही विहीर जगतीं तो एक माझा सखा.' १
जोडोनी हात तो घेई । उडी खोल जलामधीं
गेला तो नाहिंसा झाला । स्मरे त्या न कुणी कधीं. २

२७ मे १९४२ ]

## २१ भारवाहक

वाहे शिरीं घागर ही दुधाची । पोटीं तिच्या आग परी भुकेची
त्यांतील लाभे इतुकें न तींतें । ती भार वाही, पय दे दुजांतें !

२८ मे १९४२ ]

## विभाग पांचवा

# निसर्ग--दृश्यें

### १ पर्णांस

तुम्हां देई जन्मा तरुवर करी पालन तसें
तयां देतां शोभा अनुपम अलंकारगणसे
पुढें जीर्णावस्थागत तदुपकार स्मरुनियां
खताच्या रूपें तत्पद चुरित जातां तयिं लया.

१२ फेब्रुवारी १९१८

### २ नेकदार घड्याळ

केवढें दिसत हें घटियंत्र
तें करी प्रबलही परतंत्र;
नेकिनें सतत चालतसे तो
मार्गदर्शक जगाप्रति होतो.

१२ फेब्रुवारी १९१८ ]

### ३ पर्णहीन चांफा

पर्णे शून्य शरीरकांति बघतां दुष्कल्पना ये मनीं
पुष्पांचा भर हा परी! हतमती आश्चर्य मी पाहुनी!
चाफ्या तूं दिससी मला प्रतिकृती त्या मानवाची खरी
नैराश्यें पिडतां अचानकचि ये ज्याच्या जयश्री घरीं.

१३ फेब्रुवारी १९१८ ]

### ४ विपत्तींतही ताठ

पर्णें होती तुजवरि किती, कोण त्यां मोजणारा?
शंका आतां सहज दिसते तोच तूं कीं निराळा
काष्ठावस्थागत तव वरी पांडुता सर्व गात्रा!
राहे तैसा अजुनिहि तुझा पिंपळा तो पवित्रा!

१३ फेब्रुवारी १९१८ ]

### ५ निसर्ग आणि मानव

सूक्ष्मीं सूक्ष्म पिपीलिका जगिं तसा मोठयांत मोठा करी
प्राणी हे दिसती तसेंच असती केव्हांहि कालांबरीं
यांची नावड तेंवि आवड असे प्राक्कालची आजही
त्यांचें वर्णन जें पुराण, नव तें नाहीं कुठेंही दुही? १
आहे त्यांत विभिन्न मानव परी तो नित्य होतो नवा
ऐसा वाहुनि गर्व थोर मिरवी लोकांत तो वाहवा
बाह्यांगीं वरि भिन्न रूप दिसलें तें अंतरंगीं नसे
येथें रावण—राम हे प्रतिगृहीं आहेत पूर्वी असे. २

१३ मे १९२८]

### ६ चिंचेचा वृक्ष

पानें आंबट, पुष्प आंबट तुझें, चिंचे! फळें आंबट
पाणी गोड पितेस, हेंहि कळणें झालें खरें दुर्घट
गोडी ती पुरती कशी पचविशी अस्तित्वही लोपलें
देवानें दिधला स्वभाव तुजला त्या तूं सदा राखिलें.

१३ मे १९२८ ]

## ७ निसर्गांतही बंधुद्वेष?

भानूनें नभ सोडितांच शिरती तारे असंख्यात ते
तेथें निर्भय आप्रभात रमुनी जाती पुन्हा नष्टते
सूर्याचें न तयांस दर्शन कधीं त्यांचें न सूर्यास वा
बंधु-द्रोह नभश्चरांत असतां कां दूषितां मानवा?

१३ मे १९२८ ]

## ८ बालार्क

झाला निस्तेज चंद्र, प्रखरकर असे दूर अद्याप ऐशा
कालीं आली उषा ही, उदयगिरिवरी दूतिका जी दिनेशा
जागें हें विश्व केलें, खग, मृग, जन, ह्या वृक्षवेली तियेनें
भानूचे स्वागता कीं, त्रिभुवन सहजी सिद्ध हो पूर्णतेनें १

आकाशीं उंच जाती विहग, दिनकर-स्वागता गीत गाती
पुष्पें ह्या वृक्षवेली फुलुनि, परिमलामोद वाहे दिगंतीं
गायी ह्या, वासरें हीं, प्रमुदित हृदयें धांवतीं स्वैरवृत्ती
स्नानें सारूनि भावें निरखिति जन हे अर्घ्यदाना गभस्ती २

वाहे हें स्वच्छ कृष्णा-जल झुळ झुळ हा शीत वाहे समीर
कृष्णा-कांठीं बसोनी नवउदित रवी पाहण्या मी अधीर
तेजाचा लोळ येतां, अवचित दिसला प्राचिला त्या क्षणाला
येई पूर्वाचलीं कीं दिनकर कणशः, मोद नेत्रां मनाला ३

आतां बालार्क ठाके, उदयगिरिवरी पूर्णबिंब प्रसन्न
भक्तीनें त्या पहातां अविचल नयनें विस्मरे देहभान
वाटे त्यातें पहावें सतत, परि दिपे नेत्र, कीं तेज वाढे
त्यातें वंदोनि भावें रघु-कुल-जनका याचिलें प्रेमगाढें ४

तूं जीवां जीवदाता जनन तव कुळीं घे प्रभू रामराया
संहारी रावणा तो कपिकुलकरवीं भारता मोक्ष द्याया
त्याचे वंशीं शिवाजी नृप अवतरुनी या महाराष्ट्र देशा
त्यानें स्वातंत्र्य-भूषा प्रथम चढवुनी तोडिलें हिंदपाशा ५

भानो ! आला फिरोनी समय विषम तो प्राण कंठासि आला
आर्यावर्ती न भेटे जन कवणहि जो श्रेय वा प्रेय त्याला
आम्ही आहोंत देवा ! अधम कपिहुनी मावळ्यांहूनि त्या वा ?
किंवा नाशास गेला तव विमलकुलीं तो नरोत्तंस-ठेवा ! ६

१३ मे १९२८ ]

## ९ ठिणगी

आहे क्षुद्र तरी असें अनल मी क्षुद्रानलीं झाकला
वंशीं मूळ पुरूष अर्क अमुच्या मी बंधु दावानला
झंझावात अनन्य मित्र मम तो हें सर्व ध्यानीं धरीं
आणीं ठेविं मुमुर्षु मूढ जनसा तूं पाय माझे शिरीं.

२० मे १९२८ ]

## १० एरंड

तूं न निर्मुनि घन कुंज देसि छाया
न वा लगटे फळ-फुलें तुझी काया
तूं न बाला वृद्ध ना वल्लरी तूं
सांग जन्माचा काय तुझ्या हेतू ?

२० मे १९२८ ]

## ११ लाजाळू

लाजाळू ललना-स्वभाव भुवनीं तेवी नभींही दिसे
भूपृष्ठीं दिवसा अनेक फिरतीं सर्वत्र हीं माणसें
त्यांना लाजुनि चांदणी न गगनीं तेव्हां दिसे एकही
रात्रीचें नभ चांदण्या फुलवितीं निद्रिस्त जेव्हां मही.

२२ मे १९२८ ]

## १२ चांदणी रात्र

हा सुप्रसन्न गगनीं रजनीपतीचा
चाले विहार धरुनी कर रोहिणीचा
द्वेषें निशा जणुं गमे निघुनीच गेली
नाथासवें सवत देखुनि रंगलेली १

अंधार लेश न दिसे दिवसासमान
नाहीं परि प्रखरता तिळ भासमान
ज्योत्स्नामृता पिउनि गुंगुनि विश्व गेलें
निःशब्द निश्चल नितांत जणूं निमालें २

तल्लीनता परम ही विधु-रोहिणींची
भंगो न चाहुलहि लागुनियां दुजाची
ही कल्पना करुनि कां रसिकां जनांहीं
हा वेचिला समय रम्य निजूनि गेहीं ? ३

मी कां तरी अरसिकाधम ! बद्धचक्षु
कीं दृश्य हें बघतसें घन जेवीं भिक्षु
हे रोहिणी शशि न लेशहि लाजलेले
कां माझिया शिरिं तरी अधमत्व आलें ? ४

दांपत्य हें गगनिंचें—न महीतलींचें
त्या घालुनी नियमबंधन हीनतेचें
कां दाविशी अधमता अपुली स्वतांची
शोभा पहा परम रम्य नभोगतांची ५

आहे विशाल—तनु इंदु अगाध—कांति
ही होय अल्पतनु रोहिणि अल्प दीप्ति
हा रोहिणी—रमण, चंद्र—विलासिनी ही
नातें परी प्रणयपूर्ण सदैव राही ६

प्रेमप्रवाह निरपेक्ष अनंत वाहे
तो कांति—काय—गत तुल्यपणा न पाहे
हो चित्तमीलन निसर्गकृतोपदेशें
द्वैतोदधींत जणुं मौक्तिक तें प्रकाशें. ७

भानू जरी तुजहुनी अति दीप्तिमान
त्याचें न तेज करि मानस सुप्रसन्न
तो एकलाचि म्हणुनी प्रखर प्रदीप्त
कांता न, सोदर न, मित्र न त्या, न आप्त. ८

इंदो अनंत तव बांधव सन्निधीं हे
उत्फुल्ल हें गगन त्यास्तव नित्य राहे
ही कामिनी, सुहृद सोदर हे अनेक
ते चालले तुजसवेंच सदा विशंक ९

इंदो तुझा बघुनि हा परिवार दिव्य
गार्हस्थ्य भूगत गमे गगनींहि सेव्य
तूं शांत वृत्ति वरुनी निज तेज सर्वा
केलेंस सह्य अपमान परी न ठावा. १०

तेजीं तुझ्या प्रतिदिनीं क्षय वृद्धि होते
ही रोहिणी विरहदुःख तरी न देते.
तेजें विहीन तुजहूनि सदाच तारे
अंधारिं दर्शदिनिं हे लपतात सारे ११

या रोहिणीसम तुला प्रिय यामिनी ही
तत्संगतींच चमके तव दीप्ति देहीं
त्वत्संन्निधींच रजनी दिसते प्रसन्न
निस्तेज दर्शदिनिं होत अतीव खिन्न १२

सापत्नभाव सवतींत दिसे न लेश
त्या बांधतां दिसत निर्मल प्रेमपाश
दोघी सदैव रमती तुझिया सभोंती
एकत्र वास, वदनीं तरि येत कांती १३

गार्हस्थ्य तूं परम पावन सेविसी हें
दूरस्थ भू अमित मोद म्हणूनि लाहे
गार्हस्थ्य दोषरहित स्तवनार्ह ऐसें
होतें स्वतांस सुखदायि परास तैसें. १४

२६ डिसेंबर १९२८ ]

## १३ कृष्णपक्षांतील चंद्रास

आली तुला अवदशा फिरुनी अतां ही
नाशा कला नियत प्रत्यहि एक जाई
तेजस्विता अतुल पावुनि पूर्ण शांति
इंदो दडून बसशील कुठें दिगंतीं ! १

तेजक्षयें तुजसि वाटुनि तीव्र लाज
येसी विलंब करुनी उदयास रोज
आकाश आक्रमुनि होत न तोंच भानू
येऊनि येत तुज दुस्थिति काय वानू २

व्योमीं विषण्ण वदनें असशी उभा तूं
मित्रास तैं उगवतां गमतो न किंतू
त्वद्दीनता बघुनि संशय थोर येतो,
भास्वान तुला स्वकरिं बांधुनि थांबवीतो ३

ज्योत्स्नावरें कुटिल कज्जलता स्वदेहीं
घेतां खरा रसिक कंपित-चित्त होई
इंदो न हें बघवतें विपरीत दृश्य
येथें न कर्म तव, दैव परंतु दूष्य ४

ही काळिमा तनुगता तव वृद्धि पावे
दिव्यौषध त्रिभुवनीं न तुला मिळावें?
कृष्णत्व वाढुनि पुढें परिपूर्ण चंद्रा!
अंतीं दशा तुज सुधाकर ये अभद्रा ५

झालास आजवरि तोषविता जगाला
चंद्रा अकारण तुझेवरि येत घाला
गेलें तुझें विभव पूर्णपणें लयाला
हीनत्व हें चिकटलें तुझिया कपाळा ६

वाटोनि लाज जगता त्यजुनी सुदूर
जाशी परी ढळढळा रडतो चकोर
आकाश भूतल नभःपटलीं दडालें
इंदो तुझ्या विरहिं दुःखित विश्व झालें ७

शोकार्त तूं रडसि बैसुनि एकलाच
आम्ही तुला गमत बांधव काय नीच?
तूं अंतरंग अमुचें बघ पारखून
गेलें असे तव सख्या! विरहें जळून ८

सृष्टींत या अचल ना तिळमात्र कांहीं
ही दुर्दशा तुज विधो चिरकाल नाहीं
होतो उद्यां उदित नूतन मास खास
कीं भाग्य पावत तुझें फिरुनी विकास. ९

२७ डिसेंबर १९२८ ]

## १४ चंद्राचे अश्रू

ज्योत्स्नामयी धरि सुधाकर रम्य काय
त्या अक्षय क्षय परी करि हाय हाय!
त्याचेंच नेत्रजल हें स्रवतें विशुद्ध
होतें परी दंव म्हणूनि जगीं प्रसिद्ध.

२७ डिसेंबर १९२८]

## १५ सूर्यग्रहण

अस्ताचलीं दिसत हा दिनराज खिन्न
पूर्वेस हा रजनिनाथ करी प्रसन्न
झाला त्वदाश्रित विधू तुझिया समान
भानो अगाध महिमा तव हाच जाण १

झाला अतां उदित भास्कर पूर्वभागीं
अस्ता निशा-पति निघे परि हा अभागी
चाले सदैव परिवर्तन हें जयाचें
तो थोर जो न मनि यास्तव अल्प कांचे २

हा श्रांत येत दिननायक पश्चिमेला
कां चंद्रमा न अजुनी उदयास आला?
लागे विलंब शशिच्या उदयास कां हा?
आली निशा न तरि तत्पति येत गेहा. ३

ये चंद्र हा गगनिं पूर्वगिरी चढून
कां हा परी दिसत एक कलावहीन
ही काळिमा बघुनि वाटुनि थोर लाज
हा वाटते उगवला उशिराच आज ४

भानो न वैभव तुला बघवे विधूचें
त्या लावणें क्षय न लक्षण शूरतेचें
होईल दर्शदिनिं हा जरि पूर्ण काळा
नेईल राहु तुज त्या दिशिं त्या स्थितीला. ५

२ जानेवारी १९२९ ]

## १६ ज्योत्स्ना

ज्योत्स्ना कोमल कामिनी परि दिसे सर्वत्र संचारिणी
धेनूशीं विहरे निशंकित तशी ही श्वापदांचे गणीं
खेळे पंकज वाटिकेपरि मुदें ही कंटकांसंगति
प्रासादीं दिसतें प्रसन्न मन, ती तेवी स्मशानीं रती

कृष्ण प्रस्तर ही सहोदरसम स्वालिंगनें आदरी
शीत स्वच्छ सरोवर प्रिय तिला हें नाथशय्येपरी
इंदूही प्रतिबिंब रूप धरुनी येतां तडागीं दिसे
कांतेशी रममाण कांत असतो युक्तिप्रयुक्तीमिषें

२ जानेवारी १९२९ ]

### १७ अमावास्येची रात्र

निशा दर्शाची ही घन–तिमिर–वस्त्रावृत–तनु
धरी शीर्षीं तारांकित गगन हें छत्र अतनु
उलूक व्याघ्रादी भयरहित संचार करिती
अनीतीचा चाले विकृत विषयीं नाच जगतीं !

७ जानेवारी १९२९ ]

### १८ स्वार्थी रसिक !

होतें मी केवढीशी, मज नसतिं फुलें पान तेंही नसेना
एका बाजूस बैसें, सहन करिं मनीं यातना थोर नाना
आला तो पावसाळा, न कळत हृदयीं फार उल्हास वाटे
मेघाच्या मी खुराकें, अनुदिन सुदशा पावलें, दैन्य आटे. १

झालें ही केवढी मी, महि तरुलतिका व्यापिल्या भोंवतील,
पानांची ही समृद्धी, अगणित सुमनें शुभ्र हीं गंधशील
साऱ्या या प्रांतिं माझा परिमल पसरे पांथ हो मंत्रमुग्ध
एकाकी मी न तुष्टा, दशदिशिं जनता सेवि आनंद शुद्ध २

येथोनी हे अडाणी कितितरि दिसती रोज जातां प्रवासी
थांबोनी संनिधानीं मम पळभर ते तुष्ट होती सुवासीं,
जातांना जाइ कोणी स्वकरिं मम फुलें घेउनी एकदोन
त्यायोगें मी न होईं विगलित–विभवा, प्रांत वा गंधहीन. ३

आला हा कोण आजी तरुण तरुणिला संगतीं घेउनीयां
ठाके दुर्भाग्य माझें मजपुढति उभें; वैभवा नष्ट व्हाया
आतां लागे न कांहीं अवधि, नुरत ही येथली गंध–कीर्ति,
ऐसे वेली वदे तों तरुवरि चढला तो युवा प्रेम–मूर्ति ४

वेलीचीं सुमनें समस्त खुडिलीं कांतेचिया पूजनीं;
भारे घेउनि तों अशिक्षित तिथें दांपत्य आलें कुणी
वेली नागविली बघून वदती ते नागरीकाप्रती
वेलीला लुटिलें अम्हांहि रसिका, स्वार्थी सदा त्वत्कृति. ५

१९ सप्टेंबर १९३८ ]

## १९ रमणीय स्थल

सूर्याचा अस्त किंवा उदय दिसतसे ज्या स्थलीं रोज नेत्रां
वारा वाहोनि जेथें दिनभर अमुच्या येतसे सौख्य गात्रां
मित्रांची जेथ लाभे सहवसति सदा मानसा मोदकारी
जातां स्थानीं अशा या हृदय न खुलतें, कोण तो देहधारी!

१९ एप्रिल १९४१ ]

## २० सूर्यास्त

अस्तास जात रवि, लाल किती जहाला
दिग्भाग त्या भंवतिं लालहि रंग त्यांला
तें दृश्य सुंदर बघोनि रमूनि जाई
तों जाय भास्कर, न तें नभि दृश्य राही!

२० एप्रिल १९४१ ]

## २१ प्रसन्न परोपकारी

आम्राखालीं दिनभर वसें, थोर आनंद लाहे
आम्राची ही उपकृति कशी फेडुं मी नाकळे हें
याला कांहीं गरज न दिसे, हा सदाचा प्रसन्न!
सेवावें मीं हंसतवदनें दुःखिता यासमान.

६ एप्रिल १९४२ ]

## २२ जीवो जीवस्य जीवनम्

होता लांबच लांब साप दिवसा वाळूंतुनी तो पळे
पाण्यासन्निध जाउनी पहुडला, आराम त्याला मिळे
लाठ्या घेउनि साथिदारसह मी जाया निघालों तिथें
तों त्या घेउनि घार जाय निघुनी वेगें कळेना कुठें.

२३ एप्रिल १९४२ ]

## २३ सुख कीं दुःख!

प्रभातींचा हा मंद गार वारा
करी उत्साहित मानसा शरीरा
वध्य पशुला करि पुष्ट शीत–वात
ऊन त्याचा करणार खास घात.

२९ एप्रिल १९४२ ]

## २४ पृथ्वीची झोंप

सूर्याच्या तीव्र तापें गलित तनु मही शीतवातें निजेली
चंद्राच्या चांदण्याची झिरझिरित नवी पांढरी शाल त्याली
विश्रांती पूर्ण लाहो म्हणुनि न उठली रात्रिची एवढीही
देखोनी बालभानू हंसतमुख उठे कीं सुरू कार्य होई.

१ मे १९४२ ]

## २५ वर्षाकाल

झाला पाउस जोरदार, धरणी लाभे अतां शांतता
हर्षें वृक्षलताहि येति फुलुनी, धूलीस ये स्तब्धता
वाहू लागति आपगा, विहिरिंना पाणी चढे आंतुनी
जाऊं आपण, दृश्य सुंदर बघूं येतेस कां साजणी?

६ मे १९४२ ]

## २६ सुखद संभ्रम

नक्षत्रें फुललीं असंख्य गगनीं शोभा तशी भूवरी
विद्युद्दीप अनेक हे झळकती स्पर्धा दिसे चालली
देखावा धरणीवरील बघुं हा आकाशिंचा पाहु वा
होते धांदल, शब्द येति सहजी पाहूनि हें वाहवा!

६ मे १९४२ ]

## २७ जलौघस्नान

धों धों वाहत तो जलौघ बघुनी आनंदली ती अती
स्नाना त्यांत शिरे तशीच, शिरलों मीही तिचे संगतीं!
स्नानें शीतल त्या प्रसन्नपण ये, सूर्यास आम्ही म्हणूं
फेकी रश्मि सुतीक्ष्ण ते तव अतां भीती न वाटे अणू.

९ मे १९४२ ]

## २८ शीतोष्ण संगम

कण सोडी अग्नीचे रवि त्या वाहोनि नेतसे वारा
संगम शीतउन्हाचा देतो संतोष आमुचे शरिरा.

१० मे १९४२ ]

## २९ कडक उन्हाळा

उन्हाळा हा वाढे दिवस दिसतो भीषण किती!
करी जो तो हा हा! उदक न मिळे कष्टुनि अति!
तरूंची छाया ही सुखकर गमे एक पळ कीं–
उन्हाळी वाऱ्याच्या कढत चटके देति झुळुकी!

११ मे १९४२ ]

## ३० पावसाळ्यानंतर

धों धों पाऊस आला नगरगत जुनी धाण गेली धुवून
हर्षे उद्यान नाचे, मनुज पशु तसे जाहले हे प्रसन्न
गंगेचें केवढें हें हृदय, जल तिचें घाण घेऊनि धांवे
गेले मेघ स्वकार्या फिरुनि गगनिंचा चंद्र आतां बळावे.

१८ मे १९४२ ]

## ३१ कुत्रें!

हें श्वान यास नमनें मम शेकड्यांनीं
मानी धन्यास इतरा न कुणास मानी
हें प्राण देइल धन्यास्तव ऐन वेळीं
लोकांचिया छळणिं सिद्ध तिन्ही त्रिकाळीं!

१९ मे १९४२ ]

## ३२ गाय

ही गाय माय अमुची कृतिनें न बोलीं
दुग्धें मुलां, तरुण वृद्ध जनास पाळी
बाळें हिचीं असतिं जीव कृषीवलांना
वाहून नेति मनुजाप्रद वस्तु नाना १
नेत्रास मोहक बलप्रद खाद्य पोटा
चर्में हिच्या न पदिं तापद ऊन कांटा
ही प्रेमदान करि, घेइ तसें दुजांचें
नातें जुनें निकटचें इजशीं जनांचें २

१९ मे १९४२ ]

## ३३ गाढव

हा गर्दभ भ्रमुनि भक्षण मेळवूनी
ये मालकास मदतीस किती दिशांनीं
याचें हत्यार पद मागिल तीक्ष्ण भारी
याचा ध्वनी गगनिं मारितसे भरारी १

खेळास साह्यकर सान मुलांस फार
तीं स्वार होउनि तयावर देति मार
कीं हा मजा करित धांवत जाइ खासा
तो सान थोर जमती बघण्या तमाशा २

पुच्छासि बांधुनि दिवाळि–सणीं फटाके
देतात कोणि शिलगावुनि वीर बांके
तेथेंच बांधिति डबा शिमग्यांत कोणी
दीपावलींत शिमग्यांत विनोद आणी ३

क्रीडा तशी बघुनि गर्दभ–गर्दभीची
पांचावरी बसत धारण मानवाची
हा मूर्तिमंत जगतांत विनोद–कष्ट
कष्टें निकृष्ट मरतो हंसतो वरिष्ठ ! ४

१९ मे १९४२ ]

## ३४ शिकारी कुत्रा

हो श्वान त्या धनगराप्रति सव्यहस्त
हा एकला कळप रक्षितसे वनांत
ह्या मानिती जन शिकारि अजिंक्य वीर
ठाके न डुक्कर, ससा, मृग, यासमोर १

बर्फांत मार्ग चुकल्या मनुजास नीट
दावोनि मार्ग, करि साह्य तया अचाट
संदेश हा समरिं पोचवितो अचूक
याचें कुणी करिति वाहन षोकि लोक २

यासारखा सुहृद कोण दुजा जगांत
प्राणार्पणा सतत सिद्ध सुहृत्सुखार्थ
हा विस्मरे न कधिंही अपुल्या जनास
आश्चर्य तत्स्मरणशक्ति अपूर्व खास. ३

१९ मे १९४२ ]

## ३५ मातबराशीं सामना!

धावे मोटर तीसवे पळतसे हें श्वान वेगें किती
आकारें दिसतें लहान परि तच्छक्ती अती निश्चिती
उत्साहें पळतें अजून, थकलें, धावे, फिरे मागुती
थोराशीं करि पोर थोर झगडा, आनंदली मन्मती!

२० मे १९४२ ]

## ३६ केवळ सृष्टिक्रम

'तूं बावळा! तुजपुढें तुझियासमोर
तारे विशंक फिरती नभिं सानथोर
खालीं महीवर खुशाल अनीति नाचे
माझा सखा म्हणुं तुला तरि चित्त कांचे १

माझा पहा अरुण सारथि ये नभांत
कीं तारका हळुं हळूं पळतां विलुप्त!
मी एकटाच फिरतों गगनीं अजिंक्य
उद्योग भूवरि, अनीति विधो! अशक्य २

भानूचे बोल हे चंद्रा । ऐकुनी सृष्टि बोलली
तूं न उच्च, न हा नीच । ही माझी नियमावली. ३
२० मे १९४२ ]

## ३७ माझी लाज, पण चंद्राची?

चंद्रा निश्चल दृष्टि बालक बघे, तो बालकाचे मुखीं
डोळे रोखुनि पाहते, जणुं दिसे ध्यानस्थ तेव्हां सखी
तें आल्हादक दृश्य थांबुनि बघें मी मागच्या पाउलीं
ये चंद्रावरि मेघ, मी पण दिसे कीं लाडकी लाजली!
२२ मे १९४२ ]

## ३८ सर्वांचा प्यार केवी?

चंद्राच्या वर्णनानें कवि शिणविति कां आपुली दिव्य वाणी
त्याचें आल्हादकत्व स्थिर टिकत कसें रोजचा मी अशोनी?
सर्वांचा प्यार केवी? स्तुति मिळवित तो निंदकांचे समाजीं
त्याची कांती सदाची–सुजन कुजन वा–शांति देण्यास राजी.
२२ मे १९४२ ]

## ३९ जगाचा शांतिदाता

हाडाचा चंद्रराया लहरि, न कधिही तो उद्यां जेंवि आज
केव्हां तो पूर्ण केव्हां पलहिन उगवे, काट वा वाढ रोज
विश्वासा पात्र नोहे, तरिहि जन कसे, त्या पहाया भुकेले?
आहे तो शांतिदाता, तन-मन जगता ताप ना एक वेळे.
२२ मे १९४२ ]

## ४० ओंगळ तरी मंगल

क्षतें शत तनूवरी, तरि फिरे चरे म्हैस ही
वरी बसति काक, मच्छर तिला न जाणीवही
पशूंत पशु बुद्धिनें अधम हा तसा ओंगळ
दुधाळ म्हणुनींच ती मनुज मानितो मंगल

२९ मे १९४२ ]

## ४१ पोपट

पाही हा शुक खाइ केवळ फळें, झाडावरी राहतो
चंचू लाल कठीण, रंग हिरवा, ह्यांचा थवा हिंडतो
ह्याला जें शिकवाल तें वदतसे हा माणसाळे जरी
हा विश्वास्य न, यास ये लहर कीं हातावरी दे तुरी!

२९ मे १९४२ ]

## ४२ वडाराचा दोस्त

दगडा वाहण्या रेडा । सामर्थ्यें पुरुनी उरे
त्या योगेंच वडाराला । रेडा प्यार पुरा ठरे.

३० मे १९४३ ]

## ४३ सुखद एकी

आंबा झाडावरि न पिकतो, लागतो पाड तेथें
झोपे जेव्हां तृणशयनिं तो पावतो पक्कतेतें
सृष्टीचा तो तनय विनयें मानवी साह्य याची
एकी होते सुखद सकलां सृष्टिची मानवाची

३१ मे १९४२ ]

## ४४ स्पर्धा

आकाशींच्या प्रदीपा बघुनि तम शिरे कंदरीं घोर रानीं
तेथें वास्तव्य त्याचें दिवसभर ठरे, भानुच्या अस्तमानीं
संचारातें निघोनी अवनि सकलही व्यापितें अल्पकालीं
स्पर्धा तेजस्तमांची अनवरत अशी चालली भाग्यशाली.

३१ मे १९४२ ]

## ४५ निसर्गाचा इषारा

प्रभातीचा हा मंद गार वारा
निसर्गाचा जणुं निद्रितां इशारा
'उठा प्राशन पीयूष करा प्रेमें
मस्त होउन दिन सर्व करा कार्यें.'

४ जून १९४२ ]

## ४६ चंद्रसूर्याची स्पर्धा

प्राचीला उगवे शशी प्रतिचिला भानू निघाला घरीं
तेजोगोल समान दोन गगनीं, दोस्ती न त्यांची परी
येतां एक निघून जाय दुसरा, स्पर्धा सदा चालली
त्या स्पर्धेंतुनि लाभती दिननिशा आम्हांस भूमंडलीं.

९ जून १९४२ ]

## विभाग सहावा

# देव-धर्म, वर्ण-जाति, नीति-संस्कृति

### १ देशाकरितां देवभक्ति!

देवाकारण अर्पितो प्रमुदितें चित्तें स्व—सर्वस्व जो
बुद्धीनें जड तो असो तरल वा, तो मार्ग कांहीं भजो
त्याची श्रीहरि एकनिष्ठ करितो सेवा बळीची जशी
देशाकारण देवभक्ति तरि कां सेव्या न शस्त्रा अशी ?

५ डिसेंबर १९२८]

### २ बहिर्मुख

बाह्यांगीं गुंग होसी विसरुनि पुरतें सार जें अंतरंगीं
दृश्याचा ध्यास घेसी वळुनि न बघसी त्या अदृश्यीं अभंगीं
तेणें वांट्यास वाटे सततचि तुझिया दुःख निर्भेळ आलें
आत्मारामीं मनाचा लय अनुभवितां न्यून तें काय ठेलें?

१५ डिसेंबर १९२८]

### ३ श्रम तो रिकामा

पोटीं उपास तरि पाहत कोण धर्म
अन्नार्थ मानव करी शुभ, निंद्य कर्म!
जो धर्म पोट भरल्यावरि येइ कामा
तो सांगुनी डिवचणें श्रम तो रिकामा!

१८ जुलै १९३८]

### ४ मानव्याच्या निद्रेमुळें !

ठायिं ठायीं मानव्य हें निजेलें
तया पोटीं उत्पन्न देव झाले !
जरी जागृत मानव्य वरि विकासा
देव जाती अपसूक तरि विनाशा.

१२ आगस्ट १९३८ ]

### ५ कां असत्या भजावें !

रजा आतां द्या देव-देवतांना
जन्मदाते ते अरिष्टांस नाना !
अतां त्यांचें थोतांड नुरो द्यावें
सत्य कळतां कां असत्या भजावें ?

१२ आगस्ट १९३८ ]

### ६ मानव्याचे मारेकरी

तोडा जाती, गाडा धर्म । येथें मानव्याचें काम १
जातिधर्म मानव्याचे । मारेकरी अंधारींचे २
जातिधर्मांनीं मानव । दोन पायांचा गाढव ३
जातिधर्मांचे राउळीं । शिरे त्याची पूर्ण होळी. ४

२९ जानेवारी १९४१ ]

### ७ कर्तृत्वहीनांचे सखे

जातिधर्मांचे रक्षक । जाणा शुद्ध नपुंसक १
ज्यांना कर्तृत्व पारखें । त्यांचे जातिधर्म सखे २
जातिकर्म लपेटिती । ज्यांच्या मृत्यूची निश्चिती ३
जातिधर्मांचे चिखलीं । रुतलीं तीं मेलीं मेलीं. ४

२९ जानेवारी १९४१ ]

## ८ आज जातो जीव त्याचें काय ?

झालें गेलें त्याचें स्तोम माजवितां । पायीं तुडवीतां वर्तमान १
पंचांगींचे दिन भावें पाळितसां । चालू इतिहासा डावलूनी २
प्रल्हाद–घर्मांची करितसां कींव । आज जातो जीव त्याचें काय ? ३
आजच्या काळाला घालाया वेसण । सिद्ध व्हा सोडून जीर्ण जुनें. ४
२४ फेब्रुवारी १९४१ ]

## ९ दैवाचें खूळ

सृष्टीशीं झगडा करोनि जगतीं केली सुखाची खनी
तो तद्विक्रम विस्मरोनि, मनुजा तूं त्याज्यसा लेखुनी
दैवाचें जगिं खूळ माजवुनि तें, कल्याण केलें खरें !
भेटे देव न तो, मनुष्य अपुलें कर्तृत्व तें विस्मरे.
९ मार्च १९४१ ]

## १० कल्पनेच्या पाठीमागें लागून !

अंतर्बाह्य अहर्निशीं झगडते सृष्टी स्वतांच्या सवें
श्रीमंती झगड्यांतुनी मिळतसे, सौंदर्य लाभे नवें
कालानें निपजे मनुष्य तिचिया पोटीं अशा या क्रमें
त्याची बुद्धि अपार पाहुनि मनीं सृष्टीसती संभ्रमे १

या दोघांत अतां पुराण झगडा रूपें नव्या चालुनी
काव्यें, शास्त्र, कला, समाज, नव घे जन्मा जुना लोपुनी
हा सौंदर्य विकास नेणुनि, जगत्कर्ता कुणी कल्पुनी
सत्या सोडुनि त्या धरून बसतो धिक् धिक् तया लागुनी ! २
९ मार्च १९४१ ]

## ११ कडू कारलें

साखरेंत जरि किती घोळलें, कडू कारलें राहे
चातुवर्ण्यी तशी थोरवी स्त्रीशूद्रांना नोहे!

२० एप्रिल १९४१ ]

## १२ विस्मय !

जो नाहीं दिसला कुणास कधिंही, जो कल्पनेची प्रजा,
न्याया शासनिं ज्याचिया कटु दशा अन्याय मारी मजा,
ज्याचे शत्रु सुखांत, भक्त फिरती दुःखांत रानीं वनीं
वाटे विस्मय लोक कीं रमति त्या देवाचिया चिंतनीं!

२६ मार्च १९४२ ]

## १३ बाटला तर माणूस !

'मानव्याचा जय करितसे तें परी दूर राहीं,
स्पर्शाचेंही सुख न मिळतें, दर्शन स्पष्ट नाहीं!
नम्रत्वें मी पुसत 'करिसी राग माझा असा कां?'
'सोडी धर्मा, त्वरित मिळुनी जाउं कीं एकमेकां!'

१ एप्रिल १९४२ ]

## १४ आतां पुढें रोदन !

संन्यासी, वनवास, देह भगव्या वस्त्रें तुवा वेढिला
आतां ईश्वरचिंतनाविण दुजें सत्कार्य नाहीं तुला!
कैंचा ईश्वर तो, न कांहिं कळतें, कैचें तरी चिंतन?
दृश्या सोडिसि, कल्पनेस धरिसी, आतां पुढें रोदन!

८ एप्रिल १९४२ ]

## १५ निर्लज्जतेचें जिणें !

संन्याशा दररोज भोजन मिळे काशीस कष्टाविणें
तेथें राहति ते कितीतरि सुखें उन्मत्त ऐदीपणें
गंगास्नान, परेश–दर्शन, सदा तच्चिंतनीं राहणें
हीं कामें करण्यांत कंठिति जनीं निर्लज्जतेचें जिणें !

८ एप्रिल १९४२ ]

## १६ उज्ज्वल आर्यसंस्कृति !

काया कष्टवितो अहर्निश सदा तो अन्नवस्त्राविणा
देतो दोष दुजा कुणास न परी दे आपुल्या प्राक्तना !
श्रद्धा बाळगतो मनांत फळ कीं स्वर्गीं मिळे निश्चित !
ही ती उज्ज्वल आर्यसंस्कृति ! तिचा संदेश हा शाश्वत !

१२ एप्रिल १९४२ ]

## १७ जगविख्यात !

अन्नाचा हा जनक परि त्या अन्न खाया मिळेना
वस्त्रें निर्मी दिसत परि हा नागडा हिंडतांना
अन्यासाठीं मरण वरितो व्यर्थ येथें शिपाई
आर्योंची ही जगतिं कवणा संस्कृती ज्ञात नाहीं ?

१४ एप्रिल १९४२ ]

## १८ खोटी कल्पना

'वारा, पाउस, ऊन, शीत तुजला सोसे न कांहीं जरी
मृत्यूची तरि कास सत्वर धरीं, जाई सुखाच्या घरीं.'
'कोठें स्वर्ग ? उगाच काय वदसी ? खोटीच ती कल्पना
ऐसा राहिन मी, दिसेल तरि तें स्वातंत्र्य या लोचनां !'

१५ एप्रिल १९४२ ]

## १९ शब्द नको, कृति पहा!

'धर्माची, संस्कृतीची जगभर जन हे मारिती कां बढाई?'
'त्या शब्दांना भिऊनी अनपढ जनता थांबवीते चढाई.'
'मोक्ष स्वर्गादि सारी फसवणुक पुरी वाटते कां तुम्हांला?'
'तें धर्मात्म्यां विचारा, निरखुनि पुरतें थोर त्यांच्या कृतीला!'

१९ एप्रिल १९४२ ]

## २० हा कुठल्या देवाचा कायदा?

राबावें दिनरात, पोटभर ना खाया मिळे एकदां
देवानें कुठल्या असा बनविला सांगा तुम्ही कायदा?
तोंडानें भटजी जरा बडबडे कीं त्यास सारें मिळे
सारी ही तुमचीच गुंडगिरि, हें आम्हांस आतां कळे!

२० एप्रिल १९४२ ]

## २१ बुरसलेली कल्पना

मी आणीन फुलें हवींत तितकीं शोभेस, वासास वा
देवाला परि एक देइन न, ती आपत्ति कां ओढवा?
देवाच्या कधि काळच्या बुरसल्या त्या कल्पनेला अतां
या शास्त्रीय जगांत घट्ट धरुनी कां जीर्ण होता स्वतां?

२२ एप्रिल १९४२ ]

## २२ उलटी विचारसरणी

वेश्या आणि वकील एक, तनु ती, बुद्धी विकी हा घना
बुद्धीचा विकरा तनूहुनि करी अत्यंत हानी जनां!
वाटे ती अतिनीच, ह्या परि मिळे मान्यत्व लोकीं महा!
नीतीची उलटी विचारसरणी दे साथ पापग्रहा!

२६ एप्रिल १९४२ ]

### २३ चिखलांत बुडथ्या कां?

बी. ए. केलें शिकवुनि मला चूक त्याची खरी ही
पूर्वीची ती अडगळ अतां मन्मना कैंवि मोही!
देवा धर्मा किमपि नुरला अर्थ उत्साहदायी
तो हो आतां चिखल, डुबक्या त्यांत कां सुज्ञ घेई?
२७ एप्रिल १९४२ ]

### २४ तिचेंच तेवढें पाप कां?

वेश्यांचीं सदनें अनीतिकरणें हें बावगें बोलणें
नीती आणि अनीति सर्व कळतें आम्हां न कांहीं उणें!
धंदेवाइक चांगले जगिं जसे वाईट तैसे कुणी
वस्तूंचा सगळयाच विक्रय जगीं चाले, न वेश्या उणी!
२८ एप्रिल १९४२ ]

### २५ लोकभ्रम

मी भंगी, भंगिकामें करिन, न मिळतीं, त्यामुळें मी उपाशी
'मांगाचें काम' मातें म्हणति 'कर,' कसें तें करूं धर्मनाशी!
धर्मासाठीं मरावें उदरभरणही धर्मनाशें न व्हावें;
माझा तो पाठिराखा प्रभुवर, भजतों त्यास मी भक्तिभावें!'
३० एप्रिल १९४२ ]

### २६ मानव्य या कोठुन?

बाया या फिरती विवस्त्र, मडकीं नाहींत यांना घरीं
कोठें कांहिं करून चार तुकडे या घालिती स्वोदरीं
नीती आणि अनीति यांस कसली? मानव्य या कोठुन!
पोटाचे प्रिय पूजन प्रिय तसें या काम-संतर्पण!
३ मे १९४२ ]

## २७ घोर अन्याय!

नांदेना बायको कीं ठरविति जन हे मूढ वा दुष्ट तीतें
पाही कोणी न शल्य प्रतिघटिं तिस जें टोचतें ताप देतें!
माफी देती पतीला, व्यसनरत जरी, घोर अन्याय चाले!
चालायाचें असें जों उखडुन न जुनें टाकिती क्रांतिवाले.

४ मे १९४२ ]

## २८ समाजांतले सराटे

अध्यात्माची निशा ये, मनुज भरभरा लागतो कीं उडाया
लेखोनी नीच साऱ्यां उसळवि वचनीं उच्चतेच्या बढाया!
राहाया स्थान नाहीं धरणिविण परी या महात्म्यास कोठें
प्रत्यक्षीं वागतांना कळत अनुभवें हे समाजीं सराटे!

७ मे १९४२ ]

## २९ जगाची कीड

अध्यात्म ही कीड जगास साऱ्या
तें मानवाच्या उडवी भराऱ्या
त्याला करी निष्क्रिय गुंगवोनी
सौंदर्यशाली परि मूर्त हानि.

७ मे १९४२ ]

## ३० असें सर्वत्र केव्हां होईल!

देवा धर्मा सोडचिठ्ठी दिली तूं
तें सांगाया मानिसी तूं न किंतू
स्त्रीवर्गी तूं एकटी एक आज
होतो ऐसा केधवा स्त्री समाज!

७ मे १९४२ ]

### ३१ शुद्ध पण लोकविरुद्ध !

मी तीतें भगिनी गणूनि सदनीं जाई तिच्या नेहमीं
निःसंकोचपणें विनोद करुनी होतों अम्ही संयमी !
लोकांना परि वाटलें विष जणूं तें आमचें वागणें
केलें शेवटिं रूढिबाह्य म्हणुनी आम्हां नकोसें जिणें !

९ मे १९४२ ]

### ३२ अनैतिक नीति-नियम !

ज्या नीती-नियमें समाज पिळला जातो न ते नैतिक
ज्या नीती-नियमें समाज मुकतो ज्ञाना, न ते नैतिक
ज्या नीती-नियमें समाज दुबळा होतो न ते नैतिक
त्या नीती-नियमां अनीति ठरवा सर्वत्र बेलाशक !

११ मे १९४२ ]

### ३३ श्रद्धेचें चक्र !

चक्रांत हात गवसे कीं जातें खेचलें शरीर जसें
श्रद्धेस वाव इतुका, मानव कीं रूढि-कर्दमांत फसे.

१३ मे १९४२ ]

### ३४ दोनच जाति

आहे मानव मी, न जाति मजला, ना धर्म कांहीं मला
जाती दोनच मानवांत पुरुष-स्त्री-माहिती सृष्टिला
या दों जातिमुळेंच पूर्ण पुरुष-स्त्रीनां अभिन्नत्व ये
या दों जातिमुळेंच बाधित न हो मानव्य विश्वीं क्षयें.

१७ मे १९४२ ]

### ३५ नीति !

मदांध धनको धरी कर तिचा बलें त्या दिनीं
तिचा पति चिरी तया समय योग्यसा साधुनी
समस्त गणिती तया निरपराधि त्या गांवचे
तुरुंग चिरकाल त्या मत पडे परी नीतिचें.

१८ मे १९४२ ]

### ३६ शिक्षा !

नाथाचें शव माझिया उचलण्या येतें न कोणी कसें ?
धर्माचें करितो इसें उकलुनी तद्रूप दावीतसे !
सांगे क्रांतिविना जगांत दलितां नाहीं खरें मोचन;
वाटे हें दिधलें समाजपुरुषें वीरास त्या शासन

२६ मे १९४२ ]

### ३७ अज्ञानाची संतति

'आहें मी व्यसनी पुरा, न कवणा माहीत माझी कृती
सारे मानिति थोर सज्जन मला, माझी न त्या संमती'
'अज्ञानीं तव सज्जनत्व निपजे, अज्ञानिं तेवी तव
जन्मे देव, परंतु सज्जन तुम्ही त्या आणितां वैभव.'

५ जून १९४२ ]

### ३८ आधीं तृप्ति, मग नीति !

'तुझा त्वन्मातेचा जनक बघ हा थोर पुरुष'
'सुता त्याची तेव्हां, प्रणयिनि अतां मी समरस
कुमारी मी दुःखी, विधुर सदनीं तो तडफडे
तृषार्तांना भेटे जल तरि न नीतीस्तव अडे.'

८ जून १९४२ ]

## विभाग सातवा

# जीविततत्त्वें व व्यवहार

### १ कर्मयोग

तूं वर्तमानसमयीं करिं वृत्त थोर
त्याच्यांतुनी निघत थोर भविष्यकाळ
केला अपव्यय तुवां अपुले वयाचा
ये काल हा म्हणुनि निर्घृण दीनतेचा! १

केला प्रयत्न हुकला तरि दोष कैचा!
दोषाई उद्यमविहीन मनुष्य साचा
लागे पहा ग्रहण भीषण भास्कराला
त्याचा परी क्रम अखंडित चाललेला २

हें दैन्य हेंच तव सैन्य म्हणून चाले
दैन्यें शिवाजिस महत्व महा मिळालें
तो पारतंत्र्य निरसून स्वतंत्र झाला
त्या कारणें अमर मान तया मिळाला ३

वांछा धरी विमल यत्न करी तसाच
मानी यश न, अयश न, न उच्च-नीच
संधान हें, परम भाग्य, अलंकृती ती
त्याचेविना भुवन-राज्यहि होत माती. ४

१२ मे १९२८ ]

## २ तो नर जन्मा आला

तो नर जन्मा आला जो वाटे आपुला कितीकांला
मरणोत्तरही ज्याच्या स्मरणें आनंद होत चित्ताला १

तो नर जन्मा आला, परार्थ ज्यानें स्वदेह वाहियला
ज्याला त्याला वाटे, संकटिं जो धांवणार साह्याला २

तो नर जन्मा आला, जो देशहितास आहुती झाला
जो सुखवर्धन करुनी, शून्यत्वा नेइ देशदुःखाला ३

तो नर जन्मा आला, धर्मरहस्यीं प्रवीण जो झाला
जो आचरणें आपुल्या, स्वधर्म शिकवी सुखांत इतरांला ४

तो नर जन्मा आला, ज्या साक्षात्कार सार्थसा झाला
जो स्वानुभवें पटवी, आस्तिक्याचें महत्व दुसऱ्याला ५

१३ मे १९२८]

## ३ खरे मार्गदर्शक

आचारोद्भव सौख्यलाभ न दिसे, राहे विचारीं परी
आचारांत पवित्र ते अधमती ये ही प्रचीती पुरी
जे आचार–विचार–निर्मल असे थोडेच विश्वीं जरी
विश्वा दाविति मार्ग तेच वसती विश्वाचिये ते शिरीं.

१५ मे १९२८]

## ४ गृहस्थाश्रम

बाला ही मम अंगसंभव तुझ्या हातीं मुदें अर्पिली
झाली अक्षयिंची तुझी सहचरी त्वद्रूपता पावली
आतां एक तुम्ही अभिन्न भुवनीं आजन्म वागा तसे
कीं संसार तराल निर्भयपणें पाण्यांत मासे जसे १

आहे आश्रम हा अनन्य सकलां आधार कार्यक्षम
दे खाद्य क्षुधिता, तृषार्त शमवी, श्रांतासि दे विश्रम
आपद्ग्रस्त जनां निवास वितरी, संग्राह्य सर्वां गणी
दापी दुर्जन, सज्जना सुखवि हा, हा श्रेयप्रेया धनी २
तारुण्यांत तुम्ही प्रवेश करुनी या आश्रमीं पातला
कार्यक्षेत्र अपार येथ मिळतें जें पारखीतें बला
लोकीं जे गुण–दोष सर्व सहजीं एकत्र ते भेटती
त्यांचे संगतिं साधिती विजय ज्या स्वार्थी परार्थी रति ३
पावित्र्य स्थिर राखितां निपजतो अन्योन्य विश्वास तो
ऐक्या निर्मुनि आत्म–संयम–करीं सामर्थ्य संपादितो
सामर्थ्ये स्फुरतां समाज विपदा लोटूनि देतो दुरी
गार्हस्थ्य प्रबल प्रसन्न असतां राष्ट्रासही माधुरी. ४

१५ मे १९२८ ]

## ५ भूषण नव्हे, प्राणच

स्वातंत्र्य हा प्राण, नसे ललाम
स्वातंत्र्यहीना न मनुष्य नाम
ललामकामीं श्रमता वृथा कां
प्राणास त्या कारण येत धोका.

२२ मे १९२८ ]

## ६ पारतंत्र्य

रोगांत रोग मारक भुवनत्रयिं पारतंत्र्य एक खरा
ने निरपवाद नरकीं सजीव जो सकल सान वा थोरा. १
यमपाश बद्ध न करी एके काळींच अखिल जीवांना
परि पारतंत्र्य–बंधन स्वतंत्र सोडी न राष्ट्रिंच्या कवणा. २

२२ मे १९२८ ]

### ७ असून नसून सारखे

सत्ता नसतां सद्गुण होती हे पोरकीं जशीं बाळें
तत्साह्यें मन रमवुनि त्यांचें जन करिति पूर्ण वाटोळें.

२२ मे १९२८ ]

### ८ स्वातंत्र्य

नांदे स्वातंत्र्य जेथें गुणगण अवघा तेथ धावोनि जाई
तेथें संपन्न सृष्टी चर अचर जणूं नांदते स्वीय गेहीं
त्या स्थानीं वृक्ष, वेली, खग, मृग, सरिता, पर्वतांभोधि, सारे
सौंदर्यें वा बलानें युत मनुजगणासंगतीं सौख्य थारे.

१४ जानेवारी १९२८ ]

### ९ सुखशोध

सुखशोधनीं श्रमावें भुवनत्रयिं तें परी न सांपडतें
हृदयीं दडुनी कुतुकें अपणां संत्रस्त पाहुनी हंसतें १
सुविचारें हृदयींची सांपडतां सौख्यनिर्झरी गूढ
सौख्या सीमा नुरुनी होतो आनंद अक्षयी गाढ. २

१८ जानेवारी १९२८ ]

### १० दिसतें तसें नसतें

जसा दिसें मी न तसा असें मी
घ्या पारखूनी वरि तेवि वर्मीं
जातां सिनेमा बघुनी वरी मी
दे काय हातीं मम रंगभूमी ?

१७ जुलै १९३८ ]

## ११ जगाचा न्याय !

श्रीमंत कर्तृत्वविहीन गाजे
कर्तृत्वशाली धनहीन गंजे !
सामान्य हा न्याय जगांत रूढ
रागावशी कें कवि ? खराच मूढ !

१८ जुलै १९३८ ]

## १२ सत्याची हिंसा !

( चाल : भला जन्म हा० )

कवे वेड तूं लावुनि घेसी स्वतांस; इतरां तसें
लाविसी, जग हो वेडें पिसें
बोल बोलसी रविच्या संगें, चंद्राशीं भांडशी
तारका वंदिसि वा निंदिसी;
वृक्षवेलिंवर दांपत्याचें नातें आरोपुनी
संस्कृती—रहस्य सांगसि जनीं !
हा सागर, हा पर्वत यांना सजीवता लेवून
ठरविसी सज्जन वा दुर्जन
अमानवा तूं मानव करुनी, मानवमन त्यावरी
लादिसी उगाच वेड्यापरी

ही हिंसा खाशी सत्याची चालली
जें नसे जगीं त्या स्तुति निंदा कोठली ?
कल्पनेपायिं ही परिस्थिती नाशिली
नसे जगीं जो त्या देवाचा उत्सव हा मांडिला
मानवा लाथांचा सोहळा !

५ आगस्ट १९३८ ]

### १३ एकाचें अजीर्ण, दुसऱ्याचें अन्न!

ताबा स्वजिव्हेवरि राखिल्यानें
शक्य स्वलाभें परलाभ होणें!
अन्नातिलाभें तुज जें अजीर्ण
तें हो भुकेल्या हितकारि अन्न.

७ आगस्ट १९३८ ]

### १४ देशभक्ताला स्वातंत्र्य

गोड गाणें नाचवी विषण्णाला;
गोड वाणी नैराश्य ने लयाला;
गोड अन्नें आनंद भुकेल्याला;
देशभक्ता स्वातंत्र्य सौख्य—मेला.

१२ आगस्ट १९३८ ]

### १५ भोळा भाव

भोळा भाव तुला सदैव नडतो, तूं मोकळया वृत्तिनें
गोष्टी सांगसि ह्या, तुझ्यासम तयां नाहींत मोठीं मनें!
ऐकोनी तुझिया कथा, भर तयीं घालोनि हे आपुली
निंदा माजविती तुझीच, सखया! ही सोड वृत्ती भली!

१२ आगस्ट १९३८ ]

### १६ उपाय

मनाला लागेसें घटित घडलें, शांति न परी
स्वतांची लोपूं दे; अविचलपणें वृत्ति अपुली
स्वकार्यीं लावूनी कृति—निरत रात्रंदिन बनें!
तरी मित्रा! शक्य व्रण हृदयिंचा हा विसरणें.

१३ आगस्ट १९३८ ]

## १७ प्रेम आहे तोंवर

गोड रुचकर रस सकळ चाखला कीं
उरे आम्राची साल कोय बाकी
कोण हातीं ठेवील त्यास आतां
स्नेह जाता हो मित्र तापदाता !

१४ आगस्ट १९३८ ]

## १८ एकाकी कां ?

भोंवतालीं मानव्य विखुरलेलें
तरी चिंतातुर चित्त केंवि झालें
अतां एकाकी काढुं कसा काळ
वदे वाक्य तुझी जीभ कां रसाळ ! १

स्नेह केंद्रीकृत तुझा दिशा दाही
अतां पसरो, राहो न दुजें कांहीं
होइं मानव्यासवें एकरूप
ध्येय तव हें साधेल अपोआप २

मित्र माझा हा, वदे तुझी जिव्हा
क्षुद्र मानस तव दृश्य होइ तेव्हां
पहा येथें मानव्य चिरडलेलें
तुझ्या स्नेहा हें जाहलें भुकेलें ३

स्नेह वाहो त्या दिशीं स्वैरवृत्ति
मुदित होतिल ते, वदनिं येत कांति
स्मितें एकाच्या होसि तूं प्रसन्न
प्रसन्नत्वीं तव बांध अतां कोण ! ४

१६ आगस्ट १९३८ ]

## १९ चोराच्या हातांत किल्ल्या

कळालें प्रचार मदिरा-बंदीचा । करावा, हा न्याय कैचा लोकीं?
दारूबंदीचा तो करूनी प्रचार । दारूचा संसार वाढवीतो!
अनेकां मदिरासेवन जीवन । पुरावा देऊन सिद्ध करी
स्वोदरीं स्वहस्तें बिब्बा घालणारा । नर या संसारा भाग्यें भेटे.
२४ फेब्रुवारी १९४१ ]

## २० कळलें; पण वळत नाहीं

जगाचा मी, माझें जग, अनुभवें आज ठरलें
परंतू द्वैताचें प्रभुरण न अद्याप विरलें.
अजूनी अज्ञानें कृत हृदय संकोच न खुले
जुनें टाकाऊही त्यजिति न सुखानें दुधखुळे!
९ मार्च १९४१ ]

## २१ निष्क्रियतेचें मूळ मात्र!

मित्रा तूं निरपेक्ष शब्द शतदां उच्चारिसी; तो परी
आहे फोल; निरिच्छता निपजते वेड्याचिये अंतरीं!
बाबा! ही निरपेक्षता बनविते थोरांसही निष्क्रिय
दे हा सोडुनि नाद घातुक, करी सच्छक्तिचा सद्व्यय
४ एप्रिल १९४२ ]

## २२ हिंसा-अहिंसा

अहिंसेची राष्ट्रा शिकवण अती घातक ठरे
अहिंसा शब्दानें सहज बनती शूर भितरे
अहिंसेच्या नांवें कृति अधम उच्चत्व वरिते
समाजाचें साऱ्या हनन करिती नीच नर ते.
६ एप्रिल १९४२ ]

## २३ अशांना धिक्कारा

बड्यांच्या नांवाचा जप करित त्यांचींच वचनें
सदा सांगोनी हें शिकविति, 'विचारांत तरुणें
न काळा वेचावें, करुनि शिरसामान्य हुकुम;'
अशांना धिक्कारा, तरुण तरुणींनो, रिपुसम !

७ एप्रिल १९४२ ]

## २४ नैसर्गिक झगडा

'चावे ढेकुण' बोलतो मनुज हें; ढेकूण जेवे परी !
त्याचें अन्न मनुष्य-रक्त; जगतो तो मानवाचे वरी
ऐसा मानव-ढेकणांत झगडा प्राचीन नैसर्गिक
त्याला मानव मारितां न मजला तो वाटतो हिंसक.

९ एप्रिल १९४२ )

## २५ या समाजांत अहिंसा अशक्य

अहिंसेचा केला जप निशिदिनीं, आचरणिं ती
परी येणें नाहीं प्रचलित समाजीं जंव रति !
पराचे स्पर्धेनें हनन करणें, उच्च बनणें
नरें वा राष्ट्रें वा अभिमत असे आज, न उणें !

१६ एप्रिल १९४२ )

## २६ स्त्रीस्वातंत्र्य

स्त्रीस्वातंत्र्यें जग न करपे, त्यास येती फवारे,
स्त्रीस्वातंत्र्यें दलित जनता जागृतीनें तरारे,
स्त्रीस्वातंत्र्यें दडुनि बसली शक्ति येते फुलून
स्त्रीस्वातंत्र्यें अभिनव जगा जन्म निःशंक जाण !

१९ एप्रिल १९४२ ]

## २७ कोणी जगावें ?

जगावें त्यानें जो खणखणित आहे तनुमनें;
जगावें त्यानें जो सतत स्वपणें मानि जगणें;
जगावें त्यानें जो सकल नर–नारी सम गणी
जगावें त्यानें जो रमत जगताच्या विकसनीं १

जगावें त्यानें जो परवश न होई न करि वा
जगावें त्यानें जो नमन करि एका अनुभवा
जगावें त्यानें जो अवगणि अशास्त्रीय अखिल
जगावें त्यानें जो धरि प्रगतिविश्वास अढळ २

२१-२२ एप्रिल १९४२ ]

## २८ सर्वाभूतीं सम

शत्रू नाहिंत त्यास, मित्र नसती, सर्वांसवें सारखा
कोणालाहि न फारसा चिकटला, तो भांडणा पारखा;
साधी तो समभाव नित्य धरुनी स्वार्थां परार्थां तसे
ऐसा मानव भेटतां सततचा संतोष चित्तीं वसे.

२९ एप्रिल १९४२ ]

## २९ बालकाचें हास्य

पाहोनी बालहास्य प्रमुदित न मनीं तो स्थितप्रज्ञ जाणा
बाळाचे बोल कानीं पडुनि न हरिखे तो असामान्य माना
बाळाचा स्पर्श होतां हृदिं न उमलते तो न येथील खास
बाळा घ्याया जया हा हुरुप न गमतो योग्य तो स्वर्गभूस !

१ मे १९४२ ]

## ३० आशेचा आसरा

चंद्राचें चांदणें । बाळाचें हांसणें
मंजुळ बोलणें सुंदरीचें १

मन न मोहीतें । वेड न लावीतें
कोण्या रसिकातें सांगावें बा २

शुक्राची चांदणी । चंद्राचें हें बिंब
त्यांनीं फुटे कोंब आनंदाला ३

परी त्या कोंबाला । कांहीं न पोषक
खिन्नतेचें पीक फोफावतें ४

खिन्नतेच्या पिका । आशा नामें कीड
लागतां बींमोड खिन्नतेचा ५

आशेचा आसरा । आम्हां लाभो सदा
आनंद संपदा निश्चयेंची. ६

२ मे १९४२]

## ३१ ऋणाहून मरण बरें

ऋणांत बुडला, विकी सदन, शेत, सोनें, गुरें,
तयास धनको छळी अजुन कर्जबाकी उरे;
सुना विकुनि शेवटीं ऋण-विमोचना साधिलें
नको ऋण, तयाहुनी मरण चांगलें, चांगलें !

३ मे १९४२]

## ३२ निःसीम दुर्भागी

व्हायाला मन मोकळें स्थळ न ज्या निःसीम दुर्भागि तो
तो चित्तीं कुजतो, सदैव कुजतां खिन्नत्व तो पावतो!
अश्रद्धा जगताविशीं उपजते त्याच्या पुढें मानसीं
अश्रद्धा-वश होय त्याविषयिंची आशा नको फारशी.

५ मे १९४२]

## ३३ लाजाळूपण

येथें आपण पोचतांच बघ या संकोचल्या बायका
पूर्वींचे परि खेळती पुरुष हे त्यांना न लागे ढका
हे सारे पुरूष स्त्रियाहि असती निष्णात खेळांत या
लाजाळूपण राहुनी कधिंहि ना होणें यशस्वी स्त्रिया!

९ मे १९४२]

## ३४ अतिशहाणा त्याचा बैल रिकामा

आकाशीं उडती विहंग दिसतां त्या खाद्य खालीं कुठें
वेगें घालुनि झांप ते उचलुनी नेतात, चिंता मिटे!
न्यायान्याय न पाहती प्रबल जे तत्स्वार्थ साधे असा
न्यायान्याय करीत जे बसति त्या हातीं पडे कोळसा.

१२ मे १९४२]

## ३५ स्वभाव

काव्यें हीं तव वाचिती न कुणि वा सन्मानिती ना कुणी
वेटोळीं परि ही रचीत बससी सोत्साह रात्रंदिनीं
माझा हा बनला स्वभाव, कवनें होतील आमृत्यु हीं
पाहीं हें तृण, हें न खाइ कुणिही, त्या जन्म कां दे मही!

१८ मे १९४२]

## ३६ व्यावहारिक मैत्री

'जातें तें मनमोकळेपण कुठें? विश्वास जातो कुठें?
ओलावा उडतो कसा हृदयिंचा? संबंध तो कां तुटे?'
'अन्योन्यां व्यवहार पोषक जरी, मैत्री तिथें संभवे
होतां तेच विरोधि सख्य तुटतें, ते शत्रु होती नवे'

२० मे १९४२ ]

## ३७ राखा मरोनी ध्वज!

दारीं उभी राहुनि शूर पोर
सांगे समस्तां रिपुच्या समोर
'त्याच्यापुढें लीन तुम्हीं न व्हावें
राखा मरोनी ध्वज भक्तिभावें.' १

ती बोलते आयकती अनेक
सारे उभे राहति ताठ लोक
कांपे प्रकोपें रिपुचें हत्यार
योजोनि त्यातें करि तेथ ठार. २

सारे मरोनी पडले क्षणांत
कीर्ती परी अक्षयिची जगांत
ते सर्वदा शब्द तिचे स्मरावे
'राखा मरोनी ध्वज भक्तिभावें.' ३

२२ मे १९४२ ]

### ३८ वस्तूची किंमत

चंद्राच्या चांदण्याची महति मज कळे पूर्ण कारागृहांत
तेथें दुष्प्राप्य होतें सहज मिळतसे राहतां जें घरांत
तेथें सारे भुकेले, नयनिं जरि पडे चंद्र आनंद नाचे
येतें ध्यानीं अभावें, न परि परिचयें वस्तुचें मूल्य साचें.

२२ मे १९४२ ]

### ३९ अन्योन्यपूरक

स्त्रीचें कौतुक हा करूनि पुरुषी घोडें पुढें दामटी
याची संघटना स्त्रियांप्रति कशी? बाळास जेवीं घुटी
स्त्रीचें स्त्रीत्व न हा स्वतंत्र गणितो, छाया नराची परी!
ते अन्योन्य समान पूरक खरे, ना वस्तु, ना सावली.

२ जून १९४२ ]

### ४० खरोखरीची मालकीण हवी !

आकाशांत न चंद्रमा तरि न तें आकाश आल्हादक
शोभा मालकिणीविना न सदना, उद्यान तें नापिक
नांवाची जरि मालकीण, ठरतें तें तीस कारागृह
नांदे मालक–मालकीण–समता कीं स्वर्गसौख्यावह.

७ जून १९४२ ]

### ४१ निश्चित अपयश

'जुनें तें सोनें' जे म्हणति करिती वर्णन तसें
तयांचें आतांच्या जगतिं जगणें शक्य न दिसे
शिवाजीचीं शस्त्रें वरुनि अजि जो जाय समरीं
असो मोठा योद्धा अपयश तया निश्चित परी.

९ जून १९४२ ]

## ४२ यंत्र !

मानव्याचें विकसन महा आजचें यंत्र खास
तन्नाशें ये पशुपण पुन्हां निश्चयें मानवास?
यंत्रा यंत्रासम समजतां होत कल्याण मोठें
यंत्र स्वामी जणुं शिरिं बसे त्यास तोटेच तोटे.

९ जून १९४२ ]

## ४३ स्पर्धेमुळें !

अन्नावांचुनि हा मरे, मरत हा येथें अजीर्णामुळें
हें दुर्भाग्य न, हें सुभाग्य न तसें, हें या समाजामुळें
स्पर्धेनें जगतांतल्या प्रबल जे ते सर्व खाती स्वतां
ज्यांना प्राप्त न शक्ति युक्ति मरती सर्वत्र ते कष्टतां!

९ जून १९४२ ]

समाप्त

# संपादकीय टीपा

## कविपरिचय

कवीचें संपूर्ण नांव पंढरिनाथ वामन घाणेकर असें आहे. तथापि महाराष्ट्रांत सर्वत्र ते केवळ नाथ घाणेकर या नांवानेंच प्रसिद्ध आहेत. पुणें जिल्ह्यांत, पुणें–नाशिक रस्त्यावर **राजुरी** या प्रसिद्ध बागाईत गावी, तेथील फार मोठ्या दर्जाच्या घाणेकर कुटुम्बांत ज्येष्ठ व॥ अमावास्या शके १८१० ( इ स. १८८८ ) या दिवशीं त्यांचा जन्म झाला. वडील वामनराव वकील होते. परंतु राजकीय दृष्टचा ते कट्टर टिळकपक्षाचे व सामाजिक सुधारणेच्या बाबतींत पूर्ण प्रतिगामी आणि सनातनी होते. मातोश्री मात्र आगरकर पंथीय वडिलांच्या कन्या असून वृत्तीने फार सुधारक होत्या. नाथांच्या ठिकाणीं वडिलांचें राजकीय जहालपण व मातोश्रीचे सामाजिक पुरोगामित्व यांचा सुन्दर मिलाफ झालेला आहे.

राजुरी येथील प्राथमिक शाळेंत त्यांचें शिक्षण सुरू झालें; तरी पण वडील वकिलीसाठीं सातारा येथे आल्यामुळें प्राथमिक व दुय्यम शिक्षण सर्व सातारा येथेंच झालें. सातारा हायस्कुलांत त्यांचीं १८९९ ते १९०५ ही वर्षे गेली. तेथेंच त्यांचा कै. गोपाळ कृष्ण देशपांडे व कै. वाग्भट नारायण देशपांडे यांचा आणि रा. शं. के. ऊर्फ बाबूराव महाबळेश्वरकर यांचा अकृत्रिम स्नेहसंबंध जडला. १९०५ सालीं डेक्कन कॉलेजांत गेल्यावर १९०६ सालीं पी. ई. व १९०८ सालीं इंटर झाले. १९१० मध्ये बी. ए. ला बसले. परंतु यशस्वी झाले नाहींत. १९११ व १९१२ या सालींही त्यांनीं पुन्हां प्रयत्न केला. पण यश आलें नाहीं.

१९०५ ते १९०८ या झंझावाताच्या काळांतही टिळकांच्याच धीर, गंभीर, सागरासारख्या विशाल वृत्तीवरच त्यांचें अंतःकरण खिळलें; जीवन व जीवनध्येय राष्ट्रीय व राष्ट्रमय झालें; राष्ट्राला सर्व जीवित अर्पण करण्याचा विचारप्रवाह वाहूं लागला, जीवन साधें झालें. घोंगडी हेच आजतागायत हंथरूण झालें. स्वदेशीमय सर्व राहणी झाली.

व्यवहारांत इंग्रजीबद्दल अत्यंत द्वेष उत्पन्न झाला. तथापि इंग्रजी वाङ्मयाचें वेड मात्र फार. संपूर्ण शेक्स्पीअरच्या अनेक आवृत्त्या झाल्या. शेले, बायरन, वर्डस्वर्थ, स्कॉट यांची संपूर्ण काव्यें वाचून झाली. तशीच मिल्टनचीं. टेनिसन हा त्यांचा अत्यंत आवडता कवी. याबरोबरच संस्कृत व मराठी गद्य पद्य वाङ्मयाचेंही सूक्ष्म अवलोकन त्यांनी केलें. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर व तुकाराम यांचा फार खोल अभ्यास केला.

कॉलेजमध्यें त्यांना आणखी एका मित्राचा लाभ झाला. ते म्हणजे प्रि. गं. नी. ऊर्फ तात्यासाहेब गोखले होत.

राजकीय दृष्टचा टिळकपंथी असूनही राष्ट्रीय चतुःसूत्रीच्या (स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण) खळबळीच्या काळांतच ते समाज सुधारणेची तळमळ बाळगून होते. या द्विविध ध्येयाच्या दृष्टीनें नाथांच्या जीविताला त्यांच्या आजवरच्या सर्व आयुष्यभर व्यापणारें वळण लावणारी अशी प्रतिज्ञा कॉलेजांतच, त्यांच्या खोलीतच, एका विधवेच्या करुण जीवनदर्शनानें तळमळून जाऊन लिहिलेल्या त्यांच्या 'यमुना' या नाटकावरील वादविवादाच्या प्रसंगी, नाथांनीं घेतली. त्या प्रतिज्ञेचा आशय हा—

**" लग्न करीन तर विधवेशींच करीन. पण एवढेंच करून मात्र थांबणार नाहीं. माझें अंतःकरणच तुम्हांपुढें उघडें करतों. आज कित्येक दिवस हा विचार माझ्या मनांत**

**घोळतो आहे. पण आज तो तुम्हांला स्पष्ट सांगतो. माझें सारें आयुष्य मी समाजसेवेला वाहून टाकण्याचें ठरविलें आहे स्वराज्यप्राप्तीसाठीं स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण यांचा मी पूर्ण अंगीकार केला आहे. मी कसलीही सरकारी नोकरी करणार नाहीं. राष्ट्रीय शिक्षक होईन व तळेगांवच्या समर्थ विद्यालयासारख्या संस्थेला मिळेन. राष्ट्रकार्याशिवाय अन्य धंदा मी करणार नाहीं. मग संचय दूरच राहिला. राजकीय स्वातंत्र्यार्थ झटत असतां सामाजिक सुधारणेची एकहि संधि मी वांया जाऊं देणार नाहीं. अन्यायाचा प्रतिकार जेथें घडेल तेथें करावयाचा, गरिबांची सेवा करावयाची हेंच एक यापुढें माझें जीवितकार्य राहील."**

सामाजिक सुधारणा, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य ही पंचांगी प्रतिज्ञा १९०८ सालीं नाथानीं जितक्या जाणिवेनें व कळकळीनें केली तितक्याच जाणिवेनें व कळकळीनें ती गेलीं ३४ वर्षे त्यांनी पाळली आहे.

समर्थ विद्यालय बंद झाल्यानें तो मार्ग बंद झाला. आणि कुटुम्बाच्या आर्थिक अडचणीमुळें नाइलाजानें १९१२ सालीं सातारा येथें न्यू इंग्लिश स्कुलांत निमसरकारीच पण नोकरी स्वीकारणें भाग झालें. अत्यंत वक्तशीर, प्रेमळ आणि कर्तव्यदक्ष शिक्षक म्हणून त्यांचा तेथें लौकिक झाला. पगाराच्या पैशाला त्यांनी स्पर्श केला नाही. त्यांच्या व धाकटे बंधु श्री. निळूभाऊ यांच्या प्राप्तीतून व कै. काकूच्या दक्षतेने १९१९ सालापर्यंत कुटुम्बावरील आर्थिक संकट पूर्ण निवारलें गेलें व लगेच शाळेतून राजीनामा देऊन त्यापुढचा सर्व काळ नाथांनीं केवळ देशसेवेकडे लावला.

राष्ट्रीय शिक्षणाबाबतची त्यांची तपश्चर्या म्हणजे सातारची त्यांची

' टिळक राष्ट्रीय शाळा '. १९२० ते १९३२ पर्यंत अत्यंत यशस्वीपणें ही शाळा चालली. महाराष्ट्रांतील सर्व राष्ट्रीय शाळांत या शाळेचा मोठा उच्च दर्जा होता. म. गांधीनी आपल्या दौऱ्यांत मिळालेल्या निधीपैकी एक हजार रुपये या शाळेला अनाहूतपणें दिले होते. पुढें १९३२ सालीं सरकारनें या शाळेचा ताबा घेतला, तो पुढें १९३५ पर्यंत. त्यानंतर बदललेल्या वातावरणांत शाळा फिरून सुरू झाली नाहीं.

सामाजिक सुधारणेच्या हरएक कार्यात ते भाग घेत आले. अस्पृश्यांसाठी रात्रीची शाळाही यशस्वीपणें चालविली. स्वतः पुर्नविवाह करण्याचा त्यांचा विचार, कांही खेदकारक घटनांमुळें, ठरलेला विवाह प्रत्यक्ष न झाल्यामुळें, अमलांत आला नाहीं. याचमुळे आयुष्यभर त्यांनीं एकाकी जीवन कठलें.

स्वदेशीचे ते मूर्तिमंत प्रतीक आहेत. बहिष्कारयोग निरनिराळ्या अर्थांनीं त्यांनीं अत्यंत वसोशीनें पाळला आहे.

स्वराज्याच्या कामांत तर त्यांचें सारेंच आयुष्य चाललें आहे. होमरूल लीगचा प्रचार सातारा जिल्ह्यांत सर्वत्र पायीं हिंडून त्यांनी केला. राष्ट्रीय शाळेच्या अनुषंगानें त्यांनी सातारा जिल्ह्यांतील सर्व राजकीय कार्यांत प्रामुख्यानें भाग घेतला. मुळशी सत्याग्रहाचे चळवळींत प्रचारकार्य केलें. १ ३०।१९३२ सालच्या चळवळीत कारागृहवास भोगला. दोन वर्षे जिल्हा कांग्रेस कमिटीच्या अध्यक्षाचें काम केलें. १९४० पर्यन्त जिल्हा कांग्रेस कमिटीच्या कार्यकारी मंडळावर ते बहुतेक सतत होते. एक वर्ष आ. इं. कां. क. चे सभासद होते. नंतर १९४०।४१ सालीं पुन्हां कारागृहवास. जि. कां. क. चे अध्यक्ष असतांना त्यांनीं जाळगेवाडीच्या आगीनें धुळधाण झालेल्या लोकांस संस्मरणीय मदत केली.

१९३९ सालीं कांग्रेसच्या युद्धाबद्दलच्या ठरावाचा प्रचार जिल्ह्यांत सतत हिंडून त्यांनीं केला त्याचा श्रमातिरेक होऊन पक्षघाताचा

झटका पुन्हां येणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. पहिला पक्षघाता-चा झटका १९२३ सालीं आला होता. त्यांत ते दोन वर्षे आजारी होते. नंतर बरे झाले तरी शरीराला एक प्रकाराचें पंगुपण आलें होतेंच. तें पंगुपण १९३९ सालच्या या दौऱ्यानें अधिकच वाढलें. त्या नंतरच्या पंधरा महिन्यांच्या कारावासानतर तें अधिकच वाढलें आहे. हा शारीरिक धक्का व वैवाहिक निराशेचा मानसिक धक्का यांनीं शरीर आणि मन हीं दोन्ही एकप्रकारे पंगु झालीं असतां गेलीं २० वर्षे कोणालाही आदर वाटावा इतक्या धडाडीनें त्यांनीं राजकारणांत कार्य केलें आहे. बुद्धीचा नवटपणा पुरेपूर कायम ठेवला असून ते नित्य पुरोगामी विचारांच्या आघाडीवर राहत आले आहेत. तरुणां-नाही विस्मय वाटावा इतक्या सखोल रीतीनें त्यांनीं मार्क्सवादाचा अभ्यास केला आहे व पूर्ण विचारांतीं तें तत्त्वज्ञान आत्मसात करून आज ते त्याचा हिरीरीनें प्रचार करीत आहेत. त्यांच्या शारीरिक व मानसिक जिवटपणाची व चिवटपणाची ही मुर्तिमंत साक्ष आहे.

१९३८ सालीं जून महिन्यांत ५० व्या वाढदिवसानिमित्त सेनापति बापट यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचा सत्कारसमारंभ करण्यांत आला. त्याप्रसंगीं त्यांना १५०० रुपयांची थैली अर्पण करण्यांत आली. ही रक्कमही त्यांनीं केवळ सार्वजनिक कार्यासाठीं बाजूस काढून ठेविली आहे. त्यासंबंधींचा तपशील मात्र आजच सांगतां येण्यासारखा नाहीं. संचय न करण्याची आपली प्रतिज्ञा त्यांनीं अत्यंत तंतोतंत पाळली आहे.

हरएक प्रकारची तीव्र मतप्रणाली प्रतिपादीत आले असूनही नाथ अजातशत्रू आहेत असें म्हटलें असतां चालेल. कट्टर सनातनी, वर्णा-श्रमाभिमानी, शास्त्रीपंडित, ब्राह्मण ब्राह्मणेतर, स्पृश्य अस्पृश्य, हिंदु मुसलमान, सुधारक दुर्धारक, तरुण वृद्ध, जहाल मवाळ, हिंदु-महासभावादी—कांग्रेसवादी, सर्वांना त्यांचेबद्दल अपूर्व जिव्हाळा

वाटतो. कट्टर कम्यूनिस्ट अशा त्यांचेबद्दल कट्टर हिंदुत्ववादी प्रो. माटे लिहितात–'मी घाणेकर यांना फार मानतों.' सातारा जिल्ह्यांतील राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या चालकांत सुद्धां नाथांचेबद्दल अतीव भक्ति आहे. जेथून जेथून सर्वांच्याच मनांत नाथांबद्दल अपूर्व सद्भावना भरलेली आहे.

प्रस्तुत संपादकानें १९३८ साली लिहिलेल्या नाथांच्या अल्प जीवन वृत्तांतून पुढील उतारा देऊन हा परिचय संपवितों.

"कांहीं मंडळी म्हणतात नाथांनीं नुसती व्याख्यानबाजी केली. कार्य कांहीं केलें नाहीं. प्रत्येकाच्या कार्याच्या कल्पनेप्रमाणें हा दृष्टिकोण बदलेल. देशाच्या आजच्या स्थितींत व्याख्यानें देणें हें सुद्धां लहान सहान कार्य नव्हे. टिळकांनींही व्याख्यानें आणि लेख एवढेंच काम केलें ! पण नाथांच्या कामाची यादी पुढें देतों.

१ व्याख्यानें – असंख्य – महाराष्ट्रांतील जास्तींत जास्त व्याख्यानें देणाऱ्या पहिल्या २।३ माणसांत स्थान मिळण्याइतकीं.

२ अनाथ विद्यार्थि गृह.

३ मोफत वाचनालयें.

४ खादी प्रचार, विक्री, निर्मिति.

५ ग्राम–प्रचार. सुमारें ५०० हून अधिक खेडेगांवांतील जनतेंत जागृति.

६ सातारा म्युनिसिपालिटींत ३ वर्षें काम. कमींत कमी खर्च आणि जास्तींत जास्त मतें मिळवून नाथ निवडून आले होते.

७ राष्ट्रीय–शाळा–११ वर्षें. एकूण खर्च ५० हजार रु॰चे आसपास.

८ दोन वर्षें जिल्हा कांग्रेस कमिटीचे अध्यक्ष.

९ अध्यक्ष नसतांना कांग्रेसचा प्रचार.

१० कौंसिल, असेंब्ली, लोकलबोर्ड यांच्या निवडणुकी.

११ मुळशी सत्याग्रह–५ महिने बापटांचे नेतृत्वाखालीं काम.

१२ अस्पृश्यांची रात्रीची शाळा.

१३ न्यू. इं. स्कूलमधील व्यायामवृध्द्यर्थ शिक्षणवर्ग.

१४ या व इतर अनेक कार्यांचे जोडीला प्रसिद्धीची बिलकूल हाव न करतां केलेली अपूर्व साहित्य-सेवा. नाथांनी लिहिलेली २०-२५ नाटकें, ५-६ कादंबऱ्या, १०-१५ हजार ओळी कविता आणि इतर किरकोळ लिखाण आज त्यांचेजवळ शिल्लक आहे. जवळ जवळ इतकेंच फाडणींत गेलें आहे. १९०८ पासून ते लिहीत आहेत. आणि अद्याप लिहिणें चालू आहे. नाथांचें काव्य अत्यत उच्च दर्जाचें असून तें प्रसिद्ध झालें असतें तर त्यांना कवींमध्ये मोठीच मानाची जागा मिळाली असती. इतर कोणतेंही काम न करतां केवळ ही साहित्य-सेवा नाथांच्या गांठीला असती तरी त्यांना समाजांत श्रेष्ठ कर्तृत्ववान पुरुषाचें स्थान प्राप्त झालें असतें."

आज त्यांचें वय ५४ वर्षे पूर्ण आहे. देश खऱ्याखुऱ्या अर्थानें स्वतंत्र झालेला पाहण्यासाठीं जगावें अशी त्यांची तीव्र इच्छा आहे. शारीरिक पंगुपण कधीं कधीं त्यांना निराश करतें. एकाकी जीवनहि त्यांना दिवसेंदिवस अधिक दुःखमय होत आहेसें दिसतें. परंतु या निराशेंतही त्यांचें मन मोठें आशावादी आहे. त्यामुळें आणि निरलस, निर्मळ, निर्मत्सर अशा रेखीव जीवनक्रमामुळें त्यांना दीर्घ आयुष्य लाभून त्यांचीं कितीएक सुखस्वप्नें प्रत्यक्षांत येतील असा भरंवसा वाटतो.

## साहित्यपरिचय

नाथांच्या अगदी निकटच्या मंडळीशिवाय कोणाला नाथ ललित साहित्य निर्माण करीत असतील अशी अंधुकसुद्धां कल्पना नव्हती. मध्यंतरीं त्यांच्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त काढलेल्या समर्थाच्या खास अंकांत त्यांची कांहीं कविता प्रसिद्ध करण्यांत आली. परंतु

तिचाही परामर्ष मराठी वाङ्मयरसिकांनीं न घेतल्यामुळें नाथांची लेखनकामाठी अज्ञातच राहिली.

त्यांची प्रसिद्धिविन्मुखता इतकी दांडगी कीं गेलीं ३४ वर्षे सतत लिहिण्याचा व्यासंग ते करीत आले असूनसुद्धां आपण लेखक आहों ही गोष्ट त्यांनीं कोठेंच फारशी कळूं दिली नाहीं. अभिनव काव्यमालेच्या तिसऱ्या विभागांत प्रसिद्ध करण्यासाठीं त्यांची कांहीं कविता श्री. केळकरांकडे त्याचे जामात आणि नाथांचे परमस्नेही कै. बाबुराव देशपांडे यांनीं अक्षरशः जबरदस्तीनें घेऊन नेऊन दिली. चित्रमय-जगतमध्यें त्यानंतर १९१६ सालीं नाथांची एक दीर्घ कविता 'जिजाबाईचें आपल्या बापास उत्तर' या नांवाची अशीच कांहींशी त्यांच्या अनिच्छेनेंच प्रसिद्ध झाली. त्यानंतर एकदां समर्थांत एक व एकदां ऐक्यांत एक अशा दोन कविता प्रसिद्ध झाल्या. खास अंकानंतर आतां चार वर्षांनीं त्यांनीं आपली समग्र कविता प्रसिद्ध करण्याला संमति दिली तीसुद्धां पुष्कळशा आग्रहानंतर आणि दीर्घ जीवनाबद्दल शंका वाटूं लागल्यामुळें 'समाजाचे हें धन समाजाला देऊन टाकावें' या बुद्धीनें. इतकी प्रसिद्धिविन्मुखता लेखकांच्या ठिकाणीं क्वचितच आढळेल. त्यांचें सर्व लिखाण-सर्व काव्यगुंजन-केवळ स्वतःच्या आनंदाकरितां झालें आहे. 'काव्यं यशसे अर्थकृते' असेंच केवळ नसून तें केवळ काव्यभक्तीसाठींच असूं शकतें याचें नाथांची साहित्यसेवा हें उत्तम उदाहरण आहे.

ही साहित्यसेवा ३४ वर्षें अखंड चालू आहे. रोज कांहींतरी लिहीत जावें हा रामदासांचा दंडकच जणुं त्यांनीं पाळला आहे. छोट्या छोट्या वह्यांपैकी एक वही व पेन्सिल नित्य बरोबर असावयाची. आणि मग डोंगरावर, रस्त्याच्या कडेला, नगर वाचनालयाच्या बाहेरच्या बाकावर-जेथें कोठें मनांत येईल तेथें लेखन व्हावयाचें पण तेंही अशा बेतानें की इतर कोणाला हा कांहीं सुगावाही नसावयाचा.

१९३०-३२ सालीं तुरुंगांत त्यांना लेखनसाहित्य मिळालें नव्हतें. तें १९४१ साली मिळाले, व त्याचा त्यांनी भरपूर उपयोग करून घेतला. बरेचसे गद्य चुटके व बरीचशी कविता १९४१ च्या फेब्रुवारी ते मे या चार महिन्यांत त्यांनी येरवड्यास लिहिली. पुढें प्रकृति पण खालावली आणि राहण्याची व्यवस्था तितकीशी उपकारक राहिली नाही. यामुळे मग लेखन झाले नाहीं.

नाथांनीच म्हटल्याप्रमाणें मुख्यत: नाटकें, कादंबऱ्या व काव्य या तीन प्रकारचें त्यांचें लिखाण आहे. याशिवाय सृष्टिवर्णनात्मक, तत्व-चर्चात्मक असें त्यांचें कांही पुष्कळ गद्य लिखाणही आहे. कांहीं छोट्या गोष्टीही आहेत. १९१९-२० सालीं सातारा जिल्ह्यांत पायीं विस्तृत दौरा होमरूल लीगच्या प्रचारासाठीं त्यांनीं काढला; त्यावेळीं त्यांनीं लिहिलेल्या दौऱ्याच्या हकिकती याही त्यांच्या साहित्यलेखनाचे नमुनेच आहेत.

३४ वर्षेपर्यंत अखंड चाललेल्या या विविध साहित्यनिर्मितीची ओळख करून देणें हें काम अनेक दृष्टींनीं दुर्घट आहे. एक तर लिहिल्यापैकी निम्म्याहून अधिकाचा नाश करण्यांत आला आहे. पक्ष-घाताच्या झटक्यामुळें आणि वेळोवेळच्या तुरुंगवासामुळें, निव्वळ स्मरणांतून, अशा नष्ट केलेल्या साहित्याची नुसती यादीसुद्धां करणें अशक्य झालें आहे. यामुळें अर्ध्याअधिकाचा निर्देशही अशक्यच आहे.

राहिल्यापैकी कांही लिखाण नाथांच्या मित्रांकडे गलें आहे. तें कोणतें याचीही यादी नाहीं. यापुढें हें सर्व जमा करण्याचा प्रयत्न करावयाचा आहे. परंतु इतक्या दीर्घ कालावधीत तें कोठें आणि किती शिल्लक असेल याचा आज काही अंदाज करतां येत नाही. त्यामुळें तूर्त तरी त्याचाही निर्देश अशक्य आहे.

## नाटकें

बाकी सध्यां जें हाताशीं आहे त्यांतून नाटकांची कालक्रमवार यादी पुढीलप्रमाणें आहे.

| | |
|---|---|
| १ यमुना | मार्च–एप्रिल १९०८ |
| २ अबला रक्षण | १९०९ |
| ३ उक्ति की कृति | १९१२ |
| ४ सती सावित्री | १९१७ |
| ५ भावंडांचें भांडण | १९२५ |
| ६ गृहकलह | १९२५–२६ |
| ७ विधिविलसित | १९२६ |
| ८ च्यवनभार्गव | १९२६ |
| ९ अष्टावक्र | १९२६ |
| १० यवक्रीत | १९२६ |
| ११ पापाचें प्रायश्चित्त | १९२७ |
| १२ दंड्यांचें दंडन | १९२७–२८ |
| १३ सीताहरण | १९२८ |
| १४ सीताशोधन | १९२८ |
| १५ सीताविमोचन | १९२८ |
| १६ ही नीति की अनीति | १९३५ |
| १७ अन्यायाचें परिमार्जन | १९३५ |
| १८ मानसिक गुलामगिरी | १९३८ |

## धांवती ओळख

यमुना नाटकाचा उल्लेख कविपरिचयात आला आहे. पुर्नविवाहा-संबंधीं हें नाटक आहे. अबलारक्षण हें एका संस्थानांत होत असलेल्या स्त्रियांवरील अत्याचारासंबधीं नाटक आहे. 'उक्ति की कृति' हें पण पुर्नविवाहाबद्दलचेंच नाटक आहे. 'सती सावित्री' हें जुन्या पद्धतीचें भलें मोठे नाटक आहे. 'भावंडांचें भाडण' आणि 'गृहकलह' ही ब्राह्मणब्राह्मणेतर वादासंबंधीची नाटकें आहेत. 'विधिविलसित' हें ढोंगी खादीधारी लोकासंबंधींचें नाटक आहे. 'च्यवनभार्गव,'

'अष्टावक्र' 'यवक्रीत' ह्या विद्यार्थ्यांसाठीं नाटिका आहेत. महाभारतांतील बहुतेक सर्व उपाख्यानांवर अशा नाटिका लिहिण्याचा नाथांचा संकल्प आहे, त्यांपैकीं ही तीन नाटकें आहेत. 'पापाचें प्रायश्चित्त' हें एका संस्थानाधिपतीच्या हद्दपारीच्या विषयामुळें सुचलेलें नाटक आहे. 'दंडयाचें दंडन' हें सेनापति बापट याच्या एका संभाषणावरून सुचलेलें नाटक आहे. 'सीताहरण, सीताशोधन, सीताविमोचन' हीं नाटकें, रामायणावर आठ नाटकें लिहिण्याचा नाथांचा संकल्प आहे त्यांतील तीन होत. 'ही नीति कीं अनीति' हें नाटक सत्कारसमारंभाचे वेळी सबंधच प्रसिद्ध केलें आहे. 'अन्यायाचें परिमार्जन' हें अशाच तऱ्हेच्या सामाजिक अनीतीच्या प्रश्नाबद्दलचें नाटक आहे. शेवटचें १९३८ साली लिहिलेलें नाटक हें ढोंगी धर्मश्रद्धेची उघडीक करण्यासाठी एका दत्तविधान प्रकरणावरून लिहिलेलें आहे.

नाथांची नाटकें रंगभूमीवर कशी काय वठतील हा संशयित प्रश्न आहे मराठींत रूढ झालेलें नाट्यतंत्र त्यांनी जवळजवळ मुळीच अंगिकारलेलें नाहीं. रंगभूमीवरील प्रत्यक्ष हालचालीपेक्षां संभाषणांवरच त्यात पुष्कळसा भर आहे. संवाद–लेखन–कौशल्य या नाटकांतून भरपूर आहे व त्या संवादांतून सामाजिक मूल्यांची चर्चाही चांगली केली आहे. विचारसंपन्न श्रोत्यांपुढें हीं नाटकें यशस्वी होण्याला अडचण पडू नयेसे वाटतें शुद्ध साध्या व चतुर भाषेच्या दृष्टीनें ही नाटकें फार मननीय ठरतील.

## कादंबऱ्या

१ हें वाघिणीचें दूध
२ खेडेगांवीं चला २ भाग.
३ धर्मश्रद्धा की धर्मवेड
४ इंदिरा. २ भाग.
५ शेवट गोड झाला.

या पांच कादंबऱ्या चांगल्या विस्तृत आहेत. त्यापैकी 'वाघिणीचें दूध' ही इंग्रजी शिक्षणाच्या परिणामाचें दिग्दर्शन करणारी कादंबरी सयर्था-तर्फे फार वर्षापूर्वी (१९२६) प्रसिद्ध झाली. खेडेगांवीं चला ही ध्येय-वादात्मक कादंबरी आहे रत्नाकराच्या संपादकांनी ही प्रसिद्धीस घेतली होती. परंतु पुढें त्यांचाच सर्व व्यवहार संपुष्टात आल्यामुळें कादंबरी प्रसिद्ध होण्याचें राहिलें.पक्की प्रतही त्यांचेजवळच राहिली.धर्मश्रद्धा की धर्मवेड ही हिंदु मुसलमानांच्या प्रश्नासंबंधी कादंबरी आहे. इंदिरा कादंबरीत समाजवादी नायिका कल्पिली असून ती खेडयांत कोणतें कार्य आणि कोणत्या पद्धतीनें करते यांचें ध्येयवादात्मक चित्र रेखा-टलें आहे. शेवट गोड झाला ही आत्मचरित्रात्मक दीर्घकथा आहे.

नाथांच्या कादंबऱ्यांत भावनोत्कटता आणि सहजसौंदर्य विपुल आहे. त्यांनीं रेखलेलीं स्वभावचित्रें उठावदार आणि वास्तववादी आहेत. त्यांची भाषा हरिभाऊ आपटयाच्या साध्या मनोहर भाषेची आठवण करून देते. पण वाचकांचें औत्सुक्य कायम राखण्यासाठी किंवा वाढविण्यासाठीं हरिभाऊ योजितात तशा गूढ घटनांच्या क्लुप्त्या त्यांच्या कादंबऱ्यांमधून सांपडणार नाहीत. अकृत्रिम स्वभावोक्ति हा काव्याप्रमाणेंच त्यांच्या कादंबऱ्यांचा विशेष आहे. जन्मभर शास्त्रीय विषयाची माथेकूट करणारे प्रि. तात्यासाहेब गोखले यांना नाथांच्या 'खेडेगांवीं चला' या कादंबरीनें किती मोहून टाकले होतें हें पाहण्या-सारखें आहे. ता. १२ नवंबर,१९२४ च्या पत्रांत ते लिहितात,

"येतांना बोटीतच आपले पुस्तकाचे दोन्ही भाग वाचले पुस्तक खरोखरीच हातांत घेतलें ते खाली ठेवलें नाहीं व सकाळपासून रात्री-पर्यंत पारायण पुरे केलें. परमेश्वर नेहमीं स्थळकाळास अनुरूप असे 'निरोप' मनुष्य जातीस, वेळोवेळी निरनिराळे दूतामार्फत पाठवीत असतो तशा तऱ्हेचा Message अगदी सोप्या भाषेत आपण ऐकत आहोंत असें पुस्तक वाचत असतांना वाटतें. "खेडेगांवीं चला" हें

नांवही पण Message सारखें असलेमुळें अन्वर्थक आहे. व या 'निरोपाची' सध्याचे काळीं फारच जरूरी आहे. व ती निव्वळ मराठी जाणणारे लोकांसच नसून हिंदुस्थानांतील सर्व लोकांना आहे. मला वाटतें कीं या पुस्तकाचें इंग्रजी भाषांतर केल्यास जास्त उपयोगीं होईल. आपलें भावी खेडें हा आपल्या स्वराज्याचा भक्कम पाया आहे. व त्यांत जर आपण वर्णन केलेप्रमाणें रामदूत निपजतील तर भारतवर्षाचा भाग्योदयकाल फार दूर नाहीं.'

'खेडेगांवीं चला' ही कादंबरी पक्षघातांतून बरे होत असतां परंतु पूर्ण बरे झाले नसतांना लिहिलेली आहे. तशाही अवस्थेंत नाथांचें मन किती आशावादी व ध्येयवादानें भरलेलें होतें याचें ही कादंबरी म्हणजे एक जाज्वल्य गमक आहे:—

नाथांच्या कादंबऱ्या मराठी वाङमयांत त्यांना मानाचें स्थान मिळवून देतील.

### गोष्टी व गद्यकाव्य

१ सर्वजण एकाचेच अंश
२ सागर व प्रभाकर संवाद
३ स्फुट गोष्टी
४ स्फुट तत्वचर्चा

तत्वचर्चेंत रोजचे कितीएक सामाजिक व राजकीय प्रश्न विचारांत घेतले आहेत. त्यासंबंधीं कितीएक वेळां गद्य व पद्य अशी दोन्ही प्रकारची रचना आहे. गद्य काव्यांत कल्पनाविलास भरपूर आहे, तथापि क्लिष्टता नाहीं. गोष्टी या क्वचित आत्मचरित्रपर परंतु बहुतेक समाजांत डोळ्यापुढें घडणाऱ्या घटनांबद्दल आहेत. लघुकथेंचें तंत्र त्यांत काटेकोरपणानें संभाळलेलें नाहीं. त्या त्या घटनेंतून द्यावयाचा जो संदेश त्यावर त्यांचें लक्ष अधिक आहे.

## काव्य

या खंडांत सुमारें सहा हजार ओळी काव्य छापलें आहे. त्या त्या काव्यासंबंधी अधिक माहिती पुढे दिलीच आहे. याशिवाय सुमारें ७-८ हजार ओळी कविता आज नीट जुळबून लावलेली अशी शिल्लक आहे. परंतु मध्यंतरीच्या धामधुमीच्या काळांत पुष्कळशा कागदांची गल्लत होऊन गेलेली काहे. हे सर्व कागद जुळविण्याचा खटाटोप अजून करावयाचा आहे. त्यांत सुमारें ५-६ हजार ओळी कविता हातीं लागेल असा अंदाज आहे.

लांब मर्यादेची काव्यें या खडांत बरीचशी छापलेलीं आहेत. अजून अल्प लांबीची खडकाव्ये १०-१५ तरी सहज भरतील. त्यांची साफसुफी करून त्यास योग्य ते मथळे द्यावयास हवे आहेत. याशिवाय **विरहिणी** ( १९२६-२७ ) म्हणून एक प्रेमगीत होते. त्याची प्रत अद्यापि कोठें सांपडत नाही. **प्रेमसाक्षात्कार** ( १९११-१२ ) ही एक भली मोठी काव्यकथा आहे. स्थलाभावीं ती या खंडांत घातली नाहीं. **महाराष्ट्र-महोदय** म्हणून शिवचरित्रावरील दीर्घ काव्य अद्याप अपूर्णावस्थेतच आहे. सध्यां त्याच्या १५००-२००० ओळी तयार असतील. याच प्रमाणांत तें पुरें केलें तर ६-७ हजार ओळीचें हें एक सुन्दर शिवचरित्र तयार होईल. चित्रमयजगतमध्यें १९०० सालीं प्रसिद्ध झालेलें दीर्घ काव्य- 'जिजाबाईचें आपल्या बापास उत्तर' हेंही या खंडांत घालतां आलें नाही. १९३८ साली किर्लोस्कर-मध्यें प्रसिद्ध झालेलें 'आधुनिक शंबूक' हेंही एक मध्यम लांबीचें खंडकाव्य या खंडांत घेतलेलें नाहीं,

जुनी स्फुटकविता अगदी विपुल आहे. १९११ पासूनच्या अनेक वह्या आहेत. प्रस्तुत खंडांत मुख्यतः १९४१ च्या फेब्रुवारीपासून मे अखेरपर्यंत व १९४२ च्या मार्चअखेरीपासून जूनच्या ९ तारखेपर्यंत लिहिलेल्या स्फुट-कवितांतूनच निवड करून कविता घेतल्या आहेत.

जागेच्या अभावीं त्याही सर्वच घेतां आल्या नाहींत. १९४१ सालीं जवळ जवळ ८०० ओळी कविता लिहिलेली आहे आणि १९४२ सालीं अडीच महिन्यांत २००० ओळी कविता लिहिली आहे. त्यापैकीं एक तृतियांशाहून अधिक कविता मागें ठेवावी लागली आहे.

कवितांचे विषय व त्यांची रचना यांची ह्या खंडांतील कवितेवरून वाचकांस आपोआपच कल्पना येण्यासारखी आहे. शिवाय त्यांच्या कवितेंत काय नाही आणि काय आहे याची यथार्थ व मार्मिक चर्चा श्री. तात्यासाहेब केळकर यांनी केलीच आहे. त्यामुळें संपादकाला त्यासंबंधीं विवेचन करण्याचें कारण राहिलेलें नाहीं. कांहीं गोष्टींचा मात्र थोडक्यांत निर्देश करावासा वाटतो.

(१) शृंगार आणि कल्पनेच्या भराऱ्या या दृष्टीनें नाथांच्या कविता तरुणांना कमी आवडण्याचा संभव आहे खरा. परंतु त्यांचे पुरोगामी विचार व त्यांची शास्त्रीय मांडणी यामुळें ही कविता पुरोगामी विचारसरणीच्या तरुणांना विशेष आवडती होण्याचा संभव फार वाटतो. कायदेभंग, पोरकें पोर, दुःखांतून सुखाकडे हीं खंड-काव्यें व स्फुट कवितांमधील सर्वच विभाग (त्यांतही विशेषतः 'रशिया व लोकक्रांति'–आणि 'देवधर्म, वर्ण–जाति, नीति–संस्कृति' हे भाग) तरुणांच्या मनाची विशेष पकड घेतील.

(२) देशस्थितीबद्दलच्या कविता या संग्रहांतही ठिकठिकाणीं सांपडतील हें एक वैशिष्टय म्हणून तात्यासाहेबांनीं सांगितलेंच आहे. परंतु या खंडाच्या पानांची मर्यादा आखून घेतलेली असल्यामुळें "भारतीय लोकस्थिती व राजकारण" असा एक पोटविभाग कल्पून एकत्रित केलेली बरीचशी कविता या खंडांत घालतां आली नाहीं. कवीचें जीवनच राजकारणमय असल्यानें त्यांच्या कवितेवर राजकीय विचारांची दाट छाया असावी हें स्वाभाविकच आहे. आणि कोणताही

विषय वृथा आडवळणें घेऊन किंवा रूपकाखालीं दडवून सांगण्याची त्यांची वृत्ति नसल्यामुळें राजकीय विषयही त्यांनी सहज सुन्दर रेखाटले आहेत.

( ३ ) नव्या कवितेबरोबर कांहीं जुनी कविता वानगीसाठीं मुद्दाम दिली आहे. हेतु हा कीं कवीच्या विचारांच्या विकासाचें थोडें तरी दिग्दर्शन त्यांत व्हावें. मुळापासूनच सामाजिक सुधारणा व बुद्धिवाद यावर वृत्ति खिळलेली असली तरी प्राचीन कालापासून चालत आलेल्या देवाच्या परंपरागत कल्पनेपासून कवी अगदींच पराङ्मुख नव्हते; किंबहुना कांहीं परिस्थितीच्या परिणामानें केव्हां केव्हां आस्तिक्यानेंही त्यांच्या मनाची पकड घेतली होती. लोकरंजनार्थ भजन वगैरेचा उपयोग विश्वास नसतांता सुद्धां करावा अशीही भूमिका एकदोन वेळ मांडलेली आढळेल. परंतु पुढें मार्क्सवादाचा विचारपूर्वक अंगीकार केल्यापासून आतां नास्तिकवाद व बुद्धिवाद यांची पकड कायम झाली असून पूर्वींचीं सर्व काव्यें याच पार्श्वभूमीवर वैचारिक आंदोलनें व विकासाच्या पायऱ्या या दृष्टीनें पाहिलीं जाणें जरूर आहे.

( ४ ) चतुर संवाद हें नवेंच दालन कवींनीं मराठी वाङमयांत उघडलें आहे. संस्कृतांत अशा प्रकारची बरीच रचना आढळते. मराठीत यांनींच अशा प्रकारची रचना प्रथम केली आहे असें म्हटलें तरी चालेल. यांतील विषय प्रासंगिक असणें स्वाभाविक आहे. परंतु त्यांत चतुर कोटिक्रम व त्याचबरोबर जीवनांतील एखादें सुन्दर तत्व यांचा मधुर मिलाफ करणें ही गोष्ट सहज साध्य नाहीं हें स्वानुभवाशिवाय समजणार नाहीं. यांतील कित्येक कोटिक्रम सर्व वाचकांच्या नित्य स्मरणांत राहतील.

‘ गांधीवादि विकीतसे गिरणींचे गठ्ठे दुकानीं कसे ’
‘नाहीं भारति जेवि एकहि अतां श्रीराम वा पांडव
तेवी द्रौपदि जानकी न दिसती या आर्य देशीं तव’
‘आधीं भ्रष्ट तुम्ही पुरुष; तुमच्या शिष्या अम्ही या स्त्रिया !’

अशासारखीं वाक्यें तर वाचकांच्या तोंडीं नित्य घोळत राहण्या-सारखीं आहेत.

( ५ ) गांधीवादी व अहिंसा यावरील मतें हीं कवीची फार जुनीं आहेत. विधिविलसित या १९२६ सालीं लिहिलेल्या नाटकांतच ढोंगी खादीधारी लोकांची थट्टा उडविलेली आहे. समाजवादाच्या स्वीकारा-पासून गांधीवादांतील ढोंगाबद्दल ते लिहूं बोलूं लागले; असें नव्हे हें यावरून स्पष्ट होईल. गांधींचें अलीकडील धोरण जनहिताशीं विसंगत आहे असें त्यांचें स्पष्ट मत असलें तरी व्यक्तिशः त्यांना गांधीजींबद्दल किती आदर आहे हें अगदीं अलीकडे १९४१ सालीं लिहिलेल्या "कायदेभंग" या त्यांच्या काव्यावरून चांगलें दिसून येईल.

( ६ ) नाथांच्या कवितेंत वृत्तवैचित्र्य पुष्कळ आहे. परंतु आधुनिक कवींनीं हाताळलेले भिन्न भिन्न छंद त्यांनीं उपयोगांत आणले नाहींत हें अगदीं खरें आहे. यामुळें त्यांच्या काव्यांत गेयता आली नाहीं हें जसें खरें आहे, तसेंच त्यांनीं योजिलेल्या वृत्तांमुळें आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना त्यांची कविता वाचून आस्वाद घेणें सुलभ झालें आहे हेंही खरें आहे. वृत्तांतही शार्दूलविक्रीडित व स्त्रग्धरा ही लांब व कांहींशीं डौलदार आणि गंभीर वृत्तें त्यांचीं फार आवडतीं आहेत. अधिकांत अधिक रचना त्यांची शार्दूलविक्रीडितांत आहे. व या वृत्ताची कांहीं विशेष गोड लय त्यांना साधली आहे.

येथेंही समर्थाच्या खास अंकांतील 'नाथांची साहित्य सेवा' या लेखांतल एक उतारा देतों. त्यांत थोडक्यांत नाथांच्या एकंदर साहित्याबद्दलचें महत्वमापन केलें आहे.

"नाथांची भाषा अतिशय शुद्ध, साधी, ओघवती आणि तेजस्वी आहे. त्यांचे विचार भावनाप्रधान आहेत. नाटचसंवाद सुट-सुटीत आणि लक्ष्यवेधक आहेत. नाटचतंत्राबद्दल मात्र पुष्कळांचा त्यांचेशीं मतभेद होईल. साहित्यक्षेत्रांत नाटककारापेक्षां कवी हाच

नाथांचा खरा दर्जा आहे. नाथांची कविता अत्यंत सफाईदार, भावपूर्ण आणि चित्तवेधक आहे. विशेषतः ओळीच्या अखेरीस वाक्य पुरें न करतां तें दुसऱ्या ओळीत जाऊन पुरें करावयाचें ही त्यांची यशस्वी लकब मिल्टनची आणि शेक्सपीअरची आठवण करून देते. रचनेचें चांगलें प्रभावी सामर्थ्य असल्याशिवाय ही लकब यशस्वी होऊं शकत नाहीं. मीही आज वीस वर्षे माझ्या सामर्थ्यानुसार महाराष्ट्र भाषेची सेवा करण्याचा यत्न केला. पण नाथांइतकें कौशल्य मला लाभलें नाहीं. तरी नाथ राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांत जणू आपली शक्ति सर्वत्र खर्च करीत होते."

# संपादन व प्रकाशन

'नाथांची साहित्यसेवा' या खास अंकांतील लेखाच्या शेवटीं प्रस्तुत संपादकानें त्यांच्या लेखनाची खरी ओळख म्हणजे प्रकाशन स्वतःकडून व्हावें अशी आशा व्यक्त केली होती. ही आशा पुरी होण्यांत अनेक अडचणी होत्या. मुख्य म्हणजे कवीची संमति मिळणेंच जवळजवळ अशक्य झालें होतें. माझ्यासारख्याला आर्थिक अडचणही फार दुस्तर होती. युद्धाचा काल हाही अशा प्रकाशनाला प्रतिकूल होता. त्यामुळें हे सर्व मनोरथ जागच्या जागींच राहणार अशी नित्य भीति वाटत होती. परंतु अकल्पितपणें पहिल्या दोन अडचणींचा परिहार झाला आणि कितीएक कारणांमुळें कालाची प्रतिकूलता दृष्टीआड करून कवितांचा पहिला खंड तरी ताबडतोब प्रसिद्ध करावयाचें असेंही ठरलें. पुढील सगळ्याच गोष्टी अत्यंत द्रुत गतीनें होऊन संकलिल्या-पासून सात आठवड्यांत हा ग्रंथ वाचकांच्या हातीं देतां येत आहे.

कवितांची निवड करतांना सुमारें निम्या पानांत बसतील इतकीं खंडकाव्यें व बाकी स्फुट कविता अशी योजना केली. खंडकाव्यांपैकीं

बरीचशी त्यामुळें छापतां आली. स्फुट कविता अर्थातच पुष्कळच मागे ठेवावी लागली. १९४१ व १९४२ या दोन वर्षात लिहिलेली स्फुट कवितासुद्धां सगळीच्या सगळी घेतां आली नाही. प्रस्तुत खंडांत जे सात पोटविभाग दिले आहेत त्यातीलसुद्धा कांही कविता मागें राहिली. आणि 'भारतीय लोकस्थिति व राजकारण' 'प्रेम आणि विवाह' 'निराशा व मृत्यु' आणि 'स्वपर' असे चार पोटविभाग सगळेच्या सगळेच मागें राहिले. या दोन सालांपूर्वीची स्फुट कविता तर अगदीच तुरळक आणि केवळ जुन्या रचनेच्या वानगीपुरती घेतली आहे.

सर्व कवितांचे पाठ कवीबरोबर वाचून तपासून निश्चित केले आहेत. आपण जें समाजाला देणार ते शक्य तेवढें निर्दोष द्यावें; त्यासाठीं उगीच पाठाबद्दल अहकार धरूं नये; कोणीही कसलीही केलेली सूचना शांतपणें तपासून पारखून पहावी; पटल्यास मोकळे-पणानें स्वीकारावी; असें कवीचें धोरण आहे. प्रसिद्धिविन्मुखते-प्रमाणेंच स्वतःच्या पाठांबद्दलच्या अहंकाराचा अभाव हेंही कवींच्या ठिकाणी सहसा न आढळणारें वैशिष्टच प्रस्तुत कवींचे ठिकाणी आहे. त्यामुळें ३।४ आठवडे ही पाठांची तपासणी मोठ्या कसोशीने करण्यांत आली; वृत्तदोष टाळण्याकडे फार लक्ष पुरविण्यांत आलें. इतकेंही करून अपूर्णता राहिली असणार. पण त्याबद्दची जबाबदारी संपादकां-वर आहे. कारण जेवढीं स्थळें संपादकाने दाखविली तेवढ्यावरच चर्चा झाली. प्रकृति असमाधानकारक असल्यामुळें कवीला स्वतःला प्रत्येक ओळ तपासतां आली नाही. या संशोधनाचे बाबतींत मधून-मधून श्री. मा. आ. हळबे यांचाही उपयोग झाला आहे.

स्फुट कवितांवर मथळे पूर्वीचे नव्हते. ते सर्व नवीन दिले असून त्याबद्दलची जबाबदारी सर्वथा संपादकाची आहे तसेंच स्फुट कविता-

साठीं भिन्न भिन्न पोटविभाग पाडून जी जुळणी केली आहे तीही संपादकानेंच नवीन केली आहे. एकच कविता एकाहून अधिक पोट-विभागांत बसण्यासारखी असल्यामुळें ती कोणत्या विभागांत घालावी याबद्दल मतभेद होणें स्वाभाविक आहे.

छपाईसाठीं प्रत करण्याचे कामीं ज्यांच्या श्रमाचा फार उपयोग झाला त्यांचा उल्लेख कवीनी आपल्या निवेदनांत केलाच आहे. परंतु छापण्यास प्रत देण्यापूर्वी श्री. हुडप यांनीं ती स्वतः काळजीपूर्वक वाचली. कित्येक वेळां फार उपयुक्त सूचना केल्या; व राहून गेलेल्या उणीवा नित्य ध्यानांत आणल्या हें मुद्दाम नमूद करणें आवश्यक आहे.

छपाईच्या बाबतींत कागदाची अडचण फार मोठी होती. श्री निळूभाऊ घाणेकर यांच्यामुळें ती दूर होऊं शकली हें तर खरेंच. परंतु त्यांनीं मिळविलेल्या कागदाचा आकार आमच्या पुस्तकास जुळेसा नसल्यामुळें तो कागद आपलेकडे ठेवून घेऊन त्याचेऐवजी आपले ताब्यांतील आमच्या सोईचा कागद येथील वेस्टर्न इंडिया विमा कंपनीच्या चालकांनीं उपलब्ध करून दिला यामुळेंच संकल्पाप्रमाणें हें पुस्तक छापण्यास घेतां आलें.

छपाईच्या कामीं श्री. हुडप यांनीं फार परिश्रम घेतले. ता. १९ जूनला त्यांचेकडे प्रत दिली; आणि ३१ जुलैला त्यांनीं कांहीं प्रती बांधून तयार करून दिल्या. सातान्यासारख्या ठिकाणीं साधनसामुग्री व मनुष्यबळ बेताचें असूनही त्यांनीं हें काम जें इतक्या त्वरेनें आणि सुबकपणें करून दिलें याचें कारण कवीच्याबद्दल त्यांना वाटणारी आपुलकी हेंच आहे.

अर्थात आम्ही दोघांनीं कितीही काळजी घेतली असली तरी नजरचुकीनें छपाईच्या चुका राहून गेल्या असण्याचा संभव आहे. पण याचें कारण गबाळपणा किंवा बेफिकिरी हें नसून वेळेचा अभाव हेंच आहे. कांहीं विशेष कारणामुळें हें काम अतिशय लौकर हातावेगळें

करणें अत्यंत आवश्यक झालें होतें. त्यामुळें गर्दींत नजरचूक झाली असण्याचा संभव आहे. अर्थात त्याबद्दलची सर्व जबाबदारी एकटया संपादकाची आहे. शुद्धलेखन जुन्या पद्धतीचें आहे. तें बहुतांशीं कवींना संमत असेंच आहे. परंतु त्या संबंधांतही मुख्यत: जबाबदारी संपादकाचीच आहे.

श्री. न. चि. केळकर यांचा पुरस्कार या ग्रंथाला लाभला हें कवीचें आणि संपादकाचें मोठें भाग्य आहे. नाथांची कविता पुरस्कारपूर्वक त्यांनींच प्रथम अभिनव काव्यमालेच्या तिसऱ्या भागांत प्रसिद्ध केली. आतांही समग्र कविता महाराष्ट्रापुढें सादर करतांना त्यांचाच आशीर्वाद लाभत आहे हा अत्यंत संस्मरणीय योगायोग आहे.

तसेंच या ग्रंथाचा प्रसिद्धि समारंभ टिळक पुण्यतिथीच्या दिवशीं प्रो. वामन मल्हार जोशी यांच्यांसारख्या अभिजात रसिकांकडून होत आहे ही गोष्टही भाग्यशाली आहे.

अनेकांच्या प्रयत्नानें, मदतीनें, सहानुभूतीनें तयार झालेला हा ग्रंथ जनतेला सादर करण्याचा योग प्रस्तुत संपादकाला मिळतो आहे हाही एक योगायोगच आहे. आणि त्याबद्दल तो वरील सर्वांचा अत्यंत ऋणी आहे.

# विवरणात्मक टीपा

## पुण्यस्मरण

**'महाराष्ट्रा'** ही कविता समर्थ वर्तमानपत्रांत ता. ११ जुलै १९२७ रोजीं लो. टिळकांच्या पुण्यतिथीच्या दिवशी प्रसिद्ध झाली.

**श्रीशिववंदन** : साहित्यपरिचयांत उल्लेख केलेया "महाराष्ट्र-महोदय" या अपूर्ण दीर्घकाव्यांतील हें पहिलें अष्टक आहे. हें काव्य लिहिण्यास सुरुवात १९२५-२६ चे दरम्यान केव्हांतरी झालेली

आहे. प्रस्तुत अष्टक कवींच्या टिळक राष्ट्रीय शाळेंत नित्य म्हणण्यांत येत असे.

**जननी-दशक :** हें दशक कवीच्या मातोश्री कै. काकू यांच्याबद्दल आहे. त्याचा रचनाकाल निश्चित सांगतां येत नाहीं. परंतु ९ व्या श्लोकांतील उल्लेखावरून हें पक्षघाताच्या पहिल्या आघातानंतर लौकरच म्हणजे १९२४-२५ सालीं केव्हांतरी लिहिलें असावें. ज्या संकटामुळें कवीला न्यू. इ. स्कुलांत नोकरी पत्करावी लागली त्याचें थोडेंसे दिग्दर्शन या कवितेवरून होईल.

## खंडकाव्यें

१ **स्मृतिगीतें**-नाथांचे जिवलग मित्र कै. बाबूराव देशपांडे यांच्या दुःखद अकालीं निधनाच्यां निमित्तानें लिहिलेलें हें खडकाव्य आहे. इंग्रजींतील Lycidas, Adonais, In Memorium यासारखी त्याची घाटणी आहे. त्याप्रमाणें यांत प्रत्यक्ष मित्रांबद्दल शोक थोडा आहे. तथापि मित्रनिधनामुळें आलेल्या प्रथमावेगांतील एक प्रकारची वेडावलेली स्थिती, पहिला आवेग विसरल्यानतर आजूबाजूला पाहून थोडेंतरी समाधान पाहण्याची तळमळ आणि त्यानंतर लाभलेली मनःशांति ही परिणति मात्र त्या काव्यांप्रमाणेंच आहे. या दृष्टीनें हें शोकगीत मराठींत नमुनेदार आहे. त्यांत वर्णिलेल्या वर्णनांत काल्पनिक कांहीं नाहीं. सर्व वस्तुसत्य आहे. यांतील वहिनी म्हणजे डॉ. कमलाबाई देशपांडे, निवृत्त प्रिन्सिपॉल, या होत आणि मित्र-सुत म्हणजे त्यांचेच चिरंजीव श्री. श्रीधर गोपाळ देशपांडे हे होत. यांच्या बालपणाबद्दलच्या या काव्यांतील उल्लेखांसोबतच श्री. कमलाबाईची **बालकांस पाहून** (गीतद्विदल पान ४) ही कविता वाचण्यासारखी आहे. **तृतीयावेगांतील** स्तबक ३ वरून कवीच्या विवाह-

निश्चयाबद्दलची चांगली कल्पना यण्यासारखी आहे. तसेंच ह्याच आवेगांतील स्तबक ८ वरून कवीची अस्पृश्यांची रात्रीची शाळा व परमेश्वरविषयक विचार यांची कल्पना येईल. त्यापुढें स्तबक १३ मध्यें कवीला नोकरींतील वृत्ति कशी जाचक झाली होती हें दिसून येईल. तसेंच त्यांनी केलेल्या राष्ट्रसेवेच्या प्रतिज्ञेचाही त्या ठिकाणीं स्पष्ट उल्लेख आढळेल. हें काव्य ८ मार्च १९२७ रोजीं लिहून पुरें झालें. त्यापूर्वी १४ वर्षें – ता. १३ मार्च १९१३ या दिवशी कै. बाबूरावांचें निधन झालें.

२ **मालतीनिधन** : नाथांच्या धाकटया भगिनी कै. मनूताई – ( सासरचें नांव सौ. राधाबाई जोशी ) यांचा अकालीं पहिल्याच बाळतपणांत आठव्या दिवशीच मृत्यु झाला. त्यांची कन्या मालती हीही अवघ्या अडीच महिन्यांत हें जग सोडून गेली. या गोष्टीचा नाथाच्या अंत:करणावर फार दु:खद आघात झालेला आहे. त्या त्यांच्या बहिणीवर नाथांचें फार प्रेम होतें. तिची वृत्ति स्वतंत्र, महत्त्वाकांक्षी होती, बुद्धि चलाख होती. समाजसेवेची आकांक्षा होती; आणि सामाजिक बाबतीत नाथांप्रमाणेंच सुधारक मतें होतीं. कविता करण्याचाही त्यांना असाच नाद होता. त्यांची काही कविता नाथांचे संग्रही होती. पण या वेळी पुष्कळ शोधूनही ती सांपडली नाहीं. एका कार्डावर लिहिलेल्या दोनच ओळी मात्र सांपडल्या त्या पुढील-प्रमाणें–

**संसाराचा भार येतसे झणि माथ्यावरती**
**वयें सान परि काम कठिण बहु करि ती मग युवती**

शेवटल्या आजारांत त्यानीं म्हणावें 'नाथा, मी तुझी मुलगी होऊन समाजसेवेची हौस पुरी करीन.' या सर्व आठवणीमुळें ही कविता अत्यंत शोकार्त अंत:करणाने लिहिली आहे तिच्यांतील पूर्ण वास्तव वर्णने काव्यदृष्टया परिणामकारक आहेत.

**३ कायदेभग** : नांवावरून थोडा गैरसमज होण्यासारखा आहे. काळ कायदेभंगाचा आहे परंतु कथा एक समाजदृश्यच आहे. 'नित्य करा कायदेभंग' हा शेवटचा आदेश अर्थातच रूढिभंगाला उद्देशून आहे. प्रत्यक्ष कथेंत वर्णिलेला रूढिभंग हा परंपराकृष्ट मनास फार कडक वाटेल. परंतु घटस्फोटाच्या परवानगीच्या अभावी अशा बिन-तोड परिस्थितींत अन्य चांगली तोड नाही हें विचारवंतास मान्य होईल. यांतील 'माधव'चें चित्र अत्यंत सहृदयतेने रंगविलेलें असून गांधीजींच्या कायदेभंगाच्या चळवळीचें स्वरूपवर्णनही काव्य-दृष्टया चटकदार व ऐतिहासिक दृष्टया बोधप्रद आहे.

**४ निरलसाश्रम** : यांतील बहुतेक कथा सत्यकथाच आहेत. आपापल्या परी निराश व उध्वस्त जीवनांचे हे नमुने आमच्या समाजाच्या अंतरंगांतील विविध दोषांचीं विदारक चित्रें होत. निरलसा श्रमाची कल्पना व त्याचे संस्थापक हे मात्र काल्पनिकच होत.

**५ पुनर्मीलन, ६ संन्यस्मिनी, ७ धर्मश्रद्धा, ८ विधिघटना** हीं चार प्रेमगीतें म्हणून लिहिलेली आहेत. यांचे जोडीला एक पांचवें **विरहिणी** म्हणून काव्य होतें. पण त्याची प्रत सांपडली नाहीं. यांपैकीं धर्मश्रद्धा हें 'ऐक्य' पत्रांत छापलें गेलें आहे.

**९. क्षेत्रपालिका** : रजपूतांच्या इतिहासांतील ही एक प्रख्यात अद्‌भुतरम्य प्रेमकथा आहे. श्री. कमलाबाई देशपांडे या प्रवेशपरीक्षा पास झाल्या त्या प्रसंगीं मुद्दाम ही कविता लिहिण्यांत आली.

**१० प्रबल अबला** : "**आम्ही शिक्षकिणी सखे कितिजणी ही सोशितों जाचणी**" ही यांतील विदारक ओळ किनीकांना विचारप्रवृत्त करील. या पार्श्वभूमीवर या काव्यांतील घटना परि-णामकारक वाटेल.

११–१२ **पोरकें पोर** आणि **दुःखांतून सुखाकडे** याहीं दोन्ही सत्यकथाच आहेत. त्यांतील सहजसौंदर्य विलोभनीय आहे. विशेषतः दुःखांतून सुखाकडे यामधील संवादामध्यें कथा किती कुशलतेनें गुंफिली आहे हें पाहण्यासारखें आहे. अनुष्टुभ वृत्तामुळें दोन्ही काव्यांमध्यें ओघही चांगला साधला आहेसें दिसेल.

**१३** ही कविता कवीचे मित्रसुत – ज्यांचा उल्लेख स्मृतिगीतांत आहे – श्री. श्रीधर गोपाळ देशपांडे हे डफरिन बोटीवर नौकानयनाच्या शिक्षणार्थ गेले त्या वेळीं त्यांना मुद्दाम स्वतःकडे भोजनार्थ बोलावून त्यास कवींनी अर्पण केली. यांचा जन्म २७ डिसेंबर १९१२ सालीं झाला; आणि नंतर थोडयाच दिवसांत वडील ता. १३ मार्च रोजीं निवर्तले यांचें शिक्षण सर्व सातारा येथेंच झालें. १९२९ सालीं प्रवेश परीक्षेपर्यन्त शिकून ते इंडियन मर्कंटाइल मरीन ट्रेनिंग शिप "डफरीन" यावर कॅडेट म्हणून गेले. तेथे त्यांनीं तीन वर्षे उमेदवारी करून नाविक शिक्षण घेतलें. त्यानंतर सहा वर्षे सिंदिआ स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या निरनिराळ्या जहाजांवर नौकरी करून चीफ ऑफिसरची परीक्षा देऊन नॅव्हिगेटिंग ऑफिसर म्हणून त्यांनीं काम केलें. मध्यंतरी सिंदिआ कंपनीनें त्यांना नाविक कारागिरीची माहिती देण्यासाठी आपल्या खर्चानें ग्लॅसगो येथें पाठविले व कंपनीच्या नवीन बांधलेल्या जहाजाचे अधिकारी म्हणून १९३६ साली हिंदुस्थानांत ते परत आले नंतर त्यांनी हें कार्यक्षेत्र बदलण्याच्या हेतूनें मद्रास येथें वैमानिकाचा 'A' लायसेन्स मिळविला, आणि या उभयविध पात्रतेच्या बळावर त्यांचो पब्लिक सर्व्हिस कमिशनकडून असिस्टंट एरोड्रोम ऑफिसर म्हणून नेमणूक झाली. आणि गेलीं तीन वर्षे ते कराची एअरपोर्टवर आहेत. रा. देशपांडे यांनाहि ललितसाहित्याची आवड असून त्यांनीं किर्लोस्कर, सह्याद्रि वगैरे मासिकांतून कांही गोष्टी व लेख लिहिले आहेत. त्यांची पहिली

कादंबरी '**सहारा**' या नांवाची, दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाली. तिचा विषय राजकारणाच्या पार्श्वभूमीवरील एक प्रणयकथा हा आहे. त्यांचीच दुसरी कादंबरी '**सायंतारा**', तारीख २८ डिसेंबर १९४१ रोजीं प्रसिद्ध झाली. विशेष म्हणजे श्री. श्रीधरपंत देशपांडे हे नाथांच्या एका मित्रांचे चिरंजीव आहेत; तर त्यांचे दुसरे मित्र श्री. प्रि. तात्यासाहेब गोखले यांचे ते जामात आहेत.

